# अर्पणपत्रिका

**डॉ. शांतीलाल केशवलाल संघाणी**

**M. B. B. S;**

यांस

लेखकावरच्या निःस्वार्थ प्रेमामुळें

ही अल्प कृति त्यांना

समर्पण केलेली आहे.

**लेखक—**

# लेखकाचे वाचकांशीं दोन शब्द

या जगाच्या वातावरणांत प्रत्येक गोष्ट ईश्वराच्या इच्छेनें घडत असते. हा ग्रंथ लिहून १॥ वर्ष झालें, "आहार शास्त्र" पुस्तकाचें प्रकाशन होतांच एक वर्षानें हा ग्रंथ बाहेर पडेल अशी जाहिरात झाली होती व त्याप्रमाणें लोकांच्या मागण्याहि येऊं लागल्या होत्या, परंतु सर्वच गोष्टी आपल्या हातांत नसल्यामुळें, व परमपूज्य प्रिय मातेचें व पित्याचें निधन झाल्यामुळें मनाला उद्वेग येऊन प्रकाशनाचें काम निरुपायानें लाबणीवर पडलें परंतु त्यांच्याच कृपेनें आज हें पुस्तक वाचकांच्या हातीं देण्याचा शुभ प्रसंग येत आहे, यामुळें मनाला त्यांतल्यात्यांत समाधान वाटत आहे.

कोणतेंही घर बांधतांना निरनिराळ्या कारागिरांची जरुरी लागते त्याचप्रमाणें एखादा ग्रंथ लिहितांना निरानिराळ्या ग्रंथकारांचें म्हणणें काय आहे हेंही विचारांत घ्यावें लागतें, या न्यायानें लेखकाला स्त्री रोगांवरील आजमिती पर्यंत प्रसिद्ध झालेले मराठी व इंग्रजी ग्रंथ यांचा आधार म्हणून उपयोग करितां आला त्याबद्दल लेखक त्या ग्रंथकारांचा अत्यंत ऋणी आहे. आमचे **परेळ** येथील शाखेचे व्यवस्थापक श्रीयुत **गणपतराव आठलेकर** यांनीं या ग्रंथांतील प्रसंगोपात विषयांचा मजकूर सुचविणें, जुळविणें व मजकूर तपासणें वगैरे कामें निःस्वार्थप्रेमानें व आपुलकीच्या भावनेनें केलीं त्याबद्दल लेखक त्यांचा अत्यंत ऋणी आहे. **डॉ. शांतीलाल संघाणी** यांचा व लेखकाचा जवळ जवळ २० वर्षें प्रेमळ बंधुप्रमाणें स्नेह असून त्यांनीं लेखकाला पुस्तक लिहितांना नाना तऱ्हेची माहिती पुरवलेली आहे. आमच्या कुटुंबांत, व आमच्या मातोश्री, वडिलांच्या आजारांत त्यांचें जें सहाय्य झालें आहे व चालू आहे तें अगदीं घरगुती नात्याप्रमाणें असून त्यांचा आमचा हा घरगुती स्नेह प्रभूनें असाच ठेवावा अशी प्रार्थना आहे.

तसेंच माझे सन्मित्र व हितचिंतक **डॉ. एम्. डी. पटवर्धन**, एम्. डी. ( स्त्री बाल रोगांचे तज्ज्ञ ) श्रीयुत **रोहिदास त्रिलोकेकर** व श्री. वैद्यभूषण **गणेश महादेव अभ्यंकर** सुपरिंटेंडेंट, महाराष्ट्र आयुर्वेदिक हॉस्पिटल मुंबई या

सर्वांनीं ज्या आपुलकीच्या भावनेनें सूचना केल्या त्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

ह्या पुस्तकाचे पहिल्या आवृत्तीचे हक्क व प्रकाशन श्रीयुत **रघुनाथ दिपाजी देसाई—न्यू भारत प्रिंटिंग प्रेसचे चालक** यांचे आहेत. त्यांनी अल्पावधींत हें पुस्तक उत्तम तऱ्हेनें छापलें त्याबद्दल त्यांचे आभार मानणें जरूर आहे.

नेहमींचा वैद्यकीय व्यवसाय संभाळून लिखाण करणें अत्यंत कठीण असतें. या धंद्यांत लेखकांचें एक तप झालें, त्यामध्यें निरनिराळया स्त्रियांच्या अडचणी, विकार वगैरे गोष्टींचा अनुभव आला त्यांचा यांत उपयोग केलेला आहे, त्याचप्रमाणें शस्त्रक्रियेच्या विकारांची माहिती सविस्तर न देतां थोडक्यांत दिलेली आहे कारण ती सामान्य जनतेला क्लिष्ट अशीच वाटणारी आहे. तथापि या ग्रंथाची आरंभापासूनची रचना अशी केलेली आहे कीं, वैद्यकीय व्यवसाय करणाऱ्या गृहस्थांप्रमाणेंच प्रत्येक सर्वसाधारण कुटुंबांत या पुस्तकाचा उपयोग व्हावा.

शेवटीं ज्या गुरुमाउलीच्या व भगवंताच्या कृपेनें व माझे पितृतुल्य चुलते **तीं. स्व. श्री. आबासाहेब आणि प्रिय बंधू व स्नेही** यांच्या प्रेमळ सहानुभूतीनें हा ग्रंथ लिहितां आला त्याबद्दल त्यांचे आभार मानून वाचकांची तूर्त रजा घेतों.

**मुंबई**<br>
गुरुवार श्रीकृष्ण जयंती<br>
शके १८६०<br>
ता. १८ आगस्ट १९३८

**दामोदर वासुदेव सांडू.**

# अनुक्रमणिका

## भाग १ ला

## भाग २ रा

### गरोदरावस्था



## भाग ३ रा

### बाळंतपण

# आजच्या स्त्रियांचें आरोग्य.

## प्रास्ताविक

आजकाल आपला स्त्रीवर्ग प्रकृती स्वास्थ्याचे दृष्टीनें भयंकर खालावत चालला असून दिवसें दिवस हा प्रकार वाढत्या प्रमाणांत चालू राहिल्याचें त्या दृष्टीनें पहाणाऱ्याचे लक्षांत येणार आहे. आमच्या स्त्रीवर्गाची शारीरिक व त्याबरोबरच मानासिक स्थिती कष्टमय होण्यास जीं निरनिराळ्या स्वरूपाचीं कारणें घडत आहेत त्यांच्या कार्यकारणाचें विवेचन यथाक्रम पुढें येणारच आहे.

स्त्री असो अगर पुरुष असो, त्याच्या नैसर्गिक प्रकृतींतच त्याचें व तदनुषंगानें समाजाचें हित सांठवलेलें असतें; म्हणजे स्त्री अगर पुरुष यांची जी नैसर्गिक प्रकृती असते तिला अनुसरून प्रत्येक गोष्ट घडली पाहिजे; किंवा घडवून आणली पाहिजे. नैसर्गिकपणें भिन्न परिस्थितींत असणाऱ्या प्रकृती समान स्थितींत आणण्याचा प्रयत्न केव्हांहि कोणत्याहि दृष्टीनें हितावह होणार नाहीं. स्त्रियांची जी नैसर्गिक प्रकृती असते त्याकडे दुर्लक्ष करून तिच्या उन्नतीचे प्रयत्न केले तरी त्यानें नैसर्गिक प्रकृतीला अपाय पोंचून समाजाची घडी विस्कळीत झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

आपल्या स्त्रीवर्गाची स्थिती आजकाल कशा प्रकारची आहे,—किती कष्टप्रद आहे ती सुधारण्यासाठीं कोणती उपाययोजना होणें अवश्य आहे याचा विचार व विवरण करण्यापूर्वी मानवी स्त्रीचे शरीरगत नैसर्गिक विशेष धर्म कोणते व कशा प्रकारचे असतात, तिची शरीरावस्था कशी असते याबद्दलचें इंद्रियविज्ञान-दृष्ट्या अगोदर दिग्दर्शन करणें इष्ट दिसतें.

सर्व साधारणपणें पाहिल्यास स्त्रीची उंची पुरुषांपेक्षां एकदशांश हिशाहूनहि ज्यास्त प्रमाणांत कमीच असते. त्याचप्रमाणें तिच्या शरीराचे मुख्य मुख्य

अवयवही पुरुषाच्या त्या त्या अवयवाशीं समान नसतात. पुरुषाच्या डोक्यापेक्षां स्त्रिचें डोकें विशेष वर्तुळ व लहान असतें. चेहरा बराचसा अरुंद असतो. पाठीचा कणा व त्यास लागून असलेला कमरेचा भाग कांहींसा लांब असतो व छातीचा आकार पुरुषांपेक्षां ज्यास्त बाह्य व गोल असतो. शरिराच्या अधःशाखांच्या भागापैकीं मांड्या आंखूड असतात. त्यामुळें शरिराचा मध्य पुरुषांप्रमाणें जघनास्थीवर न पडतां मांड्यावरच विशेष पडतो. मान व गळा ज्यास्त लांब, उदर—पोट पुरुषांपेक्षां ज्यास्त रुंद, मोठें व पुढें आलेलें असतें. बस्तिप्रदेश अगर ओंटी पोटाचा भाग नैसर्गिकपणें गर्भ पोषण व उत्सर्जन या क्रिया व्यवस्थितपणें होण्यासाठीं अधिक विस्तृत असतो. त्याच्या आंतील भागाच्या मुखाचा व्यास पुरुषाप्रमाणें पुढून अधिक मागें लांब असा नसून एका कुशीपासून दुसऱ्या कुशीपर्यंत अधिक लांब असा आडवा असतो. दोन जघनास्थि मिळून झालेली कमानहि ज्यास्त मोठी असून आसनास्थीचीं टोकें एकमेकांपासून कांहींशीं दूर झालेलीं असतात. त्यामुळें बस्ती प्रदेशांतील आंतल्या भागाचें तोंड ज्यांतून गर्भ बाहेर येतो तें ज्यास्त मोठें असतें. गुडघे आंतल्या बाजूस अधिक वळलेले असून पुरुषापेक्षां कांहींसे मोठे असतात. मांडीचीं व पोटऱ्यांचीं हाडें मिळून जो कोन असतो तो पुरुषांपेक्षां बराच लहान असतो, यामुळें चालतांना गुडघे एकमेकांस लागतात असें वाटतें. जंघा अथवा पोटऱ्या आखूड असून पावलें लहान असतात. त्याप्रमाणें स्त्रीचे स्कंध अथवा खांदे पुरुषांपेक्षां वाटोळे असतात. तसेंच भुज अथवा दंडहि ज्यास्त आंखूड, वाटोळे व स्थूल असतात. तळहात नाजुक असतात. तसेंच सर्व साधारणपणें स्त्रीचा शरीरबांधा पुरुषांपेक्षां सडपातळ असतो. त्वचा पुरुषाच्या त्वचेपेक्षां ज्यास्त नाजूक व शुभ्र असते, तींत सूक्ष्म रक्तवाहिन्या जास्त असून केंस कमी असतात. डोक्याचे केंस पुरुषांच्या केंसापेक्षां ज्यास्त लांब व बारीक असून पातळ असतात. नखें पुरुषांच्या नखांपेक्षां ज्यास्त नाजूक व तांबूस असतात; चेहऱ्याचे स्नायू अस्पष्ट असल्यामुळें डोळ्याचे संकेत, हंसणें, रडणें इत्यादि मनोविकारांमुळें मुखाचे कोण वर उचलणें, किंवा खालीं जाणें अशा प्रकारच्या मनोविकाराचा ठसा चर्येवर अधिक स्पष्ट उमटतो. एकंदरींत सांगावयाचें म्हणजे एवढेंच कीं, स्त्रीच्या सर्व इंद्रियांची रचना मृदु व ज्यास्त ढिली असते. जी स्त्री आपल्या नैसर्गिक पद्धतीस अनुसरून

राहते म्हणजे जी पुरुषी व्यवसायापासून अलिप्त असते तिच्या ठिकाणीं उपरोक्त वर्णनाबरहुकूम चिन्हें दृग्गोचर होत असतात. स्त्रीच्या सर्वांगापेक्षां डावें अंग जरा विशेष मोठें असतें.

स्त्रीच्या शरीररचनेंत जसा पुरुषाच्या शरीररचनेपेक्षां फरक दिसून येतो तद्वत् स्त्रीच्या इंद्रिय आकारामध्यें सुद्धां फरक दृष्टोत्पत्तीस येतो. हमेश असें दृष्टोत्पत्तीस येतें कीं, बहुतकरून स्त्रीचीं ज्ञानेंद्रियें पुरुषांपेक्षां अधिक तीव्र असतात; याचें कारण कांहीं अंशीं तिच्या शरिराचा नाजुकपणा हेंच असलें पाहिजे; बुद्धिमत्ता व नीतिमत्ता या बाबतींत पुरुष व स्त्री यामध्यें बरीच भिन्नता दिसून येते. याचें कारण स्त्रीच्या मेंदूच्या निरनिराळ्या भागाच्या रचनेंत असणारा स्वाभाविक फरक होय. पुरुषामध्यें मेंदूचा पुढील व खालचा भाग हे विशेषतः पूर्णता पावलेले असतात व स्त्रीच्या मेंदूचा मागील व खालचा भाग विशेष पूर्णता पावलेला असतो. पहिल्या भागांत प्रेम, माया या विकारांचें स्थान असतें म्हणूनच स्त्री पुरुषापेक्षां माया प्रभावांत श्रेष्ठ व पुरुष स्त्रीपेक्षां बुद्धि प्रभावांत श्रेष्ठ असतो. मेंदूच्या रचनेवरून निघणारा हा सिद्धांत क्षणभर बाजूस ठेवला तरी प्रत्यक्ष व्यवहारांत हा सिद्धांत अनुभवाच्या कसोटीस उतरतो. सरळ दृष्टीनें पाहणाऱ्या कोणाहि इसमास स्त्रियांमध्यें स्वाभाविकपणें कोमल विकारांचें व पुरुषांमध्यें त्या विरुद्ध विकारांचें प्राबल्य दिसून येईल. स्त्रीचा बस्तिमार्ग पुरुषापेक्षां रुंद असल्यामुळें कमरेखालील दोन्ही सांध्यांत अधिक अंतर असतें; यामुळें तिची चालण्याची वगैरे ढब पुरुषापेक्षां निराळी दिसते. तसेंच तिच्या आवाजांत फरक असण्याचें कारण, आवाज उत्पन्न करणाऱ्या इंद्रियांमध्यें असणारा फरक हेंच होय. स्त्रीची छाती व फुप्फुस लहान असतात. श्वासनलिका कांहींशी अरुंद व तिचें मुख थोडें आंखुड असतें व नांकाशीं संबंध असणारीं घशांतील छिद्रें हीं थोडीं लहान असतात. निसर्गाच्या या व्यवस्थेमुळें तिचा आवाज स्वभावतःच मृदु, कोमल व उच्च असतो. तसेंच त्या ठिकाणचे स्नायु व बंधनें सुद्धां लवचिक असल्यामुळें पुष्कळ प्रकारचे स्वर निघण्यास अर्थात् गायनासारख्या प्रकारास तीं अनुकुल असतात. तसेंच मेंदूची क्रिया विशेष शीघ्र असल्यामुळें मनोविकारांचें त्यांतल्या त्यांत कोमल मनोविकारांचें प्रतिबिंब तिच्या चेहेऱ्यांवर स्पष्ट व लौकर उमटतें. स्त्रीच्या पोषणक्रियेंतहि पुरुषांपेक्षां फरक असतो. पचनक्रियेच्या

दृष्टीनें विचार करतां पुरुषापेक्षां स्त्रीला बहुधा कमी अन्न लागतें. तिचें यकृत् लहान असतें. दांतहि पुरुषापेक्षां कांहींसे विलंबानें येतात. जेवण्याच्या ठरींव वेळेला पुरुषाइतकी तिला कडक भूक लागत नाहीं. खाद्य पदार्थांच्या बाबतींत तुलना केल्यास पौष्टीक अगर स्निग्ध आहारापेक्षां निःसत्व, चमचमीत अगर रुचकर आहाराकडेच तिची जास्त इच्छा असते. पचनेंद्रियें वरचेवर क्षुब्ध होत असल्यामुळें स्त्रीला वरचेवर क्षुधा लागत असते; पण अभ्यासानें या स्थितींत तिला फरक घडवून आणतां येतो व ती पाहिजे तेवढे उपवासहि करूं शकते. स्त्रीचें रुधिराभिसरण जलद चालतें यामुळें तिची नाडीहि पुरुषापेक्षां विशेष तीव्रतेनें चालते; परंतु तिचा प्रवाह पुरुषाच्या नाडीसारखा नसतो. नैसर्गिकपणें स्त्रीच्या शरिरांत उत्पन्न होणाऱ्या द्रव्यांत चरबी जास्त उत्पन्न होऊन ती घट्टहि असते. तसेंच त्वचेवाटे घाम जाण्याची क्रियाहि मंद असते व घामास आंबूस वास येतो. कांहीं शास्त्रवेत्त्यांचे मतें स्त्रीला मूत्र थोडें होतें व त्यांत पुरुषांच्या मानानें क्षार कमी जातात व म्हणूनच स्त्रीवर्गांत मुतखड्याचा विकार फार कमी आढळतो. स्त्रीची मूत्रनलिका पुरुषाच्या मूत्रनलिकेपेक्षां फार आंखुड व ज्यास्त रुंद असल्यामुळें तींतून मूत्राबरोबर लहानमोठे कण सहजीं बाहेर जाऊं शकतात. अर्थात् बस्तीमध्यें त्यांचा जमावच होत नसल्यामुळें तिथें मुतखडे बनतच नाहींत. दर महिना आर्तवस्राव होणें हा स्त्रीचा एक महत्त्वाचा विशेष नैसर्गीक धर्म आहे व तो फक्त मानव जातींतच असतो. ही विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. स्त्रीचें वय जसजसें वाढतें तसतसे स्तन व गर्भाशय यांमध्यें बराच फेरफार होऊं लागतो. यामुळें केव्हां केव्हां तिच्या प्रकृतींत विकृतीही होण्याचा संभव असतो. तसेंच विटाळ बंद होतांना कित्येकांचे स्तन व गर्भाशय यांमध्यें ग्रंथी उत्पन्न होतात. गर्भाशयाची सुस्थिती व गर्भाशय संबंधीचे विशेष धर्म यावर स्त्रीच्या सर्व आरोग्याची मदार अवलंबून असल्यामुळें स्त्री रोग चिकित्सेच्या प्रसंगीं त्याविषयीं अगोदर विचार करणें फार जरूरीचें असतें. विटाळपणांत, गर्भारपणीं व प्रसूतावस्थेंत स्त्रीचा गर्भाशय व स्तन यांच्या क्रियेंत बराच फेरफार होत असतो व त्याचा परिणाम इतर इंद्रिय व्यापारावर घडतो यामुळें तिला निरनिराळ्या मानसिक व शारीरिक व्याधी जडण्याचा संभव असतो त्यावर विशेष दक्षतापूर्वक उपचार योजणें अत्यन्त जरूरीचें असतें.

## आजच्या स्त्रियांचें आरोग्य

एकंदरींत वरील एकंदर वर्णनावरून मानवी स्त्रीचे शरीरगत विशेष धर्म कोणते व ते कशा प्रकारचे असतात याची ठोकळ रूपरेषा ध्यानीं येणार आहे. ज्या इंद्रियविज्ञान शास्त्रवेत्त्या शोधकानीं वेळोवेळीं संशोधन करून आपापले शोध दिग्दर्शित केले ते जमेस धरून प्रस्तुतचें विवरण केलें आहे. यावरून स्त्रियांच्या शारीरिक उन्नतीचा प्रश्न सोडवावयाचा झाल्यास तिची नैसर्गिक प्रकृती विचारांत घेऊन तदनुरोधानें जरूर ती उपाययोजना करणें कसें जरूरीचें आहे हेंहि विचारांतीं कोणाच्याहि ध्यानीं येणार आहे.

---

# प्रकरण १ लें

## स्त्रियांच्या अनारोग्यांचीं कारणें.

आरोग्याच्या दृष्टीनें आजकाल आपल्या स्त्रीपुरुषांकडे लक्ष्य दिल्यास सर्वत्र आपणास एकच दृश्य दिसून येईल. जिकडे पाहावें तिकडे शारीरिक व त्याबरोबरच मानसिक शक्तीचा ऱ्हास होत चाललेला आहे. आपल्या आजी आजोबांच्या अंगीं जी ताकद, जो जोम होता तो आपल्या आईबापांच्या ठिकाणीं नाहीं व त्यांच्यांत जें कांहीं होतें तें आपल्यांत नाहीं. असा प्रकार शहरांतच आहे असें नसून खेड्यापाड्यांतहि तो कमजास्ती स्वरूपात दृष्टोत्पत्तीस येतो. शारीरिक व मानसिक आरोग्याचे बाबतींत सर्वत्र ऱ्हासांची सारखी ओहोटी चाललेली आहे असेंच म्हणावें लागेल. याचें कारण सर्वसाधारण आरोग्याचे बाबतींतील अज्ञान व अनास्था असेंच कोणीही विचारी मनुष्य म्हणूं शकेल. आपल्या संततीच्या आरोग्याचे बाबतींत भावी हिताच्या दृष्टीनें विचार करण्याची व तदनुरोधानें वर्तन करण्याची पुरुषांपेक्षां स्त्रियांवरच जास्त जबाबदारी असते असें म्हणणें वावगें होणार नाहीं. स्त्री ही राष्ट्रजननी होय. अर्थात् राष्ट्राच्या भावी आरोग्यसंपन्नतेला बऱ्याच अंशीं ती जबाबदार आहे; पण ही जबाबदारी ओळखण्याची तिच्या अंगीं ताकद राहिलेली नाहीं, एवढेंच नव्हे तर स्वतःच्या बाबतींतील आपल्या जबाबदारीकडे तिजकडून अक्षम्य दुर्लक्ष्य होत चाललें आहे असें एकंदर परिस्थितीवरून म्हणावें लागतें.

दिवसें दिवस आपल्या शारीरिक सामर्थ्याचा ऱ्हास कां होत चालला आहे? याचा स्त्रीवर्ग तर राहोच पण पुरुषवर्गाकडून सुद्धां विचार केला जात नाहीं हें अगदीं गैर होय. आजकाल प्रत्येकाच्या दिनक्रमाकडे पाहिल्यास सकाळीं उठल्याबरोबर डॉक्टर वैद्यांचे उंबरठे झिजवावयाचे व नंतर पोटाच्या मागें लागावयाचें असेंच ठोकळपणें दिसून येतें. प्रत्येकाला आरोग्य हवें असतें, पण तें मिळवावें कसें व राखावें कसें याकडे फारच थोड्यांचें लक्ष्य असतें. किंबहुना या गोष्टीकडे पाहण्याची बहुशः ज्याच्या त्याच्याकडून हेळसांडच केली जाते, पण एकदां तें गमावलें, म्हणजे मात्र मग प्रत्येकाची तें पुन्हां मिळविण्यासाठीं धांवपळ सुरू होते.

प्रत्येक व्यक्तीच्या आरोग्याचें मूळ त्यांच्या आईबापांच्या चांगल्या वाईट

प्रकृतीवर अवलंबून असतें. जमीन चांगली असून बीं-बियाणें उत्तम असेल तरच त्यापासून उत्तम पीक पैदा होणार. तसें नसल्यास उलट प्रकार व्हावयाचा हें निसर्गसिद्धच होय. म्हणून भावी आरोग्याचे दृष्टीनें प्रत्येक स्त्रीपुरुषाची प्रकृती सुदृढ व आरोग्यपूर्ण असणें अत्यंत जरूर आहे, किडका व कोंवळा दाणा निकस जमिनींत पडल्यास तो तिथल्या तिथेंच कुजून जावयाचा अगर यदाकदाचित् त्यास अंकुर फुटल्यास त्यापासून सकस व जोमदार झाड उगवण्याची आशा करणें व्यर्थ होय ! हाच नियम आपल्या संततीच्या बाबतींत लागू होणारा आहे.

तारुण्यावस्थेंतील खरा सौख्यानंद भोगण्याचें दूरच राहिलें, पण शैशवावस्था संपून तारुण्याच्या प्रांगणांत प्रवेश होतो न होतो इतक्यांत एक दोन अपत्यांच्या मातेचा मान हल्लींच्या स्त्री समाजाला लाभूं लागला आहे ! अशा स्थितींत धड-धाकट—निरोगी संततीची आशा करणें केव्हांहि निरर्थकच होय ! वयाच्या अपरिपक्व स्थितींत झालेल्या स्त्रीपुरुष संयोगापासून राष्ट्रांत पाप्यांच्या पितरांचीच भर पडावयाची ! लहान वयांत—शरिराची पूर्ण वाढ न झालेल्या स्थितींत स्त्री गर्भवती झाल्यास सगर्भावस्थेंतील विकार तिला सहन होत नाहींत व प्रसवकालीं भयंकर यातना व त्रास भोगावा लागून क्वचित् मृत्यूचाहि प्रसंग तिच्यावर येतो; शिवाय कित्येक प्रसंगीं अकालीं गर्भपात होतो किंवा ती मृतगर्भ प्रसवते अगर गर्भ जन्मल्याबरोबरच मृत्यु पावतो. यदाकदाचित् त्याच्या दुर्दैवानें तो जगलाच तर तो निःशक्त, फिक्कट, सदा रोगी असा होतो; अशी गर्भाची स्थिती होते व खुद्द तिला बाळंतरोग, धुपणी, पांडू असे निरनिराळे विकार जडून तिलाहि अकालीं मृत्युवश व्हावें लागतें. एखादी स्त्री जात्याच अशा वयांत धडधाकट असली तर तिच्यावर वरील प्रकारचा लागलीच परिणाम झाला नाहीं तरी तिची वाढ खुंटून आस्ते आस्ते उपरोक्त परिणाम थोड्याबहुत कालांतरानें होतोच होतो. अकालिक संयोग हा स्त्रियांप्रमाणें पुरुषांनाहि घातक असतो. त्यामुळें त्यांना अकालीं वार्धक्य प्राप्त होतें, धातुविकार, मेंदूचे विकार असे रोग जडतात व त्यामुळें त्याच्याहि आरोग्याचा क्षय होतो. यासाठीं या बाबतींत प्रत्येक जबाबदार इसमानें या गोष्टीचा कळकळीनें विचार केला पाहिजे; व तदनुरूप जरूर ती तजवीज केली पाहिजे. आमच्या आर्य वैद्यकानें आमच्या आर्यपद्धतीस अनुसरून विवाह व स्त्रीपुरुष समागम या बाबतींत जे नियम सांगितले आहेत ते अत्यंत मोलाचे असून त्याकडे प्रत्येक जबाबदार व्यक्तीनें लक्ष पुरविणें अगत्याचें आहे.

## आजच्या स्त्रियांचें आरोग्य

बऱ्याच लोकांचा समज असा आहे कीं स्त्रीला प्रथम रजोदर्शन झालें म्हणजे ती पुरूष समागमास व गर्भधारणेस योग्य झाली; पण ही समजूत सर्वांशीं साफ चुकीची आहे; व हीच समजूत आमच्या भावी पीढीचा ऱ्हास करीत आहेत. देश कालपरत्वें हल्लींच्या काळीं १३।१४ वर्षांच्या दरम्यान प्रथम रजोदर्शन होतें असें पाहण्यांत येतें; परंतु या वयांत जरी तिला रजोदर्शन घडलें तरी त्यावेळीं तिच्या अवयवांची पूर्ण वाढ झालेली नसते. या वयापासून तिच्या अवयवांच्या वाढीस फक्त सुरवात होते व सतरा अठरा वर्षांच्या सुमारास ती पूर्ण होते. तेव्हां प्रथम रजोदर्शनानंतर अवयवांच्या अपूर्व वाढींत तिला गर्भधारणा झाल्यास गर्भाचें यथायोग्य पोषण न होतां गर्भपात अगर निःशक्त रोगट गर्भ उत्पन्न झाल्यास नवल नाहीं. शिवाय अशा गर्भधारणेपासून अवयवांची अपूर्ण वाढ झालेल्या स्त्रीला निरनिराळ्या व्याधी जडल्यास नवल कसलें ?

हल्लींची आपली स्थिती व या बाबतींतील स्त्रीवर्गाचें ज्ञान याचा विचार करतां सर्वत्र उदासीनताच दिसून येते. आपल्या आयुष्यांत लागणाऱ्या ज्ञानाची अवश्य ती माहिती स्त्रीवर्गाला माहीत नसल्यामुळें व ती मिळविण्याकडे द्यावें तितकें लक्ष देण्यास त्याला सवड नसल्यामुळें आणि सांप्रतच्या जीवनार्थ कलहामुळें पूर्वीची कौटुंबिक गृहपरंपरा नष्ट होत चालल्यामुळें स्त्रीवर्गाच्या आरोग्याचे बाब-तींत व भावी पिढीच्या सुस्थितीच्या बाबतींत फार नुकसान होऊं लागलें आहे. सध्यांच्या स्त्रियांचें शिक्षण बव्हंशीं पुरुषी थाटाचें असून त्यांना आवश्यक असें गृहशिक्षण, शिशुसंगोपन, याकडे त्यांनीं आस्थापूर्वक लक्ष देणें अगदीं अगत्याचें आहे. पूर्वी आमच्या कौटुंबिक परंपरेनें स्त्रियांना घरच्या घरीं वृद्ध स्त्रियांकडून जें अनुभविक ज्ञान मिळत होतें तें सध्यांच्या काल परिस्थितीमुळें व परंपरेच्या अभावामुळें मिळण्याची सोय राहिलेली नाहीं; यामुळें आरोग्याचे बाबतींत स्वतःची वागणूक कशी ठेवावी व ज्या भावी पिढीची सर्वस्वी आपल्यावरच जबाबदारी आहे त्यासाठीं काय केलें पाहिजें, कसें वागलें पाहिजे व प्रसंगीं कोणत्या गोष्टीचें ज्ञान आपणास असणें अगत्याचें आहे वगैरे गोष्टी ज्या घरच्या घरीं समजत होत्या तो मार्ग खुंटल्यासारखा झाला आहे.

स्वतःच्या आरोग्याचे नियम, सगर्भावस्था म्हणजे काय, व त्या अवस्थेंत कसें वर्तन ठेवलें पाहिजे, प्रसूतावस्थेंत आपली वागणूक कशा प्रकारची असली पाहिजे, मुलांचें संगोपन कसें करावें, स्वतःला अगर आपल्या अर्भकाला होणाऱ्या

किरकोळ दुखण्यांत कोणते उपाय करावे आणि स्वतःची व आपल्या मुलाची प्रकृती कशी सांभाळावी वगैरे गोष्टींचें ज्ञान प्रत्येक स्त्रीला असणें अगदीं अगत्याचें आहे; व या माहितीचें शिक्षण प्रत्येक मुलीला तिच्या इतर शिक्षणाबरोबर देणें जरुरीचें आहे. .

पूर्वीच्या व हल्लींच्या स्त्रियांचे आरोग्यांचे बाततींत वरवर पाहणारास सुद्धां जमीन अस्मानाचा फरक असल्याचें दिसून येईल. याचें कारण शोधावयास दूर जाण्यास नको. दिवसेंदिवस बदलत जाणारी परिस्थिती व तदनुरूप वागणूक हें तर एक कारण आहेच पण, त्याबद्दल मुख्य कारण म्हटलें म्हणजे, स्त्रियांना आवश्यक असणाऱ्या व्यायामाचा अभाव हेंच होय. पूर्वीच्या स्त्रियांना केरपोतेरें घालणें, पाणी भरणें, दळण कांडण, धुणीधुणें, तुळशीला प्रदक्षिणा घालणें वगैरे जो सक्तीचा व्यायाम घरच्या घरीं मिळत होता; व ज्यामुळें त्यांची प्रकृती सशक्त व निरोगी राहत असे त्या गोष्टींचा हल्लीं विशेषतः शहरांत अभाव दिसूं लागला आहे. शहरवासी स्त्रिया मग त्या श्रीमंत असोत अगर गरीब असोत त्यांची वागणूक सर्वसाधारणपणें आळशी व शहरीं वातावरणामुळें कांहीं अंशीं चैनीची दिसून येते. नवऱ्याची स्थिती कशीहि असो, स्वयंपाक, धुणीपाणी, दळणकांडण वगैरे कामें मोलमजुरीनें करविण्याकडेच नेहेमीं प्रवृत्ती व वर्तन असावयाचें, सकाळीं झोंपून उठण्याची वेळ उशिरां असावयाची त्यानंतर चहा वेणीफणी व्हावयाची व एकदां नवरा जेवून कामावर गेला कीं, स्वतःचें जेवण उरकून यथेच्छ झोंप ताणावयाची नंतर चहा व्हावयाचा व तो झाल्यावर शेजारच्या मैत्रिणीशीं गप्पा गोष्टी, पत्ते, कॅरम वगैरे प्रकारच्या गोष्टींत, फार तर नाटकें—कादंबऱ्या-सारख्या पुस्तकांच्या वाचनांत वेळ घालवावयाचा; व कशीहि स्थिती असो हमेशा नाटक—सिनेमा पहाण्यास जावयाचें. अशी स्थिती हल्लींच्या काळीं मध्यम स्थितींतील बऱ्याच स्त्रियांच्या ठिकाणीं दिसून येते. कित्येक स्त्रियांची स्थिती यांच्या उलट दिसून येते. वर्षा–दोन वर्षांचा पाळणा, मुलांबाळांची शुश्रूषा व घरकामाचा लकडा, तशांत दारिद्र्यावस्था असल्यास संसाराची काळजी व दुखणी-बाणी यांनीं जीव बेजार व्हावयाचा अशा प्रकारच्याहि कित्येक स्त्रिया दिसून येतात. अशा स्थितींत आरोग्याची अपेक्षा करणें कसें योग्य होईल ?

हल्लींच्या स्त्रियांकडे पाहिल्यास सुदृढ प्रकृतीच्या अशा शंभरांत हातांच्या बोटावर मोजण्या इतक्या तरी सांपडतील कीं काय याची वानवा आहे. ऐन

तारुण्यांत सुद्धां शरीर शुष्क झालेल्या, निस्तेज, डोळे खोल गेलेल्या, गालफडें बसलेल्या, उत्साहहीन अशांचाच भरिणा ज्यास्त दिसून येतो; शिवाय कित्येकांच्या शरिरांत इतका वात शिरलेला दिसून येतो कीं, त्यांचें शरीर स्थूल बनून त्यांना बसणें उठणें वगैरे क्रिया करण्यास फार कठीण होतें. अर्थात् या निरनिराळ्या कारणांनीं तेज, पुष्टता, सशक्तता, सस्तनपणा वगैरे साधांनीं जें नैसर्गिक सौंदर्य दिसावयाचें त्याचा बहुतेक सर्वत्र अभावच दिसून येतो. हें वैगुण्य दूर करण्या-साठीं हल्लीं आपले मुखवटे व इतर अवयव निरनिराळ्या सुवासिक पावडर्सनीं, अनेक प्रकारचीं क्रीमस् पोमेड, चित्रविचित्र वस्त्राभरणें वगैरे कृत्रिम साधनें स्वीकारलीं जातात, पण हा कृत्रिम सजवेपणा नैसर्गिक सौंदर्य व पुष्टता यांच्या-पुढें केव्हांहि व्यर्थच ठरणार ! या नटवेपणाला हल्लीं इतका ऊत आलेला आहे कीं, कालची फॅशन आज नाहीं ! वस्त्राभरणाच्या सजावटीच्या बाबतींत नवोनव प्रकार व पद्धतीचा सररहा अवलंब होऊं लागला आहे; व या नादामुळें स्वतःच्या शरीर प्रकृतीकडे दुर्लक्ष होत चाललें आहे. थोड्याशा चालण्यानें थकवा येणें, उन्हाचा ताप असह्य वाटणें, थोड्याशा सुद्धां शारीरिक श्रमांनीं थकवा येणें व एकाच बाळंतपणानें शरीर अस्थिपंजरवत् होऊन पाप्याच्या पितराप्रमाणें अवस्था होणें अशा प्रकारच्या हल्लींच्या कमकुवत स्त्रियांपासून भावी सुदृढ पिढीची आशा कशी करावयाची ?

हल्लींच्या काळीं स्त्रियांचा हा शारिरीक अधःपात होण्याला कारण आवश्यक अशा वागणुकीचा अभाव व क्षणोक्षणीं बदलणाऱ्या कालमान परिस्थितीच्या मोहानें होणारें अंधानुकरण हेंच बव्हंशी ठरवावें लागेल. यामुळें हल्लींच्या स्त्री-वर्गात अग्निमांद्य, मलावरोध, वात, गुल्म, क्षय—बाळंतरोग, पंडू, प्रदर—गर्भाशयाचे विकार या रोगांचा झपाट्यानें प्रसार होत चालल्याचें त्या दृष्टीनें पहाणाऱ्याच्या सहजीं नजरेस येऊं शकेल. त्यांतल्या त्यांत प्रदर—गर्भाशयाचे विकार व तदंगभूत इतर निरनिराळे विकार इतके पसरत चालले आहेत कीं, सांप्रत काळीं या विकारापासून अलिप्त अशी स्त्री सांपडणें जवळ जवळ कठीण होईल. प्रदर म्हणजे—धुपणी व मासिक विटाळ दोष हे गर्भाशया संबंधींचे विकार स्त्रियांच्या आरोग्याची राखरांगोळी करणारे असून त्या बरोबरच भावी

पिढीला भयंकर नुकसानकारक असल्यामुळें प्रत्येक साक्षर स्त्रीनें, तिच्या पतीनें-पालकानें विचार करणें अत्यावश्यक आहे.

स्त्रियांचें आरोग्य बिघडण्यास जीं निरनिराळीं कारणें हल्लीं घडत आहेत त्याची कल्पना वरील विवेचना वरून ध्यानीं येणार आहे. पुरुषांपेक्षां स्त्रियांना जे विशेष प्रकारचे रोग होतात त्याच रोगांनीं हल्लींच्या स्त्रियांची भयंकर स्थिति बनत चालली आहे. पूर्वीच्या काळीं या विशिष्ट रोगाचा प्रभाव आपल्या स्त्रीवर्गांत म्हणण्यासारखा नव्हे मुळींच दिसून येत नसे. क्वचित् कोठें तरी आढळत असे; पण हल्लीं हे स्त्रियांचे विशिष्ट विकार इतके पसरत चालले आहेत—त्यांचा एवढा अंमल बसत चालला आहे कीं, अल्पवयी कुमारिकेपासून वृद्धा स्त्रीपर्यंत कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत या विशिष्ट रोगांपैकीं एकादा विकार सहसा दिसत नाहीं असें घडतच नाहीं.

जे विकार पुरुषांप्रमाणें स्त्रियांना होतात त्यांजवर पुरुषांप्रमाणें उघड रीतीनें उपचार करतां येतात; परंतु स्त्रीजातीस पुरुषांपेक्षां कांहीं स्थानें (इंद्रियें) योनी, गर्भाशय, अंतःफल व आर्तव वाहक स्रोतें वगैरे. प्रजोत्पत्तीचीं विशिष्ट इंद्रियें असतात व या विशिष्टइंद्रियांतच जे विकार जडतात, यावर उघडप्रमाणें उपचार करतां येत नाहींत. या विशिष्ट इंद्रियाच्या सुस्थितीवरच स्त्रीवर्गाचें सर्व स्त्रीजीवन व आरोग्य अवलंबून असतें. हे विशिष्ट इंद्रियांसंबंधींचे विशेष रोग जडण्याचीं कारणें मन व शरीर यांच्या परस्परावलंबित्वामुळेंच घडत असतात हें मागील विवेचनावरून लक्षांत येण्याजोगें आहे. इतरहि अनेक कारणें घडत असतात त्यांकडेहि लक्ष देणें जरूर आहे; पण इतर कारणापेक्षां आजकाल उपरोक्त रोगांना जें मुख्य कारण मागील विवरणांत दर्शविलें आहे त्याबद्दलचे प्रतिबंधक उपाय योजिल्यास या रोगांचा बराचसा प्रसार कमी होऊं शकेल.

आजकालच्या परिस्थितींत स्त्रियांच्या गुह्येंद्रियासंबंधीं रोगांना जीं कारणें घडत आहेत त्यांचा आतां विचार करूं.

( १ ) अकाल संयोगः—या शब्दांत स्त्रीस रजोदर्शन होण्यापूर्वी व रजोदर्शन झाल्यावर सुद्धां धर्मशास्त्र विरुद्ध-अर्थात् वैद्यक शास्त्रा विरुद्ध नियमित

काल मर्यादा उल्लंघन करून मनास वाटेल त्या कालीं स्त्री संभोग करणें याचा समावेश करावा—अकाल संयोग हेंच स्त्रियांस दुर्बल अवस्था प्राप्त होण्यास मुख्य कारण आहे. हें कारण म्हणजे जवळजवळ अपमृत्युच होय म्हटलें तरीं अतिशयोक्ती होणार नाहीं. याच्या योगानें स्त्री व पुरुष दोघेंहि नीति मार्गापासून भ्रष्ट होऊन अशक्त होतात हें तर झालेंच पण तशा त्या स्थितींत त्यांना अनेक प्रकारचे कायमचे विकार जडतात व त्यांत त्यांचा अंत होतो. ज्या विषयसुखाचे इच्छेनें पुरुष या कर्मास प्रवृत्त होतो; व त्यांत सुख होतें अशी समजूत करून घेतो तीच मुळीं चूक आहे. अशा सुखाच्या नादानें खऱ्या खुऱ्या सुखानंदाचें तो वाटोळें करतो. असेंच म्हणावें लागेल; कारण स्त्री अल्पवयी असल्या कारणानें रतिसुखाचें ज्ञान तिला बहुधा कमीच असतें. तिचीं इंद्रियें अपूर्ण असतात; व अकालीं संभोग करणाराचें वय बहुधा अधिक असल्यामुळें अशा संभोगापासून तिच्या अपूर्ण कोमल इंद्रियांस इजा होऊन पुरुषांस सुद्धां खरें सुख प्राप्त होत नाहीं. हल्लींच्या काळीं मुलगी १२-१३ वर्षाच्या दरम्यान म्हणजे अकालींच ऋतुमती होते; क्वचित् तत्पूर्वींहि होत असल्याचीं उदाहरणें दृष्टोत्पत्तीस येतात. अशा वयांत होणारें रजोदर्शन म्हणजे त्या मुलीच्या भावी आरोग्याची-जीवनांची आपत्तीच होय असें म्हटलें तरी चालेल; कारण मुलगी ऋतुमती झाली म्हणजे तिचें वय कितीहि असो ती गर्भधारणेस योग्य झाली अशीच मुळीं आमच्या लोकांत समजूत आहे; तेव्हां अशा कोमल वयांत जिचीं गर्भाशयादिक इंद्रियें अपूर्ण असतात, जिला रतिसुख म्हणजे काय हें माहीत नसतें तिच्याशीं प्रौढ वयाच्या पुरुषाचा संभोग झाल्यास त्या संभोगापासून त्या मुलिला किती सुख वाटत असेल व तिला उलट त्यामुळें किती त्रास होत असेल याची कल्पनाच करावी. कित्येक नरपशू मुलगी ऋतुमती होण्याचे पूर्वींहि अत्याचार करण्यास निर्ढावलेले असतात तेव्हां अशा स्थितींत होणाऱ्या अकाल संयोगाचें सुख खरोखर पाहिलें तर परस्परांना होत नाहीं तें नाहींच उलट हें पाशवीवर्तन स्त्रियांच्या घाताला मात्र कारणीभूत होत असतें. स्त्री अल्पवयी असल्याकारणानें रतिसुखाचें ज्ञान तिला बहुधा कमीच असतें, तशांत ती मुलगी जर कुलीन घराण्यातील संकोच वृत्तीची व विनयी असेल तर आपलें दुःख अथवा त्रास दर्शविणें अगर बोलून दाखविणें तिला कठीण वाटतें व अत्याचार करणारा पुरुष तिला काळाप्रमाणें भासूं लागतो. या

अत्याचारामुळें तिच्या प्रकृतीवर परिणाम होतो तो होतोच, शिवाय त्या अत्याचाराच्या धास्तीमुळें तिच्या वाढत्या इंद्रियाची वाढ खुजट होते व ती झुरणीस लागून पंडुरोग्याप्रमाणें दिसूं लागते; बरें मुलगी अशिक्षित घराण्यांतील व तिच्या ठिकाणीं संकोच वृत्ती वगैरे नसेल व हल्लींच्या कालमानाप्रमाणें इतरांचें पाहून व कुसंगतीच्या योगानें वर प्रमाणें अकालीं संभोग करण्यापासून तिला भीति वाटत नसेल तर इतरांप्रमाणें आपणहि नेहेमी अशीच मौजेची क्रिया करावी अशा प्रकारच्या विचारामुळें ती त्या कार्यास नेहेमी प्रवृत्त राहते व कदाचित् ती ऋतुमती झालेली नसेल तर या प्रकारानें अकालीं ऋतुमती होते; व असें झालें कीं अल्प वयांतच गर्भधारणादि सोपस्कर होऊन शरीर क्षयाच्या मार्गास लागतें. व त्यामुळें कधीं गर्भपात होतो किंवा प्रसूतावस्थेच्या वेळीं इंद्रियांच्या अपूर्णतेमुळें भयंकर यातना होऊन खुद्द तिच्यावर अगर बालकावर किंवा दोहोंवरहि मृत्यूचा प्रसंग ओढवतो. बरें कदाचित् कोणत्याहि अडचणी न आल्या व सुदैवानें सुख प्रसूती झाली तरी संतति अशक्त, निस्तेज, बुद्धिहीन, आणि अल्पायुषी होते ती होतेच, पण तिच्या प्रकृतीवर वाळंतरोगांच्या भावनेचा अंमल बसतोच बसतो.

रजोदर्शन होण्याचेपूर्वी अगर अल्पवयांत रजोदर्शन झाल्यावर संभोग घडत गेल्यानें रोगास कारण होतें असें वर दर्शविलेंच आहे. याबद्दल बारकाईनें तपास केल्यास हा विषय सर्वांच्या माहितीचा व अनुभवांतील असल्याचें लक्षात येणार आहे; परंतु कालमान फिरल्यामुळें म्हणा अगर कुसंगतीचा दोष म्हणा, बहिर्मुख वृत्ती पुरुषाचें मन विषयसुखानें—विषयसुखाच्या लालसेनें अविचारी बनतें व दूरवर विचार करण्याचें भान त्यास राहत नाहीं व उपरोक्त प्रकारच्या भयंकर परिणामास बहुशः तोच सर्वस्वी कारणीभूत होतो; तेव्हां याबाबतींत पुरुषानेंच अंतर्मुख वृत्ती होऊन विचारानें आपलें मन आपल्या स्वाधीन ठेवलें पाहिजे व त्याप्रमाणें वागलें पाहिजे.

निकोप स्त्रीला, जिच्या ठिकाणीं कोणत्याहि प्रकारचा आर्तव दोष नाहीं अशा स्त्रीला बहुधा दरमहा मुदतशीर बरोबर एकुणतिसाव्या दिवशीं रजोदर्शन होत असतें; व तिला मागें सांगितल्याप्रमाणें चार दिवस शुद्ध आर्तवस्राव होत असतो; अर्थात् रजोदर्शनापासून पांचव्या दिवशीं ती संभोग करण्यास योग्य होते.

आमच्या धर्मशास्त्रांत वर्तनाबद्दल जे नियम सागितले आहेत ते सर्व वैद्यकशास्त्रास अनुसरूनच आहेत; व त्याचा हेतु एवढाच आहे कीं, धर्मामुळें त्यांचें सक्तीनें अवलंबन व्हावें, पण आजकाल धार्मिक भावनेचा फाजील चिकित्सावृत्तीमुळें व मनाच्या कमकुवतपणामुळें लोप होऊं लागला आहे; व लोकांना त्याबद्दलचें महत्त्वहि पण वाटेनासें झालें आहे. धर्मदृष्ट्या नाहीं पण चिकित्सकदृष्टीनें तरी धर्मशास्त्रानें सांगितलेल्या नियमांचा अवलंब करण्याचें कोणी मनावर घेत आहे काय, तर तसेंहि पण दिसत नाहीं. जो तो मनसोक्त वर्तनाच्या आधीन बनत चालला आहे व त्यामुळेंच शरीर, आरोग्य व जीवन यांच्या सुखानंदास मुकत आहेत. आपल्या धर्मशास्त्रांत व वैद्यकशास्त्रांत पुरुषानें स्त्रीसंभोग केव्हां करावा याबद्दल स्पष्ट रीतीनें नियम सांगितले आहेत. पुरुषानें रजोदर्शनापासून पांचव्या दिवशीं स्त्रीसंभोग करावा असें सांगितलें आहे, एवढेंच नव्हे तर त्या दिवशीं शारिरीक-दृष्ट्या कोणत्याहि प्रकारची अडचण नसेल व पति स्त्रीजवळ असेल तर त्यानें त्या दिवशीं संभोग दिला नाहीं तर बालहत्येचा दोष सांगितला आहे. पांचवे दिवसाशिवाय बाकीचे दिवशीं संभोग करावयाचा असेल तर ज्योतिषशास्त्रदृष्ट्या शुभ काल असला पाहिजे. तशा शुभकाला व्यतिरिक्त भलत्याच काळीं संभोग घडल्यास त्यावेळीं होणारा गर्भसंभव त्रासदायक होतो. तशा अशुभ वेळीं रहाणारा गर्भ व्यंग व आरोग्यहीन बनतो व यामुळें मातेला त्रास होतो म्हणजे कोणाचें डोकेंच मोठें तर कोणाचें राक्षसाप्रमाणें विद्रूप तोंड, कोणास पाठीस पाठ चिकट-लेली तर कोणास, कान नाहीं, व कोणास दुसरीं कोणतीं तरी इंद्रियें नाहींत व असल्यास तीं व्यंग अशा प्रकारची संतती होते व ही संतती स्त्रीला दुःखाला कारणीभूत होते. तेव्हां ज्योतिषशास्त्रदृष्ट्या योग्य शुभकाल असा क्वचितच सांप-डावयाचा. तेव्हां रजोदर्शनापासूनचा पांचवा दिवस हाच उक्त ठरतो. त्या पांचवे-दिवसापासून पुढील महिन्याच्या पांचव्या दिवसापर्यंत पुरुषानें ब्रह्मचर्य स्थितींत राहिलें पाहिजे. यदाकदाचित् पहिल्या प्रसंगीं गर्भ संभव झाल्यास स्त्री प्रसूत होऊन पुन्हां वरप्रमाणेंच योग्य काल येईपर्यन्त ब्रह्मचर्य व्रताचेंच त्यानें पालन केलें पाहिजे. गर्भवती स्त्रीशीं संभोग करणें म्हणजे गर्भाचा व स्त्रीचा जवळ जवळ घात करणेंच होय असें म्हणणें वावगें होणार नाहीं. पशू देखील गर्भवती मांदीकडे पहात नाहींत; मग आपण तर मनुष्य आहोंत तेव्हां या बाबतींत

आत्मसंयमनानेंच आपलें वर्तन स्वाधीन ठेवलें पाहिजे; व असें झाल्यानें उभय-तांच्याहि घातक रोगांचा प्रतिबंध होईल.

पुरुषाच्या शरिरांत गर्भोत्पत्तीस लायक असें वीर्य बनण्यास वैद्यकशास्त्रदृष्ट्या त्यांच्या पचनादि क्रियेस अडथळा करणारें कारण नच घडलें तर व त्यानें भक्षण केलेले पदार्थ सात्विक व पौष्टिक असतील तर सरासरी पस्तीस दिवसांचा अवधी लागतो म्हणजे या भक्षण केलेल्या पदार्थांपासून पस्तीस दिवसांनीं वीर्य बनतें. रोजचा पस्तीसावा दिवस असल्यामुळें वीर्योत्पत्ती असतेच; पण रोजची जमा जर खर्च न करितां शिल्लक ठेवली तर एकाच दिवशीं किती तरी उदारपणें खर्च करतां येईल व खऱ्या रतिसुखाचा आनंद उपभोगितां येईल. त्या पुरुषांत खर्च करतांना कंजूषपणा होणार नाहीं व याचकाची त्याच्या इच्छेप्रमाणें तृप्तिहि होईल; व याचक आणि दाता या दोघांनाहि या देवघेवीपासून खरा व सुखमय आनंद भोगतां येईल; शिवाय पुरुषाला शक्तिहीन करणारीं पौष्टीक वीर्यस्तंभक औषधेंहि घेण्याचा प्रसंग येणार नाहीं. सतत संभोग हा दोघांनाहि घातक असतो; त्याचा दोघांच्याहि शरीरप्रकृतीवर अनिष्ट परिणाम होतो व शिवाय नेहेमीं पाय-मल्ली असलेल्या जमिनीवर पाऊस असूनहि जसा अंकूर फुटत नाहीं तद्वत् स्त्रीच्या ठिकाणीं गर्भधारणा होण्यास व्यत्यय येतो व तशांत गर्भधारणा झाली तरी तो गर्भ रोगी व निकृष्ट बनतो. ( या बाबतींत वेश्यांकडे लक्ष द्यावें. त्या धंदा करूं लागल्यापासून शेंकडा कितींना संतती असते ? ) एकंदरींत सांगावयाचें म्हणजे एवढेंच कीं, मर्यादा उल्लंघन झाल्यामुळेंच रोगोत्पत्तीस मुख्य कारण घडत असतें; जगांतील सर्वच घराण्यांत असा प्रकार असेल असें म्हणतां येणार नाहीं हें जरी खरें असलें तरी, बहुतेक ठिकाणीं हा प्रकार घडत असतो असेंच म्हणावें लागेल.

वरील विवेचनावरून स्त्रियांच्या गुह्यरोगाचें बीज कशांत असतें अगर आहे याची साधारण कल्पना होईल. आतां प्रत्यक्ष व्यवहारांत हरघडी घडणाऱ्या गोष्टीविषयीं विचार करूं. स्त्री गृहकृत्यांचे कामामुळें थकून गाढ झोंपलेली असो, किंवा साधारण रोगास्थितीमुळें अशक्त असो, तिकडे लक्ष न देतां तिचा खरा हेतु अगर इच्छा नसतां मुद्दाम स्वतःचेच सुखासाठीं—आपल्या मनाचे समाधा-नाकरितां तिला जागी करून मानीव सुख उपभोगिलें जातें; परंतु यांत खरें

सुख नसतें, खरा आनंद नसतो. दोघांच्या सुप्रसन्न अंतःकरणा-शिवाय खरें सुख असें केव्हांहि प्राप्त होत नसतें. बरें कदाचित् स्त्री सुप्रसन्न असली व पुरुषाकडे वीर्याचा सांठा नसला तर तिचें अंतः-करण शांत करण्याचें सामर्थ्य त्याच्या अंगीं नसतें, नैसर्गिक लज्जेमुळें अमर्याद होऊन ती याविषयीं कांहीं न बोलतां प्राप्त स्थितीस तोंड देते. पुरुषाच्या इच्छेला जर स्त्रीनें मान दिला नाहीं तर त्या प्रसंगीं पुरुषाला किती संताप येईल बरें? तसाच संताप तिच्या इच्छेच्या प्रसंगीं पुरुषाच्या असमर्थतेमुळें तिलाहि होणें साहजिक आहे, पण या बाबतींत पुरुषानेंच विचार केला पाहिजे; परंतु तो त्या प्रसंगीं त्याचेकडून होत नाहीं; व भिन्न स्थितीमुळें दोघेंही परस्परांपासून मिळणाऱ्या खऱ्या सुखानंदास मुकलीं जातात; आणि हाच प्रकार स्त्रियांच्या योनिगत विका-राला कारणीभूत होऊं शकतो. पुरुषाकडून स्त्रीचें समाधान न झाल्यास योनि-स्थित वात उष्णतेनें विकारी होऊन त्यामुळें योनिमार्गास शोथ होऊन तो अगदीं संकुचित होतो व त्यामुळें योनिशूळ, पीडितार्तव, नष्टार्तव अशा विकारांचा उगम होतो. शिवाय, उपरोक्त प्रकारच्या अविचारी विहाराच्या मुदतींत आहारादिकांचे अजीर्णाशादि धर्माचें साह्य होऊन त्यापासून कफ, पित्त, वात जे शरिराचे आधारस्तंभ त्रिदोष ते सर्व अगर त्यांपैकीं कित्येक दूषित होऊन निरनिराळ्या व्याधीस कारणीभूत होतात.

अशा प्रकारच्या स्त्रियांच्या व्याधीवर उपचार करण्यास या विषयाच्या माहीत-गार उत्तम शिक्षणाच्या स्त्रियाच पाहिजेत. आपल्या गुप्त व्याधींची माहिती अगर दुःख स्त्रियांना जसें स्त्रियांशींच बोलून दाखवितां येतें तसें पुरुषांकडे त्या नैस-र्गिक विनय लज्जेमुळें बोलून दाखवीत नसतात; एवढेंच नव्हे प्रत्यक्ष स्वतःच्या पतीशीं सुद्धां त्या या बाबतींत बोलत नसतात. ज्यावेळीं विकार अनावर होऊन असह्य दुःख होऊं लागतें त्यावेळीं निरुपायामुळें मग पुरुषाकडे त्याबद्दलची दाद लागते; शेवटीं विकार अनावर स्थितींत गेल्यानंतर उपचारांना सुरवात होते. अर्थात् तें कितपत फलद्रूप होणार? असो. एकंदरींत सांगावयाचें म्हणजे एवढेंच कीं, ज्या उपरोक्त कारणांनीं रोगोत्पत्तीस आधार होतो तीं कारणें दूर केल्यावर रोगोत्पत्तीस सहसा जागा राहणार नाहीं व त्यामुळें उभयतांसहि खरा सुखानंद प्राप्त होणार आहे.

# प्रकरण २ रें

## स्त्रियांची नैसर्गिक अवस्था

शारीरिकदृष्ट्या आमच्या स्त्रीवर्गाची स्थिती कशा प्रकारची बनत चालली आहे याचें ठोकळपणें दिग्दर्शन वरील प्रकरणांत केलें आहे. आपल्या स्त्री-वर्गाच्या उन्नतीसाठीं "स्त्रियोन्नती" या पोक्त नांवाखालीं हल्लीं जिकडे तिकडे समान हक्कांबद्दल बोलबाला सुरू आहे; व पुरुषांप्रमाणेंच उच्च शिक्षण संपादन केलेल्या कित्येक विदुषीकडूनहि त्या बाबतींत चळवळ चालविली जात आहे. प्रत्येक बाबतींत स्त्रीपुरुषांचे हक्क समान असावेत, पुरुषांप्रमाणेंच स्त्रियांनीं प्रत्येक गोष्टींत-विषयांत सामील होऊन समानतेनें वागावें असा मुद्दा या चळवळींत पुढें आणण्यांत येत आहे; व त्यांतच आणखी नवमतवाद—नवनीती हे वैषयिक विषय समाविष्ट होऊं पहात आहेत. या बाबतींत मुख्यतः विशेष रीतीनें लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हटली म्हणजे, हा नवमतवादाचा—नवनीतीचा पुरस्कार मुख्यतः पुरुषवर्गाकडूनच होत आहे. शारीरिकदृष्ट्या खालावत चाललेल्या स्त्री-वर्गाच्या दृष्टीनें या बाबतींत विचार करतां त्याविषयीं बरेंचसें लिहावें लागेल; परंतु आपला स्त्रीवर्ग शारीरिक व मानसिकदृष्ट्या खालावत चालला आहे. त्याच्या कारणाचें निवारण कोणत्या उपायांनीं करावें याचाच विचार प्रस्तुत प्रसंगीं करावयाचा असल्यामुळें उपरोक्त विवादिक विषय बाजूला ठेंवणेंच इष्ट दिसतें.

स्थित्यंतर हा सृष्टीचा अबाधित नियम आहे. व या स्थित्यंतरास अनुसरूनच परिस्थितीप्रमाणें प्रत्येकांच्या आचारविचारामध्यें बदल होत असतो; आणि जरी तसा तो होत असला तरी प्रत्येकाची जी नैसर्गिक प्रकृती असते तींत केव्हांही बदल होणें शक्य नसतें. हजारों वर्षांपूर्वीं आपल्या शोधक ऋषींनीं असंख्य वनस्पतींच्या आंगच्या गुणधर्माचें संशोधन करून त्यांच्या आंगचे जे प्रभावी गूण जगाला सांगितले, तेच गूण आज कैक हजार वर्षांचा काळ लोटला, अनेक स्थित्यंतरें झालीं, होत असलीं तरी त्या वनस्पतींच्या आंगच्या गुणधर्मांत तिलप्राय स्थित्यंतर घडलेलें नाहीं. हाच नियम मानव स्त्रीपुरुषांच्या नैसर्गिक प्रकृतीस लागू आहे. स्थित्यंतराबरोबर आचारविचार बदलले—बदलत आहेत तथापि त्यांच्या नैसर्गिक प्रकृतींत बदल झालेला नाहीं व होणारहि नाहीं. परिस्थितीशीं संलग्न होऊन बदलणाऱ्या विचारां प्रमाणें आपल्याकडून जो आचार

घडतो तो जर आपल्या नैसर्गिक प्रकृतीला विरोधक असेल, तर त्याचा परिणाम आपल्या मनाबरोबरच शारीरिक प्रकृतीवर झाल्यावांचून केव्हांहि रहाणार नाहीं; म्हणूनच नैसर्गिक प्रकृतीला पोषक होतील—हितावह होतील अशा प्रकारचे संस्कार मनावर होण्यासाठीं त्या विचारांचा प्रसार झाला पाहिजे. कोणत्याहि विचारांचा प्रसार त्या त्या कालीं प्रसृत होणाऱ्या वाङ्मयानें होत असतो. वाङ्मय विचारसरणींत क्रांती घडवून आणतें व त्या क्रांतीचा परिणाम मग समाजाच्या आचारावर—अनुकरणावर घडत असतो. आजकालच्या अनारोग्यतेस जीं अनेक कारणें घडत आहेत त्यांपैकीं सांप्रतकालीं प्रसृत होणारें विशिष्ट विचारांचें वाङ्मय होंहि एक बव्हंशी कारण आहे असें म्हटल्यास गैर होणार नाहीं.

मानवी आरोग्य जन्मदात्या आईबापाच्या सुदृढ प्रकृतीवर अवलंबून असतें हें जरी खरें असतें तरी तें पुढें टिकविणें अगर वाढविणें हें प्रत्येक व्यक्तीच्या हातचें असतें. भलत्या सलत्या वाङ्मयाच्या वाचनानें मनावर होणारे अनिष्ट परिणाम अर्थात् मनोविकार हे आरोग्य बिघडविण्यास मुख्यतः कारणीभूत होत असतात; तेव्हां ही गोष्ट मुख्यतः विचारांत घेणें फार अगत्याचें आहे.

हल्लींच्या काळीं मनोविकार जागृत होणाऱ्या गोष्टी बऱ्याच झाल्या असून दिवसेंदिवस त्यांत भर पडतच चाललेली आहे. आजकाल ज्यांचा भयंकर प्रसार होत आहे तो सिनेमा, नाटकें, श्रृंगारिक कादंबऱ्या, प्रणयी लघुकथा, तसेंच उत्तेजक असा आहारविहार, सिनेमा नाटकांतील देखाव्यांस अनुसरून तदनुरूप निरनिराळ्या प्रकारच्या श्रृंगारीक पोषाखाची प्रथा आणि देहाला निरनिराळ्या प्रकारें आकर्षकता आणणारीं साधनें, सहशिक्षणाचा प्रसार, स्त्री स्वातंत्र्याचा बोलबाला वगैरे निरनिराळ्या प्रकारांना ऊत येऊं लागल्यामुळें साहजिकच त्यांचा परिणाम पुरुषांप्रमाणेंच स्त्रियांच्याहि मनावर होऊन तो त्यांच्या शारीरिक अधोगतीला कारणीभूत होऊं लागला आहे—झाला आहे.

स्त्रियांच्या आरोग्याची मदार त्यांचा सुस्थितींतील गर्भाशय व त्यांचे नैसर्गिक विशिष्ट धर्म यांच्या व्यवस्थित अवस्थेवर मुख्यतः अवलंबून असते. हें वर दर्शविलें आहेच. आपल्या देशांत स्त्री आपल्या वयाच्या १२।१३ वर्षांनंतर तारुण्याच्या प्रांगणांत प्रवेश करते. तिची शरीरप्रकृती जर निकोप असेल तर या सुमारासमुद्धां तिचें प्रथम आर्तवोत्सर्जन होतें. आर्तवोत्सर्जन अथवा रजःस्राव हा स्त्रियांना त्यांच्या

वयाच्या ४५ पासून ५० वर्षांपर्यंत दरमहा नियमितपणें होत असतो. रजःस्राव हा स्त्रीच्या गर्भाशयांतून योनी मार्गानें होत असतो, व तो जेव्हां पहिल्यानेंच सुरू होतो तेव्हां तिच्या मानसिक व शारीरिक स्थितींत एकदम फरक पडूं लागतो. तिच्या चेहऱ्यांत व शरिरांत एकदम बदल होतो, वर्ण सतेज होतो, चेहरा मोठा व प्रफुल्लीत दिसतो, तिची चालण्या सवरण्याची ढब मनोहर दिसते, तसेंच तिचें भाषण मर्यादशील व मधुर होते एवढेंच नव्हे तिच्या आवाजांत सुद्धां बदल होतो, सर्व शरीर विशेषतः तिचे स्तन मोठे व स्थूल होतात, तिचें मन पोरकट खेळ-ण्याच्या गोष्टीकडे न जातां तिच्या ठिकाणीं प्रौढावस्था दिसूं लागून तें विचारी बनतें. हळुहळु तिच्या आंतील व बाहेरील जननेंद्रियांचा विकास होऊं लागतो व सतरा अठरा वर्षां नंतरच्या सुमारास त्या इंद्रियाना पूर्णत्व प्राप्त होतें.

आपल्या देशांत सर्व साधारणपणें तरी चौदा वर्षांच्या सुमारास स्त्रीला प्रथम आर्तवोत्सर्जन अथवा ऋतु येतो असें म्हणण्यास हरकत नाहीं. हा ऋतु येणाचा काल हवापाण्यापेक्षां रहाणी व चालीरीतीवरच विशेष अवलंबून असतो. मध्यम स्थितींतील मुलीस १३।१४ वर्षांच्या दरम्यान ऋतु येतो असें गृहीत धरलें तर श्रीमंतांच्या—ऐषारामांत असणाऱ्या मुलींना त्यापूर्वींच येतो; तसेंच खेड्यांत काबाड कष्ट करून रहाणाऱ्या मुलींपेक्षां शहरांत राहणाऱ्या व शृंगारिक विषय जिच्या वारंवार नजरेस येतात, अशा लिहिणाऱ्या वाचणाऱ्या मुलीस चौदा वर्षांच्या पूर्वींच ऋतुकाल होत असतो असें दिसून येतें. प्रथम आर्तवोत्सर्जन झालें म्हणजे स्त्री केव्हांहि गर्भधारणेस समर्थ झाली असें समजावयांचें नाहीं. याचें दिग्दर्शन मागें केलेंच आहे. यावेळीं जरी तिच्या गर्भाशयाची स्थिती कांहीं अंशीं पूर्णत्वास पोंचलेली असली तरी गर्भाशय व तत्संबंधींचीं इतर इंद्रियें यांच्या ठिकाणीं गर्भधारण व गर्भपोषण यांचे साठीं जेवढा लवचिकपणा व सामर्थ्य असलें पाहिजे तेवढें आलेलें नसतें. स्त्री जर निकोप प्रकृतीची असेल तर तें सतरा अठरा वर्षांनंतर व वीस वर्षांच्या दरम्यान प्राप्त होत असतें.

प्रथम आर्तवोत्सर्जनाच्या वेळीं बहुधा सर्व मुलींना सूचक लक्षणें होत असतात; व तीं थोडीशीं त्रासदायक असतात. हीं सूचक लक्षणें म्हटलीं म्हणजे, पाठींत दुखणें, मांड्या व पाय दुखणें, क्षुधा मंदावणें, मलावरोध होणें, डोळे दुखणें, मज्जाविकार म्हणजे फीट येणें अशीं लक्षणें होतात. हीं लक्षणें प्रथमच्या खेपेस

जेवढीं त्रासदायक होतात तेवढीं त्रासदायक तीं मग पुढें होत नसतात. हा रजःस्राव अथवा आर्तवस्राव कांहींसा काळसर, आरक्त व पातळ असून त्यास एक प्रकारचा दर्प येतो. हा स्राव गर्भाशयाच्या अंतःस्त्वचेंतील सूक्ष्म रक्तवाहिन्या फुटून होत असल्यानें त्यांत रोगजंतूंचा प्रवेश झाल्यास ज्वर, वात, भूतोन्माद, धनुर्वात अशा सारखे विकार होण्याचा फार संभव असतो. गर्भाशयांतील अंतःस्त्वचेच्या लहान लहान तुकड्यांचें योनींतील श्लेष्मलस्रावाशीं मिश्रण होतें व योनींतील दुसऱ्या आम्लस्रावाशीं त्याचें मिश्रण होत असल्यामुळें इतर दुसरें रक्त जसें गोठतें तसें आर्तव गोठत नाहीं; पण लवकर कुजतो. त्याचा कपड्यावर डागहि पण पडत नाहीं. आपल्या आयुर्वेदांत शुद्ध आर्तवाचें लक्षण पुढीलप्रमाणें सांगितलें आहे—

> शशासृक्प्रतिमंययच्च यद्वालाक्षारसोपमम् ॥
> तदार्तवं प्रशंसन्ति यच्चाप्सु न विरज्यते ॥

जें आर्तव शशाच्या रक्ताप्रमाणें किंवा लाक्षारसाप्रमाणें ( अळित्याप्रमाणें ) लाल असतें आणि ज्या आर्तवानें भिजलेलें वस्त्र धुतलें असतां त्याचा डाग राहत नाहीं तें आर्तव शुद्ध आहे असें समजावें.

> मासान्निपिच्छ दाहार्ति पंचरात्रानु बन्धि च ।
> नैवाति बहु नात्यल्पमार्तवं शुद्ध मादिशेत् ॥

तसेंच जें आर्तव बुळबुळीत नसून दाह व शूळ यांनीं विरहीत असतें, तसेंच प्रत्येक महिन्यांतून एकदां पांच दिवसपर्यंत नियमित स्रवतें व जें अतिशय किंवा कमी नसतें तें शुद्धार्तव जाणावें.

असें जरी असलें तरी आर्तवस्राव जाण्याचें प्रमाण प्रकृती व राहणी यांवरच बहुधा अवलंबून असतें. शिवाय एकाच हवेंत राहणाऱ्या स्त्रियांत यांचें प्रमाण सारखेंच नसतें. त्याचप्रमाणें प्रत्येक स्त्रीच्या प्रत्येक खेपेच्या स्रावाचें प्रमाणहि एकसारखें असत नाहीं. आपल्या देशांत निरोगी स्त्रीच्या स्रावाचें प्रमाण सरासरी पंधरा तोळे म्हणजे सहा औंस असतें असें अनुभवावरून ठरविण्यांत आलें आहे. तथापि व्यायाम किंवा मैथुन यांनीं गर्भाशयच्या श्लेष्मल त्वचेंत ज्या प्रमाणांत रक्त संचय होईल त्याप्रमाणें कमज्यास्ती प्रमाणांतहि स्राव होत असतो. प्रत्येक पाळीस

प्रत्येक स्त्रीस अमुकच दिवस स्राव जातो असा नियम नाहीं. कांहीं स्त्रियांना नेमक्या दिवशीं नेमक्या तासाला स्राव होतो व कांहींना कोणत्याहि प्रकारचा त्रास वगैरे न होतां आगे मागें स्राव होतो. तर कांहींचा सहा सात दिवससुद्धां स्राव होत असतो. कित्येक स्त्रियांचा आरंभी थोडे दिवस स्राव जातो व पुढेंपुढें त्याचे दिवस वाढतात. या स्रावाचा सुद्धां प्रकृती व राहणी यांच्याशीं निकट संबंध आहे. खेड्यांतील स्त्रियांपेक्षां शहरांतील स्त्रियांचा स्राव ज्यास्त दिवस चालतो, तसेंच अशक्त व चैनींत रहाणाऱ्या स्त्रियांचा स्राव सशक्त व काबाड-कष्ट करणाऱ्या स्त्रियांपेक्षां ज्यास्त दिवस राहतो. एका पाळीच्या आरंभापासून दुसऱ्या पाळीच्या आरंभापर्यंत पुष्कळांना नेमके अठ्ठावीस दिवस जातात; परंतु कित्येकांचे बरेच कमज्यास्तीहि पण दिवस जातात. यामुळें या बाबतींत एकच नियम असा बांधतां येत नाहीं. तथापि चार आठवड्यांनीं दुसरी पाळी येते असें मानण्यास हरकत नाहीं. हा स्राव जाण्याच्या क्रियामुळें स्त्रियांचा गर्भाशय, गर्भ-धारणेस व पोषणास समर्थ होतो. अर्थात् प्रथम आर्तव स्रावापूर्वी व स्राव बंद झाल्यावर गर्भधारणा होणें संभवनीय नाहीं. स्राव होऊन गेल्यानंतर लगेच गर्भ-धारणा होण्याचा विशेष संभव असतो. स्त्रीला वृद्धावस्था प्राप्त होण्याच्या सुमारास तिला स्राव जाण्याची क्रिया बंद होते. प्रथम स्राव सुरू होण्याचे वेळीं जर तो लौकर सुरू झाला असेल तर तो त्या मानानें उशिरां बंद होतो. बारा वर्षांच्या सुमारास जर तो सुरू झाला असेल तर तो पंचेचाळीस वर्षांच्या आंतच बंद होतो; परंतु तो जर सोळा किंवा अठरा वर्षांपर्यंत लांबला तर तो पन्नास किंवा साठ वर्षांपर्यंत सुद्धां सुरू राहतो असें दिसतें. यापुढें स्त्रियांची गर्भधारणाहि होत नसते. एकंदरींत याचें प्रमाण प्रथम स्राव सुरू झाल्यापासून सुमारें तीस वर्षां-नंतर तो कायमचा बंद होतो असें ठरविण्यांत आलें आहे.

हा स्राव बंद होण्याचा काळ स्त्रियांना मोठा कष्टप्रद जात असतो. स्राव बंद झाल्यामुळें प्रजोत्पादन शक्तीहि नष्ट होते व त्यापासून स्त्रीच्या शरिरांत बराच फरक होऊन त्रासहि होतो. सरसहा सर्वच स्त्रियांना त्रास होतो असें दिसत नाहीं. यावेळीं स्त्रीचा मेंदू संतप्त होतो; व त्यामुळें उन्मादासारखें शारीरिक व मानसिक विकार तिला होत असतात. क्वचित् बुद्धीमध्यें सुद्धां फरक होतो. शरीरांत रक्त-संचय जास्त झाल्याचें द्योतक डोकें दुखणें, फीट येणें, रक्ताची उलटी होणें,

मूळव्याध हीं लक्षणें होत असतात; केव्हां केव्हां या सुमारास दुसरे घातुक विकारहि होतात. ग्रंथी होणें, नाक, फुप्फूस, कोठा, त्वचेवरील व्रण यांतून रक्त वाहणें असा विकारहि होण्याचा संभव असतो. एकंदरींत शरिरांत जास्त झालेला रक्तसंचय कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत श्लेष्मल त्वचेंतून बाहेर काढण्याचा प्रकृतीचा यत्न असावा असें दिसतें.

स्त्रीचें आर्तवोत्सर्जन झाल्या दिवसापासून सर्वसाधारण तीन दिवस स्राव होतो असें वर दर्शविलें आहे. तेव्हां हे तीन दिवस तिनें अस्पर्श स्थितींत व्रताप्रमाणें पाळावे असा आमच्या धर्मशास्त्राचा सक्त निर्बंध आहे. आमच्या धर्मशास्त्रांत जे निर्बंध सांगितले आहेत ते सर्व वैद्यशास्त्रास अनुसरून सांगितले आहेत. धर्माचा निर्बंध घालण्याचें कारण सक्तीनें त्यांचें पालन व्हावें असाच आहे, पण आज काल दिवसेंदिवस धार्मिक भावनेचा लोप होत चालला असून त्याऐवजीं प्रत्येक विषयाकडे चिकित्सक दृष्टीनें पाहण्याकडे बहुतेकांच्या मनाचा कल झुकूं लागला आहे; पण त्या चिकित्सक दृष्टीप्रमाणें तरी वागणूक होत आहे असेंहि म्हणतां येत नाहीं.

---

# प्रकरण ३ रें
## अनारोग्यकारक इतर प्रकार

मन, मेंदू व शरीर या त्रयींचा एकमेकांशीं निगडीत संबंध असून मानवी-जीवनाचें सुखदुःख अथवा आरोग्य व अनारोग्य यांची स्थिती सर्वस्वी या त्रयींवरच आधारभूत असते. शरीराच्या आरोग्यासाठीं किंवा ताकद वाढण्यासाठीं आपण कोणतेंहि पौष्टिक अन्न सेवन केलें अगर कोणतेंहि शक्तिवर्धक औषध घेतलें तरी जर मनःस्वास्थ्य नसेल, मन विवंचनेनें, काळजीनें व्याप्त असेल तर तशा औषधाचा अगर अन्नाचा परिणाम आपल्या शरीरावर सहसा होणार नाहीं. " मन एवं मनुष्याणाम् कारणं बंध मोक्षयोः " अशी जी उक्ती आहे तिचा तथ्यांश एवढाच आहे कीं, मनुष्याच्या ऐहिक सुखदुःखाला मनच सर्वस्वी कारण आहे. मनापासून रोग होतात व मनापासून ते नष्ट होतात. मनाच्या संस्कृतीवर देहाचें हितानहित अवलंबून असतें. आपल्या देहाचे कळत न कळत घडणारे एकंदर व्यापार मनावर अवलंबून असतात. यामुळें मन हेंच शारीरस्वास्थ्याला अगर अस्वस्थतेला कारणीभूत असतें. मनोभावाच्या सामर्थ्यामुळेंच मानवी देहांत रोगोत्पत्ती होत असते. नैसर्गिक प्रकृतीच्या विरुद्ध दिशेनें मनाचे व्यापार व्यवहार सुरू झाले कीं रोगबीज पैदा झालेंच पाहिजे म्हणून समजावें. आजकाल हिस्टिरीआ—फीटस् आदी-करून मानसिक रोग तरुण स्त्रियांत कितीतरी झपाट्यानें वाढत असल्याचें त्या दृष्टीनें पाहणारास दिसून येईल. शरीरास जरूर असणाऱ्या व्यायामाचा अभाव, खाण्यापिण्यांत, आचारविचार-विहारांत निसर्ग विरुद्ध वर्तन, अनेक मनोविकारांच्या आधीन मनाची स्थिती अशा निरनिराळ्या विरुद्ध कारणांनीं शरीरांत निरनिराळीं रोगबीजें पेरलीं जात आहेत. त्यामुळें निरनिराळे गर्भाशय संबंधीचे विकार, लवकर, लवकर बाळंतपणें व त्यामुळें जडणारा बाळंत रोग, पंडुरोग, याची वृद्धि होऊं लागली आहे. सर्वत्र पसरत चाललेला कृत्रिमपणा सोडून आपापल्या धर्माप्रमाणें, आपल्या पूर्वापार चालीरीती प्रमाणें साधी राहणी, युक्त आहारविहार व भलत्याच मोहांना बळी पडणाऱ्या मनाचें परिवर्तनानें संवर्धन या गोष्टींचा जर सक्तीनें अवलंब केला जाईल तरच दिवसेंदिवस घसरत चाललेल्या आपल्या स्त्रीवर्गाच्या सुधारणेची आशा करण्यास थोडा तरी वाव सांपडेल.

# आजच्या स्त्रियांचें आरोग्य

स्त्रीचे शरीरांत विशेष धर्म कोणते व ते कशा प्रकारचे असतात, तिची नैसर्गिक प्रकृती कशी असते याची साधारण ठोकळ रूपरेषा मागील विवेचनावरून ध्यानीं येणार आहे. स्त्री काय किंवा पुरुष काय त्यांच्या नैसर्गिक प्रकृतींतच व्यक्तिशः त्यांच्या व तदनुषंगानें समाजाच्या भावी उन्नतीचें. हित सांठवलेलें असतें. तेव्हां कोणाच्याहि नैसर्गिक प्रकृतीला पोषक अशा प्रकारच्या शैक्षणिक अथवा मानसिक उन्नती करण्याची प्रयत्नाची जोड मिळाल्यास त्यामुळें व्यक्ति-समाजाचें केव्हांहि हितच होणार आहे. नैसर्गिकपणें भिन्न स्थितींत असणाऱ्या प्रकृती समान स्थितींत आणण्याचा कृत्रिम प्रयत्न केल्यास तो केव्हांहि हितावह होणार नाहीं. स्त्रियांची जी नैसर्गीक प्रकृती असते त्याकडे उन्नतीच्या नांवाखालीं दुर्लक्ष करून तिच्या विरुद्ध दिशेनें तिच्या उन्नतीचे प्रयत्न केले व बाह्यात्कारी जरी उन्नतीचा देखावा दाखविला तरी त्यानें नैसर्गीक प्रकृतीला अपाय पोंचून समाजाची घडी विस्कळीत झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

लेखक, कवि, ग्रंथकार, शास्त्रज्ञ, वक्ते हे समाजाचे मार्गदर्शक व गुरु होत. कोणतेंहि मत किंवा वाद उपस्थित करून समाजांत त्याचा प्रसार करतांना समाज विकसित, ज्ञानसंपन्न, सुखी व नीतिमान होईल अशाच स्वरूपाच्या वादाचें व मताचें वाङ्मय प्रसृत करणें हें अशा लोकांचें कर्तव्य असतें. आजकाल आमच्या स्त्रीवर्गाची शारीरिक स्थिती कष्टमय होण्यास जीं निरनिराळ्या स्वरूपांचीं कारणें घडत आहेत, घडलीं आहेत व घडूं पहात आहेत यांपैकीं आधुनिक प्रसृत होणारें विशिष्ट प्रकारचें व विशिष्ट विचारांचें वाङ्मय हेंहि प्रमुख कारण म्हणावें लागेल. समाजांत प्रसृत होणारें वाङ्मय जशा प्रकारचें असेल तशा प्रकारें समाजाचा आचार–विचार–घटना यांत फेरबदल होत असतो, व म्हणूनच समाजहितेच्छु वाङ्मय प्रचारकांवर विशिष्ट प्रकारची जबाबदारी असते. त्या जबाबदारीकडे दुर्लक्ष करून एकाद्या विकृत भावनांधतेनें हटातटाच्या निश्चयानें एकादें विशिष्ट प्रकारचें वाङ्मय प्रसृत करण्याचा प्रयत्न झाल्यास तो केव्हांहि फलद्रूप अगर हिताचा ठरणार नाहीं. मनुष्याच्या नैसर्गिक प्रकृतीशीं सुसंबंध असणाऱ्या मनावरच प्रथमतः शरिरापेक्षां परिणाम होत असतो. वाङ्मय जसें सुष्ट दुष्ट असेल तसा त्याचा समाजांत बरावाईट परिणाम होत असतो. चांगला परिणाम मनाची प्रसन्नता वाढवितो तर दुष्ट परिणाम मनाची खिन्नता

वाढवितो, मनाला मोहांध बनवितो, किंवा खिन्नता वाढूं लागते. मन खचूं लागतें व त्यांतील जीव नष्ट होऊन दुष्ट विचारांचा पगडा मनावर बसून तें सारखें त्याच त्याच विषयाचा ध्यास घेऊं लागतें. व त्यामुळें व्यक्तिगत शरिरावर व पर्यायानें समाजावर त्याचा अनिष्ट परिणाम होऊन फार नुकसान होतें.

हल्लीं जिकडे तिकडे ज्याचा बोलबाला चाललेला आहे व जो सर्वत्र प्रचलित करण्याचा प्रयत्न सुरू आहे तो नवमतवाद अगर नवनीति यांच्या बाबतींत सुद्धां वरील विचारसरणी लक्षांत वागविणें अगत्याचें आहे. हा नवमतवाद किंवा नवनीति प्रचलीत करणाऱ्यामध्यें त्याची भावना कशाहि स्वरूपाची असो, तिच्यांत, दोष असो किंवा हित असो अगर तो विकृत असो किंवा अविकृत असो त्याचें स्वरूप कशाहि प्रकारचें असो, परंतु भावनांधतेच्या आधीन होऊन व स्त्री अगर पुरुषांच्या नैसर्गिक प्रकृतीकडे दुर्लक्ष करून सर्वतंत्र स्वतंत्र बनविण्याचा प्रयत्न करणें केव्हांहि घातकच ठरेल.

एकंदरींत सांगावयाचें म्हणजे एवढेंच कीं स्त्रियांच्या आरोग्यदृष्ट्या दुरवस्थेला कौटुंबिक, सामाजिक वगैरे जीं निरनिराळीं व निरनिराळ्या प्रकारचीं कारणें घडत आहेत त्यांपैकीं आजकाल प्रसृत होणारें विशिष्ट प्रकारचें वाङ्मय हेंही एक प्रमुख कारण आहे. असें विचाराअंतीं म्हणणें भाग आहे.

# प्रकरण ४ थें

## विवाह व त्याचें नैसर्गिक व व्यावहारिक महत्त्व.

स्त्रीपुरुषांच्या जीवनांत विवाह ही फार महत्त्वाची बाब आहे. विवाह होऊन तरुण स्त्रीपुरुषांनीं संसारांत पदार्पण केल्यानंतर, एकप्रकारची अंगावर जबाबदारी पडते. स्त्रीला पुरुषांचें अर्धांग म्हटलें आहे. त्यानें विवाह केल्याशिवाय त्याची पुरुष या संज्ञेला पूर्णता येत नाहीं. पाश्चात्यांप्रमाणें विवाह हा करार नसून ह्या संसारी जीवनाची नौका वहाण्याची परस्परांवर सप्तपदीच्या “ **धर्मेच, अर्थेच, कामेच नातिचरामि** या मंत्रानें समान हक्काची जबाबदारीच पडलेली आहे. एकमेक दोघांना पुरक आहेत.” प्रत्येकजण आपल्या क्षेत्रांत स्वतंत्र व जबाबदार असतो. प्रत्येकानें आपआपल्या निसर्गाच्या नियमानुसार अंगावर जबाबदारी घेतली म्हणजे ती गुलामगिरी नव्हे. गुलामगिरी समजणें हेंच मुळीं अज्ञानाचें द्योतक आहे, असें मानणें अतिशयोक्तीचें नाहीं. हा पुरुषीस्वार्थ आहे. कौमार्यावस्थेंतून विवाहामध्यें पदार्पण केल्यानंतर स्त्रीच्या अंगावर पुरुषांपेक्षां मोठी जबाबदारी पडत असते, व ही पार पाडणें तिचें आद्यकर्तव्य आहे. तारुण्यांत प्रत्येकाच्या महत्त्वाकांक्षा मोठ्या असतात. मग त्याला स्त्री अपवाद कशी ठरणार ? मुलगी गरीब अगर श्रीमंत असो, प्रत्येक कुमारिका आपल्याला हृदयांत, श्रीमंत अशा पतीची इच्छा बाळगत असते, व ही इच्छा तिच्या इच्छेनुसार कधीं शक्य होते तर कधीं अशक्य होते; परंतु विवाह ही गोष्ट झाल्याबरोबर मागील सर्व गोष्टी विसरून या नवीन जन्म झालेल्या घरांमध्यें पतीच्या–परस्परांच्या इच्छेप्रमाणें वागणें, हें दोघांना सुखदायक होतें. प्रेम, आत्मत्याग, विश्वास संपादन करणें, ह्या गोष्टी अंगीं बाणून त्याप्रमाणें वर्तन करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. पुरुषाला स्त्री ही देणगी आहे, चेतना आहे, स्फूर्ति आहे. पुरुषांच्या आयुष्यांत विवाह झाल्यानंतर स्वभावांत, वागणुकींत क्रांति होत असते. पुष्कळ वेळां पुरुषच स्त्रीचा गुलाम होत असतो. साधारणपणें पुरुष आपल्या पत्नीच्या इच्छेबाहेर जात नाहीं, परंतु त्याबरोबरच कोणत्याही स्त्रीनें पुरुषांत असलेल्या नैसर्गिक कमकुवतपणाचा आपल्या स्वार्था-करितां दुरुपयोग करूं नये. प्रेम ही चीज बाजारांत मिळत नाहीं, त्याचप्रमाणें प्रथम दर्शनीं वाटणारें प्रेम. हें खरें प्रेम नसून तें वैषयिक असतें. वैषक्तिक प्रेम चिरकालीन टिकत नाहीं. परस्परांच्या मानसिक, शारीरिक संघटणानें होणारें

प्रेमच चिरकालीन असतें. आपल्याकडे पूर्वकालीन बालविवाह पाहिले तर त्यांच्या मुळांशीं ह्राच हेतु होता. व्यवहारांत सुद्धां आपल्याला हलुहलु होणारी गोष्ट टिकाऊ होते हें आपण पहातों, त्याचप्रमाणें प्रेम ही चीज आहे. माझ्यावर प्रेम करा म्हणून सांगितल्यानें प्रेम प्राप्त होत नाहीं, तर प्रेम हा परस्परांच्या आकर्षतेचा दुवा आहे. एखादी श्रीमंत मुलगी असली तर तिच्या दुर्दैवानें तिच्या तोडीचा पति मिळत नाहीं, म्हणून मिळाल्यास मन दुःखी करून राहण्यापेक्षां प्राप्त झालेल्या परिस्थितींशीं तादात्म्य पावणें हेंच स्त्रीवर्गाचें पत्नी या नात्यानें कर्तव्य होय. समान हक्कांची ओरड करणारे स्त्रीपुरुष आपल्यावर पाळी आली नाहीं तोंपर्यंत दुसऱ्यांना त्या हक्काचे धडे देत असतात, अशा लोकांना परमेश्वरानें केलेली स्त्री पुरुषांची शारीरिक इंद्रियविज्ञानशास्त्रांची माहिती नसते. सुशिक्षित स्त्रिया म्हणजे पुरुषीशिक्षण घेतलेल्या स्त्रिया यांना मुलें होणें—म्हणजे जबाबदारी व त्रासदायक, सौंदर्य हानी करणारें ओझें लग्नानंतर आपल्या मस्तकावर पडणार म्हणून किती तरी भिती वाटत असते, व त्यामुळें लग्न न करितां अविवाहित रहाण्याचेंच त्या पसंत करतात, परंतु स्त्री ही निसर्गाच्या नियमानुसार भावि संतति होण्याकरितांच जन्मलेली आहे हें विसरून चालणार नाहीं. बरें अविवाहित राहणाऱ्या कुमारिका अगर पुरुष पाहिले असतां कोणत्या ना कोणत्या मार्गानें आपली विषयवासना पुरी करून घेत असतात, मग हें का यांचें उत्तर ? थोडक्यांत म्हणजे स्वार्थ व आपल्यावर जबाबदारी नको हेंच म्हणतां येईल. निसर्ग आपलें कार्य नियमानुसार बजावत असतो, व तें सुशिक्षित असो अगर अशिक्षित असो, प्रत्येकाला त्यामधून जावें लागत असतें, मग हा वृथा-भिमान कशाला पाहिजे ? बरें अशा व्यक्तींची प्रकृति सुदृढ कां नसावी ? ज्यांना अविवाहित राहून ब्रह्मचर्य पाळतां येतें, त्यांची शरीरकाया तेजःपुंज कां दिसूं नये ? यांचा कोणी कधीं विचार केला आहे ? तात्पर्य काय स्वार्थापुढें मनुष्याला कांहीं दिसत नाहीं. संतति नियमन वगैरे गोष्टी ह्या स्त्रीपेक्षां पुरुषांच्या फायद्याच्या आहेत, स्त्रीच्या प्रकृतिवर त्यांचा परिणाम होतो—व तो हलुहलु होत असतो याचा कोणी विचार करीत नाहीं, या बद्दल डॉ. सौ. मनोरमाबाई थत्ते यांनी आपल्या अधिकार वाणीनें या प्रस्तुत विषयांवर लिहून पुरुष जातीला कोरडे ओढले आहेत ते योग्यच होत. असो परमेश्वरानें स्त्रीजातीला महत्त्व कां

दिलें आहे, माता म्हटली म्हणजे आपल्या मध्यें तावडतोब पुज्य बुद्धि व वंद्य अशा स्त्रीजातीबद्दल अभिमान कां वाटतो हें त्यांतील वर्णनावरून कळून येईल.

पुरुषांपेक्षां स्त्रियांमध्यें मानसिक शक्ति उच्च प्रकारची असते. हृदय, रक्तवाहिन्या जलद काम करण्याची शक्ति, स्नायु मऊ व नाजुक असतात.

पुरुषापेक्षां बायकांमध्यें विचार करण्याची शक्ति त्वरित असून त्याचा परिणाम काय होईल तें तावडतोब ठरवूं शकतात. शक्ति कमी असते, परंतु सहनशक्ति व काटकपणा जास्त असतो. धाडस कमी असतें, परंतु धीर पुष्कळ असतो. उतावीळपणा कमी असतो. प्रत्यक्ष काम करणें कमी परंतु केल्यास चिरस्थायी तत्त्वांवर; महत्त्वाकांक्षा कमी, परंतु कोणत्याही कामांत दुःख भोगण्याची तयारी असते. व ह्याच्या उलट पुरुषामध्यें गुण आढळल्यामुळें स्त्री ही पुरुषाची सहकारिणी होऊं शकते.

कुमारिका अज्ञानानें म्हणा किंवा अवसानानें म्हणा पुढें काय होईल याचा विचार न करतां मळमुत्रांचे वेग आले असतां वेळेवर मलमूत्रोत्सर्जन न करतील तर त्यामुळें, त्याचा दाब गर्भाशयावर पडून तो मागल्या बाजूला होतो व ह्याचप्रमाणें वर्तन ठेवलें तर तो स्थानच्युत होतो. ( displacement ) शौचाला झालें असतां वेळेवर गेलें नाहीं तर गर्भाशय पुढें खालच्या बाजूस खेंचला जातो. हा निष्काळजीपणा कौमार्यावस्थेंत कायम राहिला तर गर्भशयांच्या कार्यांत व्यत्यय येतो व त्यामुळें इतर मानसिक विकार होतात. गर्भशयांची जागा बदलल्यामुळें, ओटीमधील रुधिराभिसरण व इतर खालच्या भागामध्यें यकृताला वहाणाऱ्या शिरेंमध्यें व्यत्यय येऊन, पचनेंद्रियांना रक्ताचा पुरवठा बरोबर मिळत नाहीं, सर्व भागाचें पोषण यकृतापासून होत असतें. यामुळें ओटीमधील इंद्रियांमध्यें बिघाड झाला म्हणजे ओटीपोटाचे विकार कसे होतात हें समजून येईल. मलाशय, व मूत्राशय भरून जातात त्यावेळीं गर्भाशयाला थोडी जागा मिळते. हे भाग मळानें मूत्रानें भरलेले असल्यास गर्भशयाला वर लोटतात, व गर्भाशय स्थानच्युत असल्यास निरनिराळे उपद्रव सुरू होतात; परंतु एवढयावर थांबत नसून कांहीं दिवसांनीं गुदद्वाराचे विकार, मुळव्याध, मूत्राशयांचे विकार हे सुरू होतात. उरोदर पटल ( diaphragm ) व ओटी यामध्यें असणाऱ्या इंद्रियांना भरपूर जागा असते, परंतु साडी, लुगडें, घट्ट नेसलें असतां, पोटांतील इंद्रियांना इजा

होऊन त्याच्या दाबामुळें ओटीमधील इंद्रियाच्या बिघाडांमध्यें जास्त भर पडते. कौमार्यावस्थेंत विवाह होण्यापूर्वी प्रत्येक स्त्रीला खालील गोष्टींची माहिती पाहिजे.

( १ ) शारिर इंद्रिय विज्ञानांचें ज्ञान—जननेंद्रियांचें ज्ञान.

( २ ) योग्य अन्न. ( ३ ) पोषाख, ( ४ ) स्नायुंचा व्यायाम. ( ५ ) विश्रांती. ( ६ ) कौटुंबिक जबाबदारी.

प्रत्येक कुमारिकेनें आपण कोण आहोंत, आपले आजे, आईबाप, यांची वागणुक, स्वभाव कसे होते अगर आहेत यांचें ज्ञान करून घेतलें पाहिजे.

स्त्रियांचे नैसर्गिक गुण वर दिलेले आहेत. पाश्चात्य पौरुषीशिक्षणांमुळें स्त्रीयांचें स्त्रीत्व नष्ट होऊन त्यांना पुरुषांसारखें वागण्यास पाहिजे. परंतु अशा तऱ्हेच्या विचारांच्या स्त्रिया कितीशा आढळतील? नैसर्गिकच स्त्रियांना मुलांची आवड असते. मुलें होण्याचा काळ २० ते ३० वर्षांपर्यंत असतो. ही वेळ गेली म्हणजे आंगांमध्यें स्थूलत्व येऊन रजःस्त्रावांचे विकार जडूं लागतात. या काळांत स्त्रीला मूल झालें नाहीं म्हणजे तिच्या स्वभावांत पालट होतो. शेजारीण बाईचें गोंडस मूल पाहिलें म्हणजे आपल्याला असें नाहीं म्हणून त्यांना वाईट वाटत असतें. मूल होण्यांकारितां नानाप्रकारचे नवससायास पुष्कळ करीत असतात. संसारांमध्यें स्त्री व मूल असणें हा स्वर्ग आहे. पती बाहेरून आला असतां पत्नीचा व मुलांचा आनंदी चेहरा पाहिला म्हणजे श्रम परिहार होतो, स्त्रियांचीही त्याचप्रमाणें स्थिती आहे. एकमेकांच्या अस्त्वाबद्दल परस्परांचें आकर्षण होण. हें एक प्रेमशास्त्र आहे. मुलें नको, संतति नियमन पाहिजे, असें म्हणणाऱ्या स्त्रीपुरुषांनीं विवाह करून पहावा, म्हणजे त्यांचें महत्त्व त्याला कळून येईल. अविवाहीत स्त्रीची बाळंतपणावरील व्याख्यानें व अनुभवशुन्य वाक्पंडितांचीं व्याख्यानें एकाच किंमतीचीं होत. इटाली, जर्मनी वगैरे देश विवाह व मुलें होण्याबद्दल उत्तेजन देत आहेत, व संतति नियमनांचीं कटुफळें त्यांना अनुभवांस आल्यानंतरच हा मार्ग त्यांनीं स्वीकारला आहे. ज्या मार्गानें पाश्चात्य राष्ट्र जागें झालें, ज्यांना आपल्या राष्ट्रांवर त्याचा घातुक परिणाम जाणवुं लागला, त्याचा आम्ही हिंदी लोक सारासार विचार न करतां पांश्चात्त्यांचें सर्वच चांगलें म्हणून खुशाल अनुकरण करीत आहोंत. संततिनियमानांच्या साधनानें मुलें होत नाहींत, पुरुषांची कामेच्छा तृप्त होते, परंतु स्त्रीची वाट काय? इतर अतृप्त इच्छा राहिल्यामुळें त्यांना

मानसिक विकार जडूं लागतात, याचा विचार कोण करतो ? नैसर्गिक पुरुष स्त्रीसंबंधामध्यें अडचण आणणें याचा परस्परांच्या प्रकृतिवर परिणाम झाल्याशिवाय रहात नाहीं. शिवाय अशा प्रकारच्या साधनानें संततिबंधन झालें, परंतु प्रत्ये-काच्या प्रकृतिची वाट काय ? वीर्यक्षय वारंवार झाल्यास क्षयासारखे वेकार जडल्यास जबाबदार कोण ? तात्पर्य काय कोणतीही गोष्ट नियमीत, व मनांवर ताबा पाहिजे तरच ती सुखकर होते. रोज श्रीखंडपुरी खावयास मिळाली म्हणजे तिची लज्जत नाहींशी होते. त्याचप्रमाणें ह्या संभोगाची गोष्ट आहे. तेव्हां स्त्री-पुरुषांनीं याचा पुरा विचार करावा. विवाह नको म्हणून म्हणणाऱ्या सुशिक्षीत स्त्रियांनीं वेळ येतांच पहिली बायको असलेल्या पतीशीं लग्नें करून सवतीचा हक्क काबिज केला आहे ? ह्याला सुधारणा अगर नवमतवाद म्हणून गोंडस नांव द्या. परंतु ह्यांत परस्परांचा स्वार्थ हेंच सिद्ध होतें. प्रत्येक स्त्री आपल्या घरांत स्वतंत्र असते. चूल व मूल हें क्षेत्र स्त्रियांचें आहे, व तें गुलामगिरीचें लक्षण नव्हे, यांतच खरी समता आहे. समान हक्क, समान हक्क म्हणून म्हणणारी आजची पिढी वरील तऱ्हेच्या कुटुंबांतून जन्माला आलेली आहे. त्यावेळीं प्रत्यक्ष आपल्या पत्नींशीं संबंध येतो, खाणावळींतील डबे आणून मुलांना दाइच्या हातांत देऊन आपला स्वतःचा अधिकार ज्या स्त्रिया गमावून बसतात त्यांना आर्यसंस्कृति व "**गृहिणी गृह उच्यते**" हें तत्त्व पटणार नाहीं. तें कालांतरानें व अनुभवानें पटणार. बोलणें व कृति यांत तरुण पिढीचा मेळ नसतो हें जुन्या पिढीचें म्हणणें आहे. उदो उदो व वटवट हींच फार; कृतीच्या नांवानें पुज्य. परंतु ह्या गोष्टी काळच ठरवणार आहे. जुन्या तऱ्हेनें होणाऱ्या विवाहांतील इतर फालतु-खर्च होतात ते कमी करा; परंतु जुन्या वैवाहिक पद्धतीचें महत्त्व काय आहे तें लक्षांत आणा. रजिष्टर लग्न करून विवाहापूर्वीच मोकळिक करून घेतां येते तशी हिंदु विवाह पद्धतींत नाहीं हें प्रत्येकानें लक्षांत आणावें. आपल्या धर्माची माहिती करून घ्यावयाची नाहीं व त्याची व्यर्थ टीका करावयाची. तरुण स्त्रीपुरुषांनीं अविवाहित राहणें हें राष्ट्रदृष्ट्या घातुक आहे. विवाह नको म्हणून म्हणावयाचें व ब्रह्मचर्याच्या गप्पा मारावयाच्या व अंधकारांतले बाह्य मार्ग पत्करावयाचे अशा स्थितींत विवाहित जबाबदारी काय आहे, हें प्रत्येक तरुण स्त्री-पुरुषाला अनुभवाशिवाय कळणार नाहीं. ब्रह्मचर्य, मनावर ताबा उत्तेजक पदार्थ फाजील

न खाणें, प्रत्येक बाबतींत नियमीतपणा पाळणें यांवर परस्परांचे आरोग्य अवलंबून असतें. तरूणपणांत मनांवर ताबा नसल्यामुळें विषय सेवन फाजील होत असल्यामुळें त्यांचा उभय प्रकृतींवर परिणाम झाल्याशिवाय रहात नाहीं. बालविवाहाची चाल कमी होऊन प्रौढ विवाह सर्रास सुरू झाल्यामुळें त्याचे दुष्परिणाम अनुभवाला आलेले येथें लिहिल्या वांचून राहवत नाहीं. प्रौढ विवाहांत जोडपीं-सुशिक्षित असतात, त्यांचा आगाऊ परिचय झालेला आढळतो. परंतु विवाहापूर्वी, त्यांच्या आयुष्याचें निरीक्षण केलें असतां ब्रह्मचर्याचें कडक व्रत त्यांच्याकडून पाळलें जात नाहीं, व विवाह झाल्यानंतर परस्परांचे कटु अनुभव कळून येतात. यांकरितां या बाबतींत " मला विवाह करावयाचा नाहीं " म्हणून बाता मारणाऱ्या स्त्री-पुरुषांनीं याचा विचार करावा. शरीर प्रकृति जोमदार कां नाहीं त्याचा विचार करून तीं सुधारण्याचा व विवाहानंतर नियम पाळण्याचा प्रयत्न करावा तरच त्यांचीं शरिरें निरोगी होऊन होणारी संतति सुदृढ होईल यांत संशय नाहीं.

---

# प्रकरण ५ वें

## ओटीमधील अवयव ( Pelvic organs )

योनीमुखापासून गर्भाशयां पर्यंत जो मार्ग आहे त्याला योनी मार्ग ( Vaginal Canal or passage ) म्हणतात. ह्याची लांबी ४ ते ६ इंच असते. ही लांबी कमी जास्त आढळूं शकते. योनिमार्ग बस्ती प्रदेशांप्रमाणें वांकडा असतो. त्याच्या खालच्या टोकाशीं संकोचक वर्तुळ स्नायु असतो. या स्नायूचें टोंक गर्भाशयांच्या ग्रीवेला ( Cervix ) लागलेलें असतें. ग्रीवेचा कांहीं भाग त्याच्या आंत असतो व ह्या दोहोंच्यामध्यें वर्तुळाकार द्रोणी असते. योनीची पूर्वपश्चिम बाजू साधारणतः एकमेकींस लागलेली असते. ह्या बाजूमध्यें संकोचन व प्रसरण होण्याची शक्ति असते. तिच्या पूर्व पश्चिम अंगाला एक उभी शिवण असते व दोन्ही बाजूस सुरकत्या पडलेल्या असतात. योनीची अंतस्त्वचा ( mucus-membrane ) श्लेष्मावरणानें आवरलेलीं असतें व बाह्य भागांत स्नायु असतात. श्लेष्मावरणाच्या सुरकत्यामुळें तें प्रसूतीच्या वेळेस प्रसरण होऊं शकतें. अंतर्पटावर चपटें एपीथीलीयमचें आवरण आहे व त्यांतील स्राव आसिड असतो.

गर्भाशयः—(uterus) ओटीमध्यें मधोमध गर्भाशय असतो. त्याचा आकार चपटया पेरूसारखा आहे. लांबी ३ इंच रुंदी १॥ इंच व जाडी १ इंच असते. वजन ५ ते १० तोळे असतें. गरोदरपणांत वजन व आकार वाढतात. गर्भाशयांचे बाह्य आवरणांला पेरीटोनीयम म्हणतात. हा पेरीटोनीयम गर्भाशयाच्या पुढें व मागें मूत्राशय, जाऊन यांचेमध्यें उतरतो व पुनः त्यांवर चढतो व त्यामुळें दोन्हीं ठिकाणीं द्रोणाच्या आकाराचा खळगा होतो. गर्भाशय व मलद्वार यांमधील द्रोण हा विशेष खोल असतो. योनीवर हा पडदा १॥ इंच पर्यंत उतरतो व त्याचा गर्भाशयाच्या बंधनासारखा उपयोग होतो. गर्भाशयांच्या दोन्ही बाजू पेरिटोनियमची घडी पडून बस्तीच्या बाजूला लागलेल्या असतात. ह्या दोन्हीं घड्यांस गर्भाशयांचे पृथुबंधन म्हणतात. त्यांचे आंत गर्भाशयांचें उपांग असतें. गर्भाशयांचे खालचें टोंक याला ग्रीवा ( Cervix ) अथवा कमळ म्हणतात. ग्रीवेच्या मध्यभागी मुख ( os ) आहे त्याला ग्रीवेचे बाह्यमुख व तेथें ग्रीवा व गर्भाशयांच्या आंतील भाग एकमे-

कांशीं मिळतात त्या स्थानाला अंतर्मुख म्हणतात ( Internal os ) गर्भाशयांची आंतील बाजू त्रिकोणाकार आहे. त्यांचे उर्ध्वभागीं फलवाहिनीच्या ( fallopian Tubes ) संयोगांचीं छिद्रें असतात. गर्भाशयांच्या पुढें मूत्राशय, त्यांचें मागें मलाशय व दोन्हीं बाजूला उपांगें व पृथुबंधन असतें व खालीं योनी व वरं आंतडीं असतात. गर्भाशयाला तीन आवरणें असतात. बाह्य आवरणाला ( पेरीटोनियम ) रस पुंडांचे व आंतील श्लेष्मावरणां ( Mucus ) चें असतें. यांमध्यें रसोत्पादक ग्रंथी असतात. योनीच्या श्लेष्मावरणांपेक्षां हें आवरण जरा निराळ्या तऱ्हेचें असतें. त्यावर लंबगोल एपीथील्यम असतें व सुरकत्या पडलेल्या असतात. त्यांतील स्राव ( Alkaline ) असतो. ह्यांमध्यें गरोदरपणांत व विटाळशीपणांच्या वेळीं महत्त्वांचे फेरफार होतात. मधील आवरण स्नायूंचें असतें. ह्यांमध्यें स्नायुतंतु ( Mascular fibres ) असतात, व त्यामुळें गर्भाशय संकुचित प्रसरण होत असतो.

गर्भाशयांचें कार्यः—तीन प्रकारचें असतें. आर्तव वहाणें, गर्भाची वाढ व गर्भ पूर्ण वाढल्यानंतर त्यास बाहेर ढकलणें.

फलवाहिनीः—( Fallopian Tubes )

ह्या नलिका गर्भशयांच्या दोन्हीं बाजूस असतात. ही नलिका ४ इंच लांब व बारीक पिसाच्या दांडीसारखी असते. ती मृदु बंधनाच्या घडीच्या आंत असते, तिचें एक टोंक गर्भाशयांच्या उर्ध्वभागास जोडलेलें असतें व दुसरें टोंक फुंकणीसारखें व तें मोकळें असतें, दर महिन्यास स्त्रीअंडांतून बीज परिपक्क होऊन फुटतें, तेव्हां त्या ठिकाणीं हें मोकळें टोंक लागलेलें असतें व फुटून निराळें झालें म्हणजे तें बीज ह्या नळीच्या मार्गानें गर्भाशयांत जातें. प्रत्येक फलवाहिनीला तीन आवरणें असतात. एक बाह्य रसपुडांचें आवरण, मध्यभागीं स्नायुचें व दुसरें श्लेष्मावरण.

स्त्रीअंड (ovary) हे अंतःफलक गर्भाशयांच्या दर बाजूस पृथुबंधनांचे मध्यें बदामाच्या आकाराचें एक एक स्त्रीअंड असतें. त्याची लांबी १॥ इंच, रुंदी -।।।- इंच व जाडी -।।- इंच असते.

वजन सुमारें अर्धा तोळा असतें. बाह्य आवरण रसपुडाचें व दुसरें आवरण श्वेततंतूचें बनलेलें असतें. यामध्यें बीजें पक्क व अपक्क अशीं असतात. बीज

पक्क झालें म्हणजे अंतफलःकाच्या मधून तें बाहेरच्या बाजूला येतें. ह्याप्रमाणें दर महिन्याला बीजें परिपक्क होऊन अंतःफलकाच्या सपाटीवर येऊन फुटतें. यावेळीं अंतःफलक, फलवाहिनी व गर्भाशय वगैरे इंद्रियांमध्यें रक्ताधिक्य होत असतें. बीजाच्या बाहेरील पडदा फुटून तें मोकळें होतें व लागलेच त्या ठिकाणीं फलवाहिनीचें शेवट त्या जागेला चिकटून रहातें, व त्या मार्गानें बीज गर्भाशयाकडे जातें. यावेळीं पुरुषांच्या बीजांचा संयोग झाला तर गर्भाची उत्पत्ती होते, नाहीं तर विटाळांबरोबर बीज बाहेर पडून जातें. बीज फुटल्यानंतर अंतःफलकांत एक खळगा पडतो व बीजाचें बाह्य पटल वगैरे जें रहातें त्याची वळी होऊन रहातें. ह्या वळीचें चरबीमध्यें स्थित्यंतर झाल्याकारणानें तो भाग पिवळा दिसतो व त्याला ( Corpus Luteum ) म्हणतात. बीजांचा संयोग वीर्याबरोबर होऊन गर्भ उत्पन्न झाला तर हा डाग वाढीला लागतो व ४ थ्या महिन्यांत अंतःफलकाचा ¼ किंवा अर्धा भाग व्यापून टाकतो. त्यानंतर कमी होऊन नवव्या महिन्यांत अगदीं लहान होऊन शेवटीं तो डाग नाहींसा होतो. परंतु जर बीजापासून गर्भोत्पत्ति न झाली तर हा पिंवळा डाग तीन आठवडेपर्यंत थोडी वृद्धी पावून नंतर वाढूं लागतो व २ महिन्यांनीं नाहिंसा होतो. ह्या पिंवळ्या डागांवरून गर्भ राहिला किंवा काय हें समजण्यांस सोपें जातें.

---

# प्रकरण ६ वें

## कटिरास्थि ( Pelvis )

हीं कटिराचीं हाडें ४ च असतात. दोन बाजूचे दोन नितंबास्थि, एक त्रिकास्थि व एक गुदास्थि. प्रत्येक नितंबास्थीस ऑसइनामीनेटम असें नांव असून लहानपणांत हीं हाडें निरनिराळीं असतात. वयांत आल्यानंतर ह्या तीन्हीं हाडांचें एकच वेड्या वांकड्या आकारांचें हाड बनतें व त्यालाच अनामिकास्थि असें म्हणतात. कमरेच्या दोन्ही बाजूच्या कडेला जे दोन उंचवटे पाठीकडून पुढें ओटीकडे आलेले आहेत ते ह्याचेच असतात. ह्या उंचवट्याच्या पुढच्या टोंकापासून ओटीचें हाड जरा खालच्या पातळींत असतें, ह्या ओटीच्या खालीं लागणाऱ्या हाडांच्या भागाला प्युबिक बोन किंवा भगास्थि असें म्हणतात. हें भगास्थि दोन बाजूंच्या दोन प्युबिक हाडांपासून बनलेलें आहे. दोन्हीं नितंबास्थीच्या दोन प्युबिक नामक हाडें जुळून तें बनलेलें आहे. बाह्य जननेंद्रियांस ह्या जघनास्थि व भगास्थीचा आधार असतो.

त्रिकास्थिः—(sacrum) हें पाठीच्या कण्यांच्या खालीं चिकटलेलें व कटिराचे मागचें रुंदट हाड होय. पाठीच्या कण्यांच्या मणक्या प्रमाणेंच ह्याचे पांच मणके आरंभीं असतात व ते पुढें जुळून एकच हाड बनतें.

या त्रिकास्थिच्या खालीं अगदीं शेवटचें जें हाड तेंच गुदास्थि, ह्याला इंग्रजींत काकसीस असें म्हणतात. त्रिकास्थी पासून आसनास्थीच्या दोन टोंकाकडे दोन बंधनें असतात ( ligaments ) त्यांच्यामुळें कमरेच्या दोन्हीं बाजूंस दोन छिद्रें बनतात. ( obtuator formon ).

ह्या त्रिकास्थि व नितंबास्थींचे मिळून कटिर ( Pelvis ) बनतें. स्त्रियांच्या कटिरांचीं हाडें पातळ, पसरट व उथळ असतात. ह्यामुळें वरून पाहतां तें अधिक रुंदट व उथळ दिसतें. नितंबास्थीच्या खालचीं टोंकें अधिक दुरावलेलीं असतात व ह्या संपुटाच्या आंतील खळगाहि अधिक रुंद असतो. भगास्थीची कमान जास्त रुंद, पसरट व गोलाकार असते, त्रिकास्थि हा स्त्रियांत जास्त पसरट असतो. नितंबास्थीच्या पुढच्या दोन टोकांमधील अंतर अधिक असतें. गुदास्थीचे तीन तुकडे एकमेकांशीं घट्ट चिकटलेले नसून त्यांचें मागेंपुढें

चलन होऊं शकतें. कटिरांच्या अस्थीच्या संधीमध्यें प्रसूतिकाळीं थोडा फरक होतो. म्हणजे ओटींमधील पोकळी अधिक विस्तृत होते. मुलाचा प्रवेश ह्या संपुटांत होऊं लागला म्हणजे कटिरास्थि संधींवर सारखा भार पडत जातो व त्यामुळें त्रिक-नितंबसंधि त्रिक-गुदास्थिसंधि व भगास्थिसंधि हे किंचित् ढिले होऊन संपुटाचा आकार अधिक विस्तृत होतो.

पोटाच्या खालचा भाग त्यास ओटी म्हणतात ह्यांत गुह्य भागांचा समावेश होतो. याचे अंतर व बाह्य असे विभाग केलेले आहेत. अंतर भागांत गर्भाशय व त्याचीं बंधनें ( Ligaments ) स्त्रीअंड, ( Ovaries ) व योनि व बाह्य भागांत योनिद्वार, योनिलिंग, योनिपटल, योनिओष्ट व केशभू हीं येतात. बस्ती किंवा ओटीं ह्यांच्याखालीं दोन मांड्या आहेत. अग्रभागीं पोटाचा भाग व पाठचा भाग कणा त्याजवर टेंकलेला आहे. बस्तीचे दोन भाग कल्पलेले आहेत. खरा बस्ती व खोटा बस्ती; बस्तीच्या अस्थिपंजराचा वरील भाग दोन रुंद पंखासारख्या नितंबास्थिचे मध्यें असतो ( इल्यम ) त्याला खोटा बस्ती असें म्हणतात. यांमध्यें आंतडीं व दुसरे अवयव येतात. खऱ्या बस्तीमध्यें ( खोटया बस्तीचा खालचा पोकळ भाग ) गर्भाशय, मूत्राशय, मलद्वार, योनि यांचा समावेश होतो. हे अवयव स्नायुबंधनांनीं भरलेले आहेत. वरच्या द्वारांस आगमनद्वार व खालच्या द्वारांस निर्गमनद्वार असें म्हणतात. हीं नांवें गर्भाच्या येण्यांवर ठरवलेलीं आहेत. गर्भाला आगमन द्वारांत शिरून बस्ती प्रदेश ओलांडून योनिमार्गें बाहेर यावें लागतें.

आगमनद्वार हें कांहींसें गोलाकार असतें, परंतु मागें त्रिकास्थीच्या शिखराचें टोंक पुढें घुसून आलेलें असतें. त्यांस सेक्रम प्रोमेन्टरी म्हणतात.

निर्गमनद्वार अनियमीत आकाराचें असतें. त्याचा पुढील भाग दोन प्युबिकाच्या मध्यें आलेला आहे. त्याचा आकार त्रिकोनी आहे म्हणून त्याला प्युबिक आर्च असें म्हणतात. ह्याच्या दोन्ही बाजूंस आसनास्थि आहेत व मागें त्रिकास्थि गुदास्थि व बंधनें आहेत.

निर्गमन व आगमन या मधील भागांस बस्ती कक्षा असें म्हणतात. ती पुढून उथळ व दोन्हीं बाजूंस व मागें खोल असते. मागल्या भागांस सेक्रम असतो व तो अंगुली आकाराचा अंतर्गोल असतो.

गरोदरपणांचा मातेच्या अस्थिपंजावर ( Skeleton ) होणारे विकार समजण्याकरितां आरंभीं कटिरास्थीची माहिती दिलेली आहे व त्यावरून कोणत्या हाडांना विकार झाला हें समजूं शकेल. गरोदरपणांत अस्थीज ( Bony Material ) पदार्थांची वाढ होतं असल्यामुळें शरिराच्या आकारांत वाढ होते. गरोदरपणांत माप घेऊन पाहिलें असतां १ ते १॥ इंच वाढ झालेली आढळून येईल. कटिरांची योग्य ती वाढ गरोदरपणांत होते; परंतु ह्या सर्व गोष्टी मातेला पौष्टिक पदार्थ, शुद्ध हवा वगैरे मिळत असतील तरच होईल. हाडांच्या वाढीला प्रवाळ, मंडूर, फॉस्पेटस्, कॅलसीयम, व कॅरबोनेट या खनिज क्षारांची जरूरी असते.

सांधेः—( Joints ) सांध्यामधील चिकट द्रव्यांची ( Synovial fluid ) वाढ होते. सांध्याच्या मृदुअस्थि ( Cartilage ) जाड होतात व त्या वाढतात. कटिरामध्यें कमी जास्ती हालचाल होते, व कांहीं रोग असेल तर ही हालचाल वाढते. सेक्रम ( त्रिकास्थि ) व इलीयाक ( नितंबास्थि ) सांध्या मध्येंच विशेष फरक होत असतात. हे सांधे बंधनानें एके ठिकाणीं होऊन त्यांच्या हालचालीचा महत्त्वांचा उपयोग गरोदरपणांत व बाळंतपणांत होतो.

**सेक्रोइलायाक सांध्यामध्यें रोगोत्पादक चिन्हेंः**—स्नायूतंतूमध्यें शिथिलपणा आला म्हणजे या सांध्याची फाजील हालचाल होते; व शेवटीं ७ ते ९ महिन्यांच्या वेळेला ती हालचाल फारच त्रासदायक होते. वांकलें, चाललें तर ताबडतोब कळ येते. अशावेळीं स्त्रीला बिछान्यांवर निजवून कटिराची बाजू तपासल्यावर कळ कोठें आहे हें समजून येतें.

मोटारगाडीच्या अपघातांत शरीर बाहेर फेंकलें गेल्यामुळें अपघात होऊन ह्या सांध्याना इजा होते व त्यांची हालचाल वाढते. त्यावेळीं स्वतः उठतांना प्रयत्न केला तर याच सांध्याच्या ठिकाणीं कळ येते असें समजून येईल. दुसरी गोष्ट स्वतःचे मूल पडत आहे असें पहातांच धांवत जाऊन त्याला सांवरण्याचा प्रयत्न करणें अशावेळीं ह्या सांध्यांत दुखत असतें.

चिकीत्साः—या प्रसंगीं उकडवें बसवून बिछान्यांत विश्रांती दिली पाहिजे. पट्टा वगैरे लावून कटिराला शक्य तो आधार दिला पाहिजे. तज्ज्ञ डॉक्टराच्या सल्ल्यानें चिकीत्सा करणें चांगलें.

Pubic bones ( भगास्थि ) प्युबिक हाडांची हालचाल फार झाल्या-

मुळें तीं निराळीं होतात व मनाला अस्वस्थता उत्पन्न करतात. बाळंतपण कठीण असेल व फॉरसेप्सची जरूरी लागली असेल तर अशा प्रकारची स्थिति होते. किंवा पेशींचा क्षय व शिथिलपणा हेंहीं कारण असूं शकतें. रोग्याला उभें करावें. आपले हात प्युबिकवर ठेवावेत, व स्त्रीला पाय उचलण्याला अगर पाऊल पुढें टाकण्यास सांगावें, म्हणजे या अस्थींची स्थिति कळून येते. शिवाय योनि परीक्षा करूनहि समजून येते.

चिकीत्साः—सेक्रोइलीयाक संधी व्यवस्थित बसवल्यास ह्या हाडांमुळें होणारा त्रास कमी होतो.

कटिर संधी सुटे होणें:—( Separation of the Pelvic joints ) ही गोष्ट क्वचितच होते, ह्या सांध्यावर प्रत्यक्षच आघात झाला तर हे सांधे सुटे होतात. अशा स्थितींत स्त्रीनें पडून राहिलें पाहिजे.

गुदास्थीला इजा होणें ( Injuries to the coccyx ):—कॉक्सीसची हालचाल बंद झाली व सांधे घट्ट झाले, तर त्यामध्यें फरक होऊन प्रसूतिच्यावेळीं त्रास होतो. गरोदरपणांत हें हाड मोडलें असेल तर बाळंतपणापूर्वी त्याची तजवीज केली पाहिजे. पडल्यामुळें अगर मार लागून इजा आंतल्या बाजूला कोठें झाली हें समजून येत नाहीं. अशा वेळीं गर्भपात होणारीं लक्षणें लपवून ठेवलीं, तर कण्यांच्या खालीं कळा येत असतात व त्या गर्भाशयाच्या दाहांपासून कीं ह्या coccyx मुळें आहेत हें समजणें कठीण जातें. कॉक्सीसचें हाड मोडून तें बरोबर सांधलें नसेल, तर गरोदरपणीं बाजूच्या भागांत फार त्रास होतो व एक्स रे काढून ठरवतां येतें. कॉक्सीस घट्ट झाला असेल त्याची हालचाल बंद असेल तर बाळंतपणाच्या वेळीं त्रास होतो—व तो कायमचा त्रास रहातो. अशा ठिकाणीं कॉक्सीस काढून टाकणें भाग पडतें.

सांध्याची फाजील हालचाल वाढणें:—गरोदरपणांत शरिरांतील सर्व अवयवामध्यें शिथिलपणा येऊन त्यांची हालचाल वाढते. गुडघ्याची वाटी ( Patella ) साधारण कारण होऊन पुढें सरकते; त्याचप्रमाणें पायांचा घोंटा ( ankle ) हीं सुटतो; अशा स्थितींत जपून वागलें पाहिजे, व घट्ट बुट वापरले पाहिजेत.

आनुवंशिक कारणामुळें शरिरांच्या सांध्यांना विकार असेल तर बाळंतपणाच्या वेळीं त्रास होतो. अशावेळीं डॉक्टरकडून आगाऊ तपासून घेऊन इलाज करावा.

Rickets:—( अस्थिक्षय ) गरोदरपणांत अस्थिक्षय क्वचितच होतो, परंतु गरोदरपणानंतर मात्र अस्थिक्षय होतो. मुळचा अशक्तपणा, लहान वय, अशा स्थितींत गरोदरपण आलें तर हा विकार होतो. कटिरांमध्यें व्यंग उत्पन्न होतें. सांसर्गिक दोषी तापांमुळें हा विकार होतो. पौष्टिकअन्न, कॉडलीव्हरऑइल वगैरे अस्थिवर्धक औषधें घ्यावींत.

अस्थि मृदु होणें:—( Osteo malacia ) स्त्री अंडांचें फाजील कार्य व पोषक अन्न नसणें हें होय. हा विकार कां होतो तें कळत नाहीं, परंतु स्त्रीअंड काढून टाकलें असतां हा विकार कमी होतो, यावरून या स्त्रीअंडांला या विकारांचा संबंध असावा हें सिद्ध होतें. या विकारांत पुढीलप्रमाणें लक्षणें होतात.

लक्षणें:—सर्वांगांत कळा, चालतांना, हालचाल करतांना अस्वस्थता, बारीक ताप, सांधे धरणें, रक्तहीनता व मज्जातंतु क्षीणतेचीं लक्षणें आढळतात. वारंवार बाळंतपणें येणें किंवा अंगांत अशक्तपणा असतां फाजील काम करण्यास लागणें हींहि कारणें होतात. हा विकार आहे किंवा नाहीं हें तपासतांना योग्य ती काळजी बाळगली पाहिजे. रोगी संधिवातांचीं लक्षणें सांगत आहे म्हणून त्यांवर भिस्त ठेऊं नये. डोक्यांपासून पायांपर्यंत पूर्ण तपासलें पाहिजे. ह्या विकारांत छातीच्या अस्थी दाबल्या ( Sternum ) असतां दुःख उत्पन्न होतें. व खालच्या भागांत एवढया कळा असतात कीं रोग्याला चालणें कठिण जातें. त्याला बसतां येतें, हाताचा उपयोग करतां येतो; निजलें असतां वळतां येतें, पण रोगाची वाढ होऊं लागली म्हणजे बसणें उठणें मंद होऊं लागतें व हळुहळु अशक्तपणा येऊन या विकारांत मृत्यु येतो ! प्रसंगीं बाळंतपण उदरच्छेदन करून करावें लागतें.

क्षयाचा विकार असल्यास हाडें व सांधे यांना क्षय होतो. ते घट्ट होतात, त्यांची हालचाल बंद होते. अशा वेळीं तज्ज्ञ अशा डॉक्टरकडून तपासून घ्यावें.

त्याचप्रमाणें निरनिराळे हाडांना दुष्ट व्रणासारखे विकार होण्याचा संभव असतो अशा वेळीं आरंभापासून दक्षतापूर्वक काळजी घ्यावी.

# प्रकरण ७ वें

## रोगाचीं विशिष्ट कारणें

स्त्रियांच्या रोगाची माहिती लिहीतां त्यांचे मुख्यतः दोन भाग पडतात. एक शस्त्रक्रियेनें बरे होणारे विकार व दुसरा औषधानें बरे होणारे विकार व यांवरूनच इंग्रजीमध्यें मेजर गायनॅकॉलजी ( Gynaecology ) व मायनर गायनॅकॉलजी म्हणण्याची पद्धत पडलेली आहे. औषधाने बरे होणाऱ्या विकारांमध्यें स्थानिक कारण असतें व त्याचा शरिरावर परिणाम होत नाहीं व तें कारण दूर केलें असतां दुःख कमी होतें. त्याच्या उलट स्थिति शस्त्रक्रियेच्या विकारांची असते. शस्त्रक्रियेनें बरे होणाऱ्या रोगांमध्यें गुंतागुंतीचीं लक्षणें ( complicated ) होत असतात. अमुक भागांवर शस्त्रक्रिया केली असतां लक्षणें कमी होतील कीं, ज्यास्त होतील, यांचा विचार करावा लागतो. याकामीं शस्त्रवैद्य हुषार व अनुभवी लागतो व शस्त्रक्रिया करण्याचें ठरल्यानंतर, रोग्याची स्थिती अनुकूल किंवा प्रतिकूल आहे, यांचा विचार अगोदर करावा लागतो, थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे, औषधानें स्थानिक कारण निवारण केलें असतां रोगाचीं लक्षणें कमी होतात. तर उलट शस्त्रक्रियेचा विकार असल्यास औषधानें कमी न होतां ते ज्यास्त होतात.

स्त्री व पुरुष यांच्या रोगांचा विचार करतांना आनुवंशिक नैसर्गिक स्वभावांची गोष्ट प्रथम लक्षांत घेतली पाहिजे.

स्त्री व पुरुष या प्रत्येकांच्या परस्परांमध्यें पुरुषत्वाचे व स्त्रीत्वाचे गुण कमी जास्ती प्रमाणांत आढळून येतात. स्त्रियांचा स्वभाव लाजाळू, लीन, गृहकृत्यांत दक्ष, प्रेमळ व नाजुक यामुळें त्यांच्यामध्यें दुःख सहन करण्याची शक्ति कमी असते. त्याच्या उलट पुरुषांचा स्वभाव असल्यामुळें त्यांच्यामध्यें सहनशक्ति ज्यास्त आढळून येते. शूरपणाचें, धाडसाचें कृत्य, निर्भयपणा, पुरुषांत आढळतो त्याप्रमाणें स्त्रियांत आढळत नाहीं, परंतु या गोष्टीला अपवादहि आढळून येतात. याचें कारण वर दिलेलेंच आहे. अलीकडच्या कालांचा विचार केला असतां पुरुषांमध्यें स्त्रीत्वाचे गुण जास्त आढळतात व त्यांच्या गुणांचें अंधानुकरण करण्यांत मोठेपणा वाटत असतो. परंतु ह्या विषयांशीं आपल्याला कर्तव्य नसल्यामुळें स्त्रियांच्या नैसर्गीक स्वभावानुसार सहनशक्तीच्या अभावीं रोगाचें

कारण स्थानिक असलें तरी तें मोठें असावें असें स्त्रीला वाटूं लागतें व याला कारण कुटुंबामध्यें वृद्ध माणसांचा अभाव हें होय. हा कालमहिमा आहे. तरुण वय, जगाचा अनुभव कमी, सर्व वस्तु आयत्या मिळत असल्यामुळें घरांमध्यें काम कमी अशा स्थितींत रोग्याला आपल्या विकारांच्या विचाराशिवाय दुसरी गोष्टच सुचत नसते. अस्तु. आतां स्त्रीरोग विषयांत स्त्रियांच्या जननेंद्रियाचें फार महत्त्व असल्यामुळें त्याबद्दल विचार करूं.

स्त्रियांच्या जननेंद्रियांमध्यें वयोमानाप्रमाणें योग्य ती वाढ झाली असली तर लग्न व बाळंतपण हीं सुखानें पार पडत असतात. हीं जननेंद्रियें सुव्यवस्थित राखण्याबद्दल पतिपत्नींनीं आरंभापासून काळजी बाळगल्यास परस्परांची प्रकृति चांगली राहून होणारें अपत्य सुदृढ होतें. परंतु ह्या गोष्टी कृतींत आणणें कठीण असल्यामुळें त्या संबंधींच्या विकारांचा ऊहापोह करावा लागत आहे.

लग्न झाल्यानंतर स्त्रियांच्या रहाणीप्रमाणें तिच्या प्रकृतीवर व मज्जातंतूवर परिणाम होऊन आजारीपणा येऊं लागतो. लग्नापूर्वीचा स्वतंत्रपणा नाहींसा होतो. गरोदरपण, बाळंतपण, मुलांचें अंगावर दुध पिणें, त्याचप्रमाणें त्यांची काळजी घेणें या कारणांमुळें जीवनशक्तीवर हळु हळु परिणाम होत जातो. ज्यांना दुर्दैवानें दर वर्षी बाळंतपण येतें, त्यांचा मेंदू हलका होऊन प्रसंगीं कित्येकांना वेडहि लागूं शकतें. परंतु हें वेडेपण बहुशः आनुवंशिक कुलपरंपरेवर अवलंबून असतें. एकलकोंडेपणा, घरांमध्यें माणूस नसणें, मूल बरेंच वर्षे न होणें, काम नसणें, यामुळें नानातऱ्हेचे विचार डोक्यांत येऊन शरीरप्रकृतीवर परिणाम होतो; मज्जातंतूचा अशक्तपणा वाढला म्हणजे नाना प्रकारचीं लक्षणें होऊं लागतात व त्याचें कारण समजणें कठीण जातें. कारण रोगी मनानें इतका दुर्बळ झालेला असतो कीं, त्याला स्वतःला काय होतें हेंच समजत नाहीं ! त्यांतल्या त्यांत घरामध्यें पतिपत्नीच फक्त एकटीं असल्यास मग त्यांच्या संसाराची दुर्दशा तर बोलावयाला नकोच. पुष्कळ लोक अशा वेळीं अज्ञानानें औषधी उपायाची उपेक्षा करून मंत्रतंत्राचे नादीं लागतात व जीवित्वाची व पैशाची हानि करून घेतात. पुष्कळ स्त्रियांना इंद्रिय-विज्ञान-शास्त्राची माहिती नसल्यामुळें, गुप्तभागांमधून स्राव सुरू झाला तर त्या ठिकाणीं गांठ झालेली असावी असें वाटूं लागतें व त्यांच्या भयं-

कर परिणामांच्या विचारामुळें शरिरावर परिणाम होऊं लागतो. हें अज्ञान ज्यावेळीं डॉक्टर दूर करील, त्यावेळींच मनाचें समाधान होतें.

वारंवार बाळंतपणामुळें आलेली मानसिक दुर्बलता मनाच्या कमकुवतपणामुळें वाढत असते व सतत विचारामुळें मन कमकुवत बनून आपण मृत्युमुखीं पडूं, अशी तिला भिती वाटूं लागते. मुलांच्या काळजीमुळें मन दुर्बल होऊन जातें व त्याचें पर्यवसान शारीरिक विकार वाढण्यास कारणीभूत होतें.

साधारणपणें स्त्रियांच्या विकारांची परिक्षा बाह्य तपासणी करून ठरवणें कठिण असतें. योनिदर्शक यंत्रानें ( Speculum ) तपासलें असतां आंतल्या भागांची स्थिती समजून येते व त्यावरून औषधयोजना केली असतां रोग्याला फायदा होतो. बाह्य परीक्षा करून व रोग्याची हकिकत ऐकून औषध दिलें असतां, रोग्याला फायदा होत नाहीं व रोगी औषध घेतांना ‘ गुण नाहीं ’ म्हणून कुरकुर करीत असतो. व ह्याला कारण म्हणजे आपल्या स्त्रियांच्या ठिकाणीं ‘ लाज ’ हा असणारा ‘ गुण ’ हें होय.

गर्भाशय जागेवर नसणें, त्याचें तोंड मागें पुढें होणें, वगैरे कारणांमुळें स्त्रियांना श्वेतप्रदरांसारखे विकार होत असतात व हे विकार नुसत्या पोटांतील औषधानें बरे होत नाहींत. अशा वेळीं दोन्ही तऱ्हेचे उपचार करावे लागतात. व त्यावेळींच रोग्यांचा फायदा होऊन, इतर परिवर्तन होणारीं लक्षणें (Reflex) कमी होत जातात. स्त्रियांचे रोग साधारणतः हॉस्पिटलमध्यें राहिल्यास लवकर कमी होतात. यांचें कारण स्पष्ट आहे. हॉस्पिटलमध्यें रोग्याला मानसिक व शारीरिक विश्रांति भरपूर मिळत असते व हें घरीं शक्य होत नाहीं. परन्तु हॉस्पिटलमध्यें ठेवणें म्हणजे खर्चाचें काम व दिवसें दिवस बेकारी व पैसा कमी होत चालल्यामुळें रोगांचें प्रमाण वाढून बिचाऱ्या स्त्रियांचें जीवन अकालीं मृत्युमुखीं पडण्यांत होतें.

---

# प्रकरण ८ वें

## मानसिक विकाराचीं कांहीं लक्षणें

शरीर दुर्बल झालें म्हणजे मन दुर्बल होतें. मनाचा ताबा शरिरावर चालत असतो व त्यामुळें मानसिक क्षीणता होऊन निरनिराळ्या प्रकारचीं लक्षणें होऊं लागतात आणि त्यांचें पर्यवसान इंद्रियाला एखादा विकार होण्यांत होतें. स्त्रियांना त्यांच्या स्थानिक इंद्रियाला बिघाड झाल्यानंतर होणारें दुःख व मानसिक दुर्बल-तेमुळें होणारे दुःख यांचीं लक्षणें काय असतात त्याचा व या दोहोंमध्यें असणाऱ्या फरकाचा विचार प्रथमतः केला पाहिजे.

योनीच्या ग्रीवेला सूजः—

योनि स्थानच्युत होणें, फाटणें, वगैरे स्थानिक भागांमध्यें फेरफार झाल्यास दुःखकारक लक्षणें स्त्रीला जाणवत असतात. ज्या स्त्रियांच्या अंगांत सहनशक्ति कमी असते, त्या लगेच डॉक्टरकडे धांव घेत असतात. साधारणपणें जननेंद्रियांमध्यें बिघाड झाला असल्यास स्थानिक चिन्हें होत असतात व प्रकृति सुदृढ असली तर त्याचीं परिवर्तनकारक ( Reflex ) लक्षणें होत नाहींत. मन दुर्बल झालें म्हणजे दुःखाच्या ठिकाणीं सारखें लक्ष लागून असतें, सहनशक्ती कमी होते व खरें दुःख कोठें आहे हेंहि त्यांना सांगतां येत नाहीं. अशा वेळीं, अडाणी नातलग मंडळी व अज्ञ माणसें भेटून भलतेच उपाय सुचवतात पण त्यांच्या उपदेशांपासून फायदा न होतां उलट तोटा मात्र होतो.

स्थानिक कारण पाहून त्यावर इलाज केला असतां होणाऱ्या वेदना अगर कळा कमी होतात व हें तीन प्रकारांनीं होतें.

( १ ) स्थानिक दुःख सारखें होत असलें तर अशक्त स्त्रियांमध्यें ज्यास्त शिथिलपणा येतो. स्थानिक विकार हें दुय्यम कारण असलें, तरी त्यावर इलाज केला असतां रोग्याला फायदा होतो. ( २ ) काळजी, ध्यास यामुळें रोग जास्त वाढत असतो अशा वेळीं रोग्याला आश्वासन दिल्यास त्याला बरें वाटूं लागतें. ( ३ ) अंगामध्यें कळा मारणें, मलावरोध, अग्निमांद्य, कामांमुळें आलेला वैताग अशा वेळीं रोग्याला हॉस्पिटलमध्यें ठेवून योग्य तीं कारणें दूर केलीं असतां फायदा होतो. फाजील विषय-सेवनामुळें मज्जातंतुशिथिलता व श्वेतप्रदरासारखे

विकार होऊं लागतात; जननेंद्रियांचे विकार व मज्जातंतुशिथिलता हीं एकमेकांवर अवलंबून आहेत, असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. प्रसूतीकाळीं स्त्रियांमध्यें ह्या दोन्ही गोष्टी एकसमयावच्छेदेंकरून आढळतात. बाळंतपणांत स्थानिक विकार जननेंद्रियांत असतो व त्यामुळें थकवा फार येत असतो.

जीवनशक्ती कमी होणें, मनाची दुर्बलता वाढणें व सहनशक्ती कमी होणें ह्या लक्षणांना इंग्रजींत न्युरेस्थेनीया म्हणतात.

"हायपो कॉन ड्रायसीस" म्हणून एक रोग आहे. रोग्याला आपल्याला कांहीं तरी विकार झाला आहे असें वाटूं लागतें. शरिराची तपासणी केली असतां इंद्रियांमध्यें बिघाड कांहीं आढळून येत नाहीं. परंतु रोग्याची मनाची ठेवणच तशी बनलेली असते. मज्जातंतु शिथिलता झाली म्हणजे हिस्टेरियासारखे विकार होऊं लागतात. परंतु हे दोन्ही विकार निरनिराळे आहेत हें पुढें समजून येईल.

मज्जातंतूच्या शिथिलतेचीं कारणें:—

मज्जातंतुशिथिलतेचा विकार कुमारिका व वृद्ध स्त्रियांमध्यें क्वचित् आढळतो. म्हाताऱ्या स्त्रियांमध्यें मज्जातंतू शिथिलतेचीं लक्षणें आढळतात. परंतु त्याला कारण अंतरेंद्रियांची विकृती हेंच होय. हा विकार आनुवंशिक आढळतो. लग्न झाल्यानंतर फाजील विषयसेवनामुळें जननेंद्रियांवर दाब पडून हा विकार बळावतो. झोंप न येणें, दरवर्षी मूल होणें, गरोदरपणा, प्रकृती क्षीण होणें, मुलांचे अंगावरील दूध पिणें, मुलांची जोपासना यामुळें हा विकार ज्यास्त होतो. ज्या स्त्रिया संततिप्रतिबंधक साधनें वापरतात, त्यांच्यांत अपुरा संयोग झाल्यामुळें हा विकार बळावतो. अपुरा संयोग झाल्यामुळें विषयवासना पुरी होत नाहीं, विषयवासना पुरी न झाल्यामुळें झोंप नाहींशी होते, शरीर बेचैन होतें व हळुहळु मज्जातंतू शिथिलता येऊं लागते. संततिनियमन करणाऱ्यानें भविष्यकालाकडे लक्ष दिलें नाहीं तर त्याला पश्चात्तापाची पाळी आल्याशिवाय रहाणार नाहीं. संततिप्रतिबंधन करतांना स्त्रीच्या अगर पुरुषांच्या मज्जातंतूवर हळूहळु विपरीत परिणाम होत असतो याचा कोणी विचार केला आहे काय ? परंतु आजच्या काळांत त्वरित दानाची व महापुण्य जोडण्याची संवय झाल्यामुळें भविष्यकाळांचा विचार कोणी करावा ?

श्रमामुळें थकवा येतो, ताकदीचे बाहेरचे श्रम केले असतांना अंथरुणाला

खिळून पडावें लागतें इत्यादि गोष्टी आपल्या स्त्रियांमध्यें हमेश आढळत असतात. लाजाळू स्वभाव व अंगांमधील काटकपणाच्या जोरावर त्या घरांमधील काम निभावत असतात व शेवटीं हा स्वभावच दुःखास कारणीभूत होतो. आईबाप शाळेंत जाणाऱ्या मुलीच्या हुशारीकडे पहात असतात, परंतु त्यांच्या शरीरप्रकृती-कडे लक्ष देत नाहींत, शरीरप्रकृती चांगली नसल्यास शिक्षण कितीही झालेलें असलें तरी त्याचा उपयोग होत नाहीं. शिक्षणापेक्षां आईबापांनीं शरीरप्रकृती-कडे अगोदर लक्ष दिलें पाहिजे. शरिराचें महत्त्व न पटणाऱ्याचीं मुलें अल्पायु होऊन आईबापांना दुःखसागरांत लोटून गेलेलीं आढळतात.

दारिद्र्य, एकलकोंडेपणा, व्यवसाय नसणें, यामुळें मनाला अस्वस्थता वाटते, भलभलते विचार येऊं लागतात, अतिविचारानें झोंप नाहींशी होते व हळुहळु मानसिक दौर्बल्य येऊं लागतें. विवाहित स्त्रियांना योग्यवेळीं पतीचें सौख्य मिळालें नाहीं तर त्यांच्या चित्तवृत्तीवर परिणाम होतो. शारीरिक इजा अगर मनाला धक्का बसल्यामुळें सुद्धां मनाला शिथिलता येते.

अजीर्ण, पोट दुखी त्याचप्रमाणें अतिसंभोग यामुळें मानासिक दुर्बलता येते. एखाद्या कुटुंबामध्यें साहजिकच मनोदौर्बल्य आढळतें. व ही दुर्बलता आनुवंशिक संस्कारामुळें मुलींमध्यें उतरते.

अशा प्रकारच्या मुलींना, आळशीपणा, फाजील विषय-सेवन, मसालेदार पदार्थ खाणें वगैरे व्यसनें लागलीं तर हा विकार वाढण्यास जास्त मदत होते. मज्जातंतु शिथिलता कोणत्या कारणानें येते हें शक्य तेवढें निरानिराळ्या तऱ्हेनें वाचकांसमोर मांडलेलें आहे. आतां त्यांचीं लक्षणें काय याचा विचार करूं.

लक्षणें:—कोणी बोललें असतां ताबडतोब रडूं येतें, दरवाजावर थाप मार-लेली ऐकूं आली तरी भीति वाटते. विरुद्ध बोलल्यास राग येतो. चित्तवृत्ती चंचल होते, मनाला राग येणाऱ्या गोष्टींपासून त्रास व तिटकारा उत्पन्न होतो, कोणतेंही काम करण्याची हुषारी नसते व थोडें काम केल्यास ताबडतोब थकवा येतो. स्मरणशक्ति मंद व एकाग्रचित्त होणें कमी होतें, मनांत एक प्रकारची धास्ती वाटत असते व आपल्याच दुःखाचा पाढा मैत्रिणीजवळ वाचण्याची इच्छा तीव्र होत असते. आपण मरणार, आपल्याला मोठा रोग झाला आहे, आपल्याला वेड लागणार असें वाटूं लागतें. अशा स्त्रियांमध्यें झोंप मुळींच नसते.

झोंप नसल्यामुळें वात, पित्त वाढून दुर्बलता ज्यास्त वाढत जाते. झोंप असल्यास मधून मधून दचकल्यासारखें होतें. डोकें जड, अंगांत कळा, मुंग्या येणें, अंग जड वाटणें, बेशुद्धि, चक्कर येईल असें वाटणें, डोळ्यांपुढें काजवे चमकणें, आवाज सहन न होणें, पायांचे स्नायु निर्बल होणें व त्यांचें कार्य बंद झालें आहे असें वाटणें, पायांत कळा येणें वगैरे लक्षणें होतात.

रक्तवाहिन्यांमध्यें बिघाड झाल्यास, चेहरा लाल होणें, नाडीची गति वाढणें, घाम सुटणें, छाती कोंडल्यासारखी वाटणें, छातींत दुखणें, पाय थंड असणें, छातीमध्यें धडका वाढणें, झोंप न येणें—हीं लक्षणें होतात.

**अन्न-पचनक्रिया:**—भूक नसणें, कांहीं खाल्ल्यानंतर पोट जड होणें, मलावरोध, पोटांत वात धरणें, रात्रीं एकाएकीं झोंपेंतून दचकून उठणें, उलटी, मळमळ, हीं लक्षणें पचनक्रिया मंद झाली म्हणजे होतात.

बाळंतपणें बरींच झाल्यानंतर पोटाची कातडी पातळ होते. आंतडीं, मूत्रपिंड स्थानच्युत होतात, आमांशय जरा खालीं पसरतो व यामुळें पोटांमध्यें कांहींतरी हालत आहे, असें भासून मनावर परिणाम होतो. लघ्वीस थोडें थोडें होऊं लागतें व हें आमांशयाच्या मागें पुढें होण्यावर अवलंबून असतें. मज्जातंतु शिथिलता विकारांमध्यें पांडुरोग असतोच असें नाहीं. ताप मुळींच नसतो व घाम फार येतो.

कधीं कधीं थकवा फार आल्यास हिस्टेरिया सारखीं लक्षणें आढळून येतात. फाजील समागम करणाऱ्या स्त्रियांमध्यें हा विकार ज्यास्त होतो. ह्या विकारामध्यें दोन प्रकारचे रोगी आढळतात. एक प्रकारामध्यें रोगी आपल्याला शक्य तेवढें दुःख सहन करून असतो तर दुसऱ्या प्रकारामध्यें सहन होणारें अल्पही लक्षण नसतांना डॉक्टरला विचारल्याशिवाय त्याला स्वस्थ बसवत नाहीं. पहिल्या प्रकारचे रोगी अशक्त, फिक्कट, हातपाय थंड असलेले, परंतु आजाराची पर्वा नसणारे असे दिसतात तर दुसऱ्या प्रकारचे दिसण्यांत साधारण प्रकृतीनें भरदार, परंतु स्वभाव चंचल असे आढळून येतात.

निदान:—स्त्रीच्या ओटीमध्यें ( Pelvic ) दुखावा असल्यास मज्जातंतु शिथिलतेचें निदान करतांना दोन गोष्टींकडे लक्ष द्यावें लागतें.

(१) मेंदूचा अगर कण्याच्या रज्जूंचा (Spinal cord) विकार, अर्धांगवायु, मेंदूमध्यें एखादी ग्रंथी होणें, किंवा वेडाचा प्रादुर्भाव आहे किंवा काय, यांचा विचार करावा लागतो. परंतु अनुभवानें यामध्यें हे विकार सहसा आढळत नाहींत.

(२) ओटीमधील इंद्रियांना विकार असल्यास झोंप नसणें, भूक मंद होणें वगैरे गोष्टी असल्या तर मुख्य कारण कोणतें आहे, हें समजणें कठीण जातें. मेंदूमध्यें सूज असेल तर ओटीमधील दुखावा वाढतो व रोग्याचें मन बेचैन करतो.

ह्या विकारांचीं माणसें सहसा दगावत नाहींत. ह्या विकारांचा रोगी कांहीं दिवस दुःखी आनंदी असा आढळतो. रोग्याला झोंप येत असेल तर हा विकार हळुहळु कमी होण्यास मदत होते.

---

# प्रकरण ९ वें

## रजःस्राव (Menstruation)

स्त्रीला यौवनावस्था प्राप्त झाली म्हणजे दर महिन्यांत गर्भाशयांतून रजःस्राव अगर विटाळ अथवा आर्तव जातो. या रजःस्रावामध्यें गर्भाशय, योनी, यांच्या Epithlial पेशी असतात. पृथ्वीतत्त्व अगर चुना (Calcium metabolism) यांच्या कमीजास्ती प्रमाणांवर आर्तव येण्याचें अवलंबून असतें. साधारणपणें १३ ते १४ व्या वर्षी ऋतुस्रावाला सुरवात होते ती ४५ ते ५० वर्षांपर्यंत चालू असते. युरोपापेक्षां आपल्या देशांत मुलींना लवकर विटाळ येतो. दर अठ्ठावीसाव्या दिवशीं पाळी येते. कांहीं स्त्रियांमध्यें ज्यास्त दिवस जातात तर कांहींमध्यें महिन्यांतून दोनदां बाहेर बसलेल्या आढळतात. पाळी अनियमित अगर दोनदां आली इकडे लक्ष न देतां त्यांच्या शरिरांवर कांहीं परिणाम होतो किंवा काय हें पाहिलें पाहिजे. हा स्राव १ ते १० दिवसपर्यंत चालू असतो, परंतु साधारणपणें ५ दिवसपर्यंत चालू रहातो. हा विटाळ ४ ते ६ औंस पर्यंत जातो, विटाळ फाजील जात असला तर पांडुरोगांसारखीं चिन्हें होऊं लागतात. पहिल्या दिवशीं रंग लाल नंतर पिंवळसर व नंतर श्वेतप्रदरांसारखा होतो. ५ व्या दिवसानंतर २ ते ३ दिवस पांढरा-पिंवळसर प्रदर जात असल्याचें आढळून येतें. पाळी येणें हें स्त्रीअंडांच्या (ovary) निरोगी स्थितीवर अवलंबून असतें. त्यामध्यें व्यंग असल्यास त्यांची वाढ बरोबर नसल्यास अगर ती काढून टाकल्यास विटाळ बंद होतो. याबाबतींत पीटयुटरी, सुप्रारीनल, व थॉयराइड या ग्रंथींची मदत असते.

(१) पाळी येण्यापूर्वी होणारे गर्भाशयांमधील फरकः—(Premenstrual Congestion) ह्याच्या ४ अवस्था कल्पिलेल्या आहेत. गर्भाशय साधारण मोठा व मऊ होतो. योनी परीक्षेच्या द्वारां गर्भाशयाची जागा मऊ झालेली आढळते. (endometrium), गर्भाशयांतील पडदा सुजून ¼ इंच जाड होतो. आंतील ग्रंथी फुटण्याच्या बेतांत असतात. रक्ताचा दाब वाढून गर्भाशयाचें संकोचन होतें.

(२) गर्भाशयाच्या संकोचनामुळें स्राव सुरू होतो.

(३) रक्ताचा दाब कमी होतो. सूक्ष्म रक्तवाहिन्या व गर्भाशय संकोच पावतो.

(४) गर्भाशय पूर्वस्थितीवर येतो.

पाळी येण्याच्यापूर्वी, ओटीमधील इंद्रियांमध्यें रक्ताधिक्य ज्यास्त होत असतें. व पाळी आल्यानंतर गर्भाशयांच्या संकोचनानें त्यामधील रक्त ओढलें जातें.(squeeze out) योनी व ग्रीवा रक्ताधिक्यामुळें लाल होतात; कांहीं स्त्रियांना ओटीमध्यें जड-पणा, कमर दुखणें, बेचैन होणें, शरीर जड वाटूं लागणें असे विकार होत असतात; शरिरामधील उष्णतामान साधारण वाढतें. संतति होण्याचा संबंध स्त्री अंड, गर्भाशय व नियमीत पाळी येणें यांवर अवलंबून असतें. स्त्रीअंडांतून पाळीच्या वेळीं फलबीजें (ovum) गर्भाशयांत जात असतात. पाळीचा व यांचा बाहेर पड-ण्याचा संबंध नसतो. ovulation occurs without menstruation. अलीकडे कुमारिकेचें वय ज्यास्त वाढल्यामुळें लग्न झाल्यानंतर पाळी न येतां गर्भधारणा झाल्याचें आढळून येतें. पाळी येण्याच्या पूर्वी ओव्हयुलेशन सुरू होतें व अशा वेळीं पुरुषांचा संबंध झाला तर गरोदरावस्था प्राप्त होते.

नैसर्गिक स्थितींत ऋतुस्राव केव्हां होतो तो कशाप्रकारचा असतो हें थोडक्यांत वर दिलेलें आहे, यांमध्यें बदल होणें यालाच रोगी स्थिती म्हणतात.

---

# प्रकरण १० वें

## योनि मार्गांचे विकार.

योनि मार्गांचे विकार समजण्यास योनी व तिचे भाग यांची शारीरइंद्रिय विज्ञान शास्त्राची माहिती असणें जरूर आहे. ह्या भागांला जे विकार होतात, ते प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय समजणें अशक्य आहे, परंतु माहितीच्या दृष्टीनें त्याचा समावेश यांमध्यें करणें भाग आहे. बेंबीच्या खालचा भाग त्यास ओंटी Pelvic cavity किंवा बस्ति प्रदेश म्हणतात. त्या अवयवाचे दोन भाग केलेले आहेत. बाह्य व अंतर; ओंटीच्या आंतल्या बाजूला गर्भाशय ( uterus ) त्यांचीं बंधनें ( appendages ) स्त्रीअंड ( ovary ) व योनी ( Vagina ) व बाह्य भागांत योनिद्वार, योनिलिंग, योनिपटल, योनिओष्ठ व केशभू हीं येतात.

पुरुषांपेक्षां स्त्रियांच्या ओंटीचा भाग अधिक रुंद, उथळ व हलका असतो. आपल्याला स्त्रियांच्या बाह्य अवयवांच्या रोगांचें वर्णन करावयाचें असल्यामुळें बाह्य अवयवांची माहिती असणें जरूर आहे.

गुह्य केशभूः—( Mons Veneris ) योनीच्या उर्ध्वभागीं प्युबिसवर जो उंच भाग आहे त्याला केशभू म्हणतात. त्वचेच्या खालीं चरबीचा भाग असतो व या भागांवर तरूणपणांत केंस येतात.

योनि ओष्ठः—( labia ) हे योनीच्या दोन्हीं बाजूला असतात व ते २–२ असतात. बाहेरील ओष्ठ त्वचेच्या घडीचा ( folds ) बनलेला असतो व तो केशभूपासून योनीच्या पश्चिम सीमेपर्यंत जातो. मोठा ओष्ठ असतो त्याला ( लेबिया मेजोरा ) पृथु ओष्ठ असेंही म्हणतात व लघुओष्ठ याला लेबीया मायनोरा असें म्हणतात. लघुओष्ठ हा आंतल्या बाजूला लहान सुरुकतीचा श्लेष्म पुडाचा ( mucus membrane ) असतो. या दोन्हीं ओष्ठांच्या आंत रसोत्पादक ग्रंथी ( lymphatic glands ) असतात. योनिलींग ( clitoris ) व योनिमुख यांचेमध्यें एक त्रिकोणाकार जागा असते त्याला ( Vestibule ) म्हणतात.

योनि लिंगः—( clitoris ) योनीच्या वर व योनीओष्ठांमध्यें त्रिकोणाकार जो उंच भाग आहे तें योनीलिंग, व तें पुरुषाच्या लिंगाशीं मिळतें असतें.

मूत्रमार्गः—( urethra ) योनिद्वारावर एक गोलाकार कांठाच्यामध्यें मूत्रमार्गाचें छिद्र असतें. त्याची लांबी १॥ इंच असते.

योनिद्वारः—( Vulva ) योनीओष्ठांचे दरम्यान योनिद्वार असतें. योनिद्वाराच्या पश्चिम भागांतील मलद्वारापर्यंतच्या प्रदेशास विटप ( Perinium ) म्हणतात, त्याचेमध्यें शिवणीची रेषा असते.

योनिपटलः—( Hymen ) योनीद्वाराचे वर कौमार्यावस्थेंत एक पडदा असतो व तो अर्धचंद्राकार असतो. त्या अर्धचंद्राकाराची अंतर्गोल दिशा पूर्वेकडे असते व त्या ठिकाणीं योनिमार्गांत जाण्यास थोडी जागा असते. कधीं कधीं हा पडदा सबंध असतो व मैथूनाची अगर आर्तवकाळाची वेळ येईपर्यंत योनिद्वार बंद असतें. हा पडदा धक्का लागल्यानें, मनावर परिणाम झाल्यामुळें फुटतो; कित्येक वेळां गर्भारवस्थेंतही कायमचा आढळतो. ह्या पडद्यावर कौमार्यत्व अवलंबून आहे असें मानण्यांत येत होतें, परंतु अनुभवानें ती समजूत खोटी ठरलेली आहे. आतां ह्या मार्गाच्या विकारांचा विचार करूं. ह्या भागाचे स्थूल दृष्टया सामान्य जनतेला समजेल एवढयाच पुरती माहिती दिलेली आहे. शरीरशास्त्र प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय समजत नाहीं, परंतु सोबतच्या आकृतींवरून वाचकांना कल्पना येईल अशी आशा आहे.

## जननेंद्रियाचे बाह्य भागांचे विकार

Preputial Adhesions:—Clitoris चें टोंक नसतें. बाह्य व अंतर ओष्ठ अशा तऱ्हेनें एके ठिकाणीं झालेले असतात कीं क्लीटोरीज त्यामुळें झांकला जातो. Labial Adhesions:—Labia Minora साधारण अगर पूर्ण चिकटलेला असतो.

Inperforate Hy men:...योनीच्या आंत मुख नसल्यामुळें विटाळ येत नाहीं.

### Swelling of the vulva ( भगोष्ठांची सूज )

Vulvitis:—लेबीयांना सूज, उष्ण, लाल, व पीडा होत असते. जुन्या विकारांत सूज कमी असते.

चिन्हें:—सूज, आग, लघवीच्या वेळीं त्रास होणें, चिकट, पातळ, पुवांसारखा स्राव होणें, चट्टे पडणें, बरेच दिवस झालेला स्राव पातळ व थोडा असतो.

Bartholin' abscess:—योनि मुखांच्या समोर व लेंबीयामध्यें ग्रंथी ( Ovoid Swelling ) युक्त सुज असते.

लक्षणें:—उष्णता, लालपणा, टोंचणी लागणें, व पू होणें.

Varicocele of the Vulva:—डाव्या बाजूला होते. वारंवार बाळंतपणा येणें, उभें राहिल्यामुळें वाढ होणें, योनीच्या भागांत जडपणा भासणें.

Pudendal Hernia:—अंतर्गत आंतडें उतरणें, सूज, मउ व दाबली असतां कमी जास्ती होते. खोकला, उभें रहाणें, उचलणें, यामुळें सूज वाढते.

Inflammation of the labium:—दोन्ही ओष्ठ सुजतात व लालसर होतात. ताप, दुखापत, शारिरिक विकृती.

योनी भागाला सूज येणें ( Edema of the vulva ) मूत्रपिंडाला विकार असल्यास सूज येण्याचा जास्त संभव असतो.

योनि भागांवर क्षतें पडणें:—( Ulcers of the vulva )

बाह्य भागांवर लहान पुळी येते, ती फुटते व त्यांतून पाण्यासारखी लस वहाते.

लक्षणें:—सांसर्गिक विकार, सूज, वंक्षणसंधीमधील गांठी वाढणें, उपदंशजन्य विषांची बाधा असणें.

Herpes vulvae:—लहान लहान एकत्र अशा पुळ्या असणें, जागा लालसर, पुळ्या फुटून क्षत होणें व हळुहळु भरणें. आग, कळा, खाज, हीं लक्षणें होतात.

Follicular vulvitis:—मोठ्या स्त्रियांमध्यें होतात. खाज, आग, पुळ्या बाह्य भागांवर केशभूपर्यंत पसरलेल्या असतात.

Pruritus vulvae—जननेंद्रियांचा बाह्य भाग स्वच्छ ठेवला नाहीं तर मळामुळें खाज उत्पन्न होते. योनिमार्गातील स्त्रावामुळें खाज उत्पन्न होते.

कारणें:—गर्भाशयाचे व स्त्रीअंडांचे विकार.

Monopause:—पाळीच्या वेळीं या भागांत आग होते व पुळ्या येतात.

जननेंद्रियांचे हे विकार हें बाह्य औषधांनीं बरे झाले नाहींत तर त्याच्या आंतल्या बाजूला संबंध असतो व ते बरें झाल्याशिवाय हें कमी होत नाहींत. ह्या विकारांची परीक्षा स्पेक्युलम वगैरे ठेऊन करावयाची असते. व त्यांचें वर्णन प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय समजणें कठीण आहे. माहिती करितां नेहमी आढळणारे सामान्य विकारांचा फक्त उहापोह केला आहे.

# प्रकरण ११ वें

## कष्टार्तव-पाळीच्यावेळीं पोटांत दुखणें (Dysmenorrhea)

Congenital malformation:—( जन्मतः व्यंग असणें )

पोटांत दुखणें, मधून मधून कळा येणें व या कळा विटाळा पूर्वी किंवा विटाळ आल्यानंतर चालू असणें.

चिन्हें:—स्राव थोडा, किंवा स्राव मुळींच नसतो. तपासलें असतां इंद्रियाची वाढ अपूर्ण झालेली असते. साउंड आंत घालण्याला अडचण पडते.

Chronic endometritis and endocervicitis :—

पाळी येण्याच्या पूर्वी कांहीं दिवस ओटिंत दुखणें चालू असतें व विटाळ आल्यानंतर कमी होतें.

चिन्हें:—पाळीच्या वेळीं व नंतर श्वेतप्रदर बराच वहाणें, पाठ व कमर दुखणें, रक्तस्राव, पांडुरोग, मज्जातंतुशिथिलता, गर्भाशयाच्या आकाराची वाढ व हात लावला असतां दुखणें, गर्भाशयांच्या आंतील पडद्यांचा संकोच, प्रमेह.

Retrodisplacement of the uterus.

रक्तस्राव होतांना पोटांत दुखतें. ओटींत दुखणें व मधून मधून कळा येणें, कमर, पाठ, दुखणें, पाळी लवकर येऊन स्राव पुष्कळ प्रमाणांत वहाणें, श्वेतप्रदर, योनिमार्गाच्या आंत दाह, वंध्यत्व, मलावरोध, अग्निमांद्य.

Anteflexion of the uterus.

पोटांत भयंकर दुखतें, पाळीच्या पूर्वीच कळा सुरू होतात व विटाळ सुरू झाला म्हणजे कमी होतात. अशा प्रकारची सुरवात यौवनावस्था प्राप्त झाल्यानंतरच प्रथमपासून आढळते.

चिन्हें:—प्रदर, वंध्यत्व, Dyspareunia, वारंवार लघ्वीला जाण्याची इच्छा होणें.

Salpingo-oophoritis:—पाळी पूर्वी व नंतर होणारा दुखावा थोडा असतो.

Cervical polyp—

पाळीच्या अगोदर व नंतर असते व गर्भाशयाच्या संकोचनामुळें मधून मधून जोराच्या वेणा येतात.

हा विकार ४० वर्षांनंतर होतो. प्रदर, रक्तस्राव, वंध्यत्व, ग्रीवेच्या बाहेर तपासलें असतां मोड आढळून येतो.

Submucous fibroid of the uterus:—वरीलप्रमाणेंच लक्षणें असतात. गर्भपात, वंध्यत्व व ग्रीवेच्या बाहेर गांठ असते.

Neuralgic-Dysmenorrhea:—

पाळीच्या अगोदर दुखावा सुरू होतो व नंतर कमी होतो. कित्येक वेळां विटाळ चालू असतांसुद्धां कळा सुरू असतात व विटाळ बंद झाल्यानंतरही बंद झालेल्या आढळत नाहींत. ह्या कळा तीव्र असून ओटीपासून पोट, छाती, मांड्यापर्यंत वाढत असतात.

चिन्हें:—श्वेत, प्रदर, बेंबीच्या उजव्या बाजूला ताठरपणा, विटाळ जातांना कळा येणें व उभे राहिलें असतां अगर चाललें असतां वाढणें, उन्हाळे, dysuria.

Cystic-ovary—

ओटींमध्यें चाकूनें भोंसकल्यासारख्या कळा येतात.

चिन्हें:—ओटींमध्यें दुखणें, पाठ दुखणें, रक्तस्राव फार होणें, घाबरेपणा व स्त्रीअंडाची वाढ झालेली आढळणें.

Membranous-dysmenorrhea:—

प्रथमतः दुखावा थोडा व सारखा चालू असतो. नंतर मधुन मधुन सुरू होतो स्रावांमध्यें Cast पडल्यानंतर कमी होतो.

चिन्हें:—प्रत्येक पाळीच्या वेळीं विटाळामध्यें गर्भाशयाच्या अंतस्त्वचेचे तुकडे आढळून येतात.

चिन्हें:—प्रकृति चांगली नसणें, पांडुरोग, मज्जातंतुशिथिलता, हिस्टेरिया.

Pelvic-Peritonitis:—

पाळीच्या मध्यंतरीं ह्या कळा लागतात. ह्या फार तीव्र नसतात. ह्या ओटींमध्यें पाठ, बेंबीच्या खालची बाजू, आंतून ओढल्यासारख्या व मांडीपर्यंत वाढतात. विटाळाच्या सुरवातीस कळा सुरू होतात व नंतर कमी होतात.

चिन्हें:—बेंबीच्या खालीं दाबलें असतां मृदुपणा व दुखावा, मलावरोध, पोटफुगी, उलटी, योनिमार्गाचा दाह, ताप हीं लक्षणें आढळतात.

# प्रकरण १२ वें.

## गर्भाशयांतून रक्तस्राव होणें ( Uterine bleeding )

गर्भाशयांतून रक्तस्राव पुष्कळ प्रमाणांत होतो व तो बरेच दिवस चालू रहातो. स्रावांमध्यें रक्ताच्या गुठळ्या होतात. हा रक्तस्राव प्रत्येक स्त्रीच्या प्रकृतिमानावर अवलंबून असतो. निरोगी, मांसल, प्रसूत झालेली व उत्तम प्रकृतीची अशा स्त्रीमध्यें हा स्राव फार होतो. गरिबी, अशक्तता, सडसडीतपणा अशा स्त्रियांमध्यें हा स्राव कमी प्रमाणांत होतो, तरुण स्त्रियांमध्यें प्रथमतः ऋतुस्राव होतो त्यावेळीं रक्तस्राव पुष्कळ होण्याचा संभव असतो. निसर्गाच्या नियमाच्या विरुद्ध व फाजील संभोग या कारणांमुळें हा विकार होतो.

पाळी आली नसतां गर्भाशयांतून एकाएकीं रक्तस्राव होतो व याला शरिरामधील विकृति हें कारण असतें. याला इंग्रजींत ( Metrorrhagia ) म्हणतात. पांडुरोग, सांसर्गिक ज्वर, मनोविकारांची प्रक्षुब्धता, संधिवात, मलेरिया, यकृत्, प्लीहा व हृदय यांचे विकार या कारणांमुळें रक्तस्राव होतो.

कारणें:—गर्भपात, गर्भस्राव यामुळें रक्तस्राव फार होतो व तो फार दिवस चालू रहातो. गर्भाचा किंवा पडद्यांचा गर्भाशयामध्यें अवशिष्ट भाग शिल्लक राहिला असेल तर तो बाहेर पडेपर्यंत रक्तस्राव कमी होत नाहीं. गर्भाशयांत कळा मारणें, पाय फुटणें अशीं लक्षणें ३–४ महिने गेले असतां होऊं लागलीं म्हणजे गर्भपात होऊन रक्तस्राव पुष्कळ प्रमाणांत जाण्यांचें सुरू होतें व हा स्राव गर्भाचे सर्वभाग बाहेर पडून गेल्यानंतर कमी होतो.

लक्षणें:—गरोदरपणाची माहिती, गर्भपात होण्याकरितां कांहीं औषधींचे प्रयोग केले किंवा काय, नाळ, गर्भाचीं आवरणें, रक्ताच्या गांठी, सांपडतात. योनि परीक्षा केली असतां गर्भाशयाचा आकार वाढलेला व ग्रीवा मृदु लागते.

Uterine fibroids:—( खोट्या ग्रंथी गर्भाप्रमाणें होणें ).

गर्भाशयामध्यें गर्भाप्रमाणें खोटया ग्रंथी उत्पन्न होतात व प्रत्येक पाळीच्या मध्यंतरीं स्राव होतो. अतिशय श्रम, फाजील संभोग, राग, वगैरेमुळें एकाएकीं रक्तस्राव सुरू होतो. fibroid polypus असेल तर पाळीच्या बरोबर रक्तस्रावाचें प्रमाण वाढतें.

लक्षणें:—प्रदर, कष्टार्तव, ओटीमध्यें दुखणें, ( Vesical and rectal symptoms from pressure ) वंध्यत्व, गर्भपात, पांडुरोग, पचनक्रियेमध्यें बिघाड हीं लक्षणें असतात.

Chronic endometritis:—

ह्यामध्यें क्वचित रक्तस्राव होतो, परंतु स्राव मधून मधून होतो. स्रावाचा रंग चिकट, पाण्यांसारखा पू मिश्रीत असा आढळतो.

चिन्हें:—गर्भाशय स्थानच्युत होणें, आंतल्या बाजूला इजा झालेली असणें, ग्रंथी, सांसर्गिक विषाची बाधा, पाळीच्या पूर्वी व नंतर श्वेतप्रदर बऱ्याच प्रमाणांत जाणें, कमर दुखणें. आंतून परीक्षा केली असता गर्भाशयाचा आकार मोठा व त्यांतून तुकडे जात असलेले आढळतात.

Carcinoma of the uterus:—गर्भाशयामध्यें दुष्ट व्रण होणें.

ह्या विकारामध्यें रक्तस्राव हें पहिलें संशय उत्पन्न होण्यास कारण असतें. संभोगामुळें, व्यायामामुळें, अतिशय मेहनतीमुळें येणारा थकवा, यावेळीं थोडासा आरंभी रक्तस्राव होतो. योनीमधील स्राव रक्तमिश्रीत आढळतो. कांहीं काळानंतर पाळीच्या वेळीं पुष्कळ रक्तस्राव होतो व कधीं कधीं मधून मधून रक्तस्राव होऊन तो बरेच दिवस चालू रहातो. ज्यांचा ऋतु बंद झालेला आहे त्यांना कांहीं वर्षांनीं हा स्राव पुनः सुरू होतो व अशावेळीं पुनः पाळी सुरू झाली असें समजण्यांत येतें; योग्य ती परीक्षा वेळींच करून ठरवलें पाहिजे. स्रावाला बास येतो.

चिन्हें:—३० ते ६० वर्षांपर्यंत होण्याचा संभव; पाण्यासारखा रक्तमिश्रीत स्राव होणें, सूक्ष्मदर्शक यंत्रानें परिक्षा करून घेणें.

Ectopic pregnancy:—( बाह्य भागांत गर्भ धारणा होणें ).

ह्यामध्यें बऱ्याच काळपर्यंत पाळी बंद असते व एकाएकीं गर्भाशयांतून रक्तस्राव सुरू होतो. गर्भाशयामध्यें तीव्र वेदना येतात व स्राव होतो. स्राव पुष्कळ प्रमाणांत होतो, त्याचा रंग लाल, पिंवळसर असून हा स्राव गोंठत नाहीं.

लक्षणें:—मूल किती दिवस झालें नाहीं हें पहाणें, गरोदरावस्थेचीं चिन्हें कधीं आढळलीं होतीं किंवा काय, ओटीमध्यें चाकूनें भोंसकल्यासारखें वाटणें

व बेचैन होणें, ग्रीवा मृदु असणें, गर्भाशय स्थानच्युत होणें, आंतल्या आंत रक्तस्राव झाल्याचीं लक्षणें आढळणें.

Monopause:—

यामध्यें रक्तस्राव पुष्कळ व बरेच दिवस चालू असतो. यांमध्यें, दुष्टव्रण, मोड, ग्रंथी आहे किंवा काय हें पाहिलें पाहिजे.

लक्षणें:—साधारणतः ४० ते ५० वर्षांपर्यंत होतो. बेशुद्धी, नष्टार्तव, चेहरा लाल होणें, कमरेंत दुखावा, घाम येणें, छातींत धडका, बेचैन.

Placenta praevia:—हा रक्तस्राव ७ व्या महिन्यापासून सुरू होतो, व तो एकाएकीं झोंपेमध्यें सुरू होतो-बंद होतो पुनः सुरू होतो-किंवा सारखा चालू रहातो. कधीं कधीं वेणा सुरू झाल्या म्हणजे रक्तस्राव सुरू होतो व त्याचें पर्यवसान गर्भस्रावांत होतें.

लक्षणें:—गरोदरावस्था, ग्रीवा तपासली असतां मृदु व चिकटपणा लागणें, पोटामध्यें गर्भाचा भाग स्पंजासारखा लागणें.

Inversion of the uterus:—

गर्भाशय मूळ स्थितीवर नसेल व त्याला बरेच दिवस अगर वर्षें झालीं असतील तर कधीं कधीं पुष्कळ प्रमाणांत रक्तस्राव होतो.

चिन्हें—Acute inversion:—वार जोरानें ओढून बाहेर काढणें. यामुळें मनाला धक्का, पोटांत कळा व गुदद्वारांच्या ठिकाणीं ओढ लागणें हीं लक्षणें होतात.

Retrodisplacement of the uterus:—

अत्यार्तव व गर्भाशयांचा संकोच, रक्तमिश्रित स्राव होणें व गर्भाशयांच्या आंतील पडद्याला सूज.

लक्षणें:—पोट दुखणें, ओटीमध्यें ओढल्यासारखें व जडपणा वाटणें, पोट भरल्यासारखें वाटणें, पांढरा—पिवळसर प्रदर, वंध्यत्व, डोकें, कपाळ दुखणें, मज्जातंतू व अपचन क्रियेमध्यें बिघाड, योनिपरिक्षा केली असतां गर्भाशय जागेवर न आढळणें.

Salpingo—oophoritis:—

पाळी लवकरच येऊन स्राव बरेच दिवस चालू राहतो. हा स्राव १ ते १० दिवस पर्यंत रहातो.

लक्षणें:—चिकट पुवांसारखा स्राव, ओटीमध्यें मधून मधून दुखावा, कमर दुखणें, लघवीला त्रास होणें, पाळीच्याप्रमाणें कळा येणें.

Subinvolution of the uterus:—

चिन्हें:—नुकतेंच झालेलें बाळंतपण यामध्यें पाठीपासून गुदद्वारापर्यंत कळा येणें, प्रकृति बिघडणें व रक्तस्राव चालू असणें.

Chronic–oophritis:—

Cystic असेल तर रक्तस्राव चालू असतो.

चिन्हें:—पाळीच्यावेळीं चालतांना, उभें रहातांना स्त्रीअंडाच्या कळा येणें व त्या मांड्यापर्यंत वाढणें, पाळीच्यावेळीं पोटांत दुखणें, स्तनांमध्यें पीडा, वंध्यत्व, मज्जातंतुशिथिलता, स्त्रीअंड मृदु व त्यांची वाढ होणें.

Prolapse of the uterus:—

रक्तस्राव वारंवार होतो.

चिन्हें:—पाठ व कमर दुखणें, ओटीमध्यें जडपणा व दाब वाढणें, गुदद्वारांच्या आंत ग्रंथी, ( rectocele ) प्रदर, डोकें दुखणें, पचनक्रियेंमध्यें बिघाड, मज्जातंतुशिथिलता—योनिपरीक्षेनें गर्भाशय आंतल्या बाजूला किती आला आहे हें कळतें.

Cervical Polypi:—

रक्तस्राव सतत असतो. कधीं कधीं रक्तस्राव थोडा होतो, त्याचप्रमाणें थकवा वाटतो, खालीं वाकलें असतां संभोगाचे वेळीं थोडा रक्तस्राव होतो.

Laceration of the cervix:—गर्भाशयाचा दाह व subinvolution मुळें रक्तस्राव होतो. संभोगाच्यावेळीं सुद्धां रक्तस्राव होतो.

---

# प्रकरण १३ वें

## नष्टार्तव ( Amenorrhoea )

स्त्रियांचें आरोग्य नियमीत पाळी येण्यावर अवलंबून असतें. त्यामध्यें बिघाड झाला तर त्याचा शरिरावर परिणाम होतो. नैसर्गीक स्थिती म्हणजे यौवनावस्था येण्यापूर्वीची स्थिती, गरोदरावस्था, बाळंतपणा, मूल अंगावर पीत आहे ती अवस्था, यांमध्यें ऋतु बंद असणें स्वाभाविकच असतें. या नष्टार्तवामध्यें २ प्रकार आहेत ( १ ) (Primary) ( २ ) ( Secondary ) पहिली अवस्था म्हणजे १२ ते १४ वय झालें म्हणजे ऋतुस्राव होण्याला सुरुवात होते अशा वेळीं विटाळ बंद असणें, दुसरी अवस्था म्हणजे १ दां पाळी येते व मग बंद होते.

Oophorectomy and hysteretomy करून कृत्रिमतेनें विटाळ आणतां येतो. पांडुरोग, सर्दी, उपदंश, दुष्टव्रण, यांमध्यें रजस्राव बंद असतो. दोषिक ज्वर आला असल्यास कांहीं दिवस पाळी बंद रहाते. नष्टार्तवाला अशीं निरनिराळीं कारणें घडत असतात.

तारुण्यावस्थेंत ज्या स्त्रीला १४ ते १६ वर्षे झालें आहे तिला जर पाळी आली नाहीं तर स्त्रीअंडामध्यें व्यंग असलें पाहिजे हें सिद्ध होतें.

Congenial Malformations:—

आनुवंशिक व्यंग असेल तर दर महिन्याला भास होतो, परंतु आर्तवस्राव होत नाहीं.

चिन्हें:—योनी परीक्षा, हायमेन पडदा न तुटणें, योनीमध्यें व्यंग असणें, थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे जननेंद्रियांमध्यें व्यंग असतें, त्याची व्हावी तशी वाढ झालेली नसते.

Chlorosis रक्तक्षयः—नष्टार्तव असतो.

क्षय Chronic Pulmonary Tuberculosis:—

चिन्हें:—अग्निमांद्य, हृदयामध्यें भडका, अशक्तता, कडकी हीं लक्षणें असतात.

Acromegaly—यांमध्यें नष्टार्तव हें मुख्य लक्षण असतें.

Hyperinvolution of the uterus—

गर्भाशय व स्त्रीअंड यामध्यें ( atrophic Changes ) झाल्यामुळें पाळी येण्याचें बंद रहातें.

चिन्हें:—गर्भपात अगर बाळंतपण माहिती. श्वेत प्रदर बऱ्याच प्रमाणांत जाणें, कमर, पाठ, दुखणें, डोकें दुखणें, मज्जातंतूशिथिलता.

Ectopic-Pregnancy:—नष्टार्तव असून गरोदरपणांचीं चिन्हें आढळतात.

# प्रकरण १४ वें.

## संभोगजन्य पीडा ( Sexual Troubles )

संभोगाच्यावेळीं अडचण अगर पीडा होणें याला Dispareunia म्हणतात. संभोग करण्यास कठिण असतें पण दुःख होत नाहीं, त्रास होतो पण दोन्ही बाजू कठीण व त्रासदायक असतात. नवमतवादाच्या बोलबाल्यामध्यें स्वैराचार बोकाळत असल्यामुळें अशा प्रकारच्या अडचणी प्रत्येक तरुण स्त्री पुरुषांना भासणार हें उघड आहे. व या विषयांचें ज्ञान वैद्यकीय दृष्ट्या नसल्यामुळें भावी परिणाम परस्परांच्या शरिरविकृतींत होण्याचा जास्त संभव असल्यामुळें ह्या पुस्तकामध्यें त्याबद्दलचा उल्लेख करावा लागत आहे.

संभोग करण्यास कठीण पण दुखावा नसणें:—( Difficulty without pain ) प्रॅक्टिसमध्यें अशा तऱ्हेचे विवाहित लोक विचारणारे आढळतात कीं, संभोग होण्यास अडचण पडते. परस्परांची माहिती विचारतां अगर तपास करतां योनिमार्ग नसतो, त्यांमध्यें व्यंग असतें अगर तो बंद असतो, किंवा पुरुषांच्या इंद्रियांमध्यें निर्बलता असते. योनि मार्गांत व्यंग नसेल, तिचा संकोच झालेला नसेल तर पुरुषांमध्येंच काहीं व्यंग आहे असें समजावें.

अडचण नसतां दुःख होणें:—( Pain without difficulty ) ओटीमधील इंद्रियांना सूज असणें, गर्भाशय वांकडा होणें, स्त्रीअंडांमध्यें मृदुपणा येणें ( tenderness ) किंवा गर्भाशयाचा दाह होऊन Retroflexion असणें. या विकारांमध्यें योनिमुखांचा ( Vulva ) संकोच अगर मृदुपणा नसतो व यामुळें पुरुषांच्या इंद्रियाला अडचण भासत नाहीं, परंतु इंद्रियांचा जोर ह्या मृदु मांड्यावर पडल्यामुळें दुःख होतें. हा भाग मृदु आहे किंवा नाहीं तें योनी परिक्षा केल्यानंतर समजतें. योनीच्या बाजूच्या कडा ( walls ) चिकटल्या नसतील तर मृदु पेसरी बसवली असतां त्रास होणें कमी होतें. ह्या कडा चिकटल्या असतील तर पेसरीचा त्रास होतो. ज्या बाईला बऱ्याच वर्षांत मूल झालेलें नसेल व जिला Retroflexion असून पेसरी ठेवली असतां दुःख कमी होत नसेल तर शस्त्रक्रिया करणें भाग पडतें.

दुःख व अडचण भासणें:—( Pain and difficulty )

ह्याला तीन कारणें असतात. योनीचें द्वार लहान असणें ( २ ) स्पर्शासह्य योनि ( Vaginismus ) ( ३ ) योनिमुखाला रोग असणें ( Diseases of vulva )

योनिमुख लहान असणें:—योनिमुख लहान असतां प्रथमच संभोग झाला तर त्रास होतो, दुखावा सुरू होतो व रक्तस्रावही होतो. अशावेळीं स्त्रीच्या मनांत एक प्रकारची धडकी भरून ती संभोग देण्याचें टाळते; अशा प्रसंगीं योनिमार्ग तज्ज्ञ डॉक्टरकडून मोठा करून घेणें.

स्पर्शासह्य योनी ( Vaginismus )

योनिमुखाची अंतस्त्वचा ( Sensitive ) तक्षिण असते, व त्याच वेळीं गुद-द्वारांच्या स्नायूंचा संकोच होतो. संभोगाच्या वेळीं योनिमुखाला स्पर्श झाल्यास दुःख होतें व त्याबरोबर गुदद्वारांच्या स्नायूंचा संकोच होऊन योनिमुख बंद होतें. पाळीच्या वेळीं त्रास होणें व एनिमा दिला असतां त्रास होणें अशा प्रकारची स्थिती स्त्रियांमध्यें आढळते. हा विकार असणाऱ्या स्त्रीला संभोगेच्छा नसते. परंतु कित्येकवेळां याच्या उलट स्थिती आढळते. ही स्थिती लग्न झाल्यानंतर आढळून येते.

( २ ) पाळीच्या वेळीं त्रास होतो अशावेळीं ग्रीवेचें प्रसरण केल्यास विटाळ साफ जातो, संभोगेच्छा जागृत होते व हा विकार कमी होतो.

( ३ ) ह्या विकारांमध्यें वंध्यत्व येण्याचा संभव असतो.

( ४ ) लग्न झाल्यानंतर मनाला धक्का बसून अगर पाळी बंद झाली असतां हा विकार होतो.

निदानः—मनाच्या दुर्बळ असणाऱ्या स्त्रियांमध्यें योनिमुख लहान असतें, त्यामध्यें बोट घातलें असतां स्त्रीला त्रास होत नाहीं व वरील लक्षणेंही आढळत नाहींत. खरें पाहिलें असतां ह्या विकारांमध्यें बोट लागलें तरी दुखवा होतो.

चिकीत्साः—तज्ज्ञ डॉक्टरकडून करून घ्यावी.

योनिमुखाला विकार ( Diseases of the Vulva )

मूत्रमार्गाच्या ठिकाणीं दुष्टव्रण असणें, रक्तामध्यें बदल होणें, चट्टे, पुळ्या—हीं सर्व चिन्हें लग्नानंतर झालेलीं आढळतात.

Kraurosis Vulva:—हा क्वचितच होतो. योनि मृदु व योनि मुखाचा संकोच झालेला असतो.

संभोगेच्छा नसणें:—Absence of sexual feeling.

शरिरप्रकृति चांगली असते. इंद्रियांमध्यें व्यंग नसतें; परंतु संभोगेच्छा होत नाहीं. अशावेळीं प्रत्येकाला विचार पडतो. अशा स्त्रियांना मुलें होतात, परंतु त्यांची प्रवृत्ति या मार्गाला नसते. फार काय अशा स्त्रियांचें लग्न झालें तर त्या नवऱ्यापासून वेगळ्या रहातात. इंद्रिय-विज्ञानदृष्ट्या याचें मानसिक कारण असूं शकतें; कित्येक वेळां बऱ्याच वर्षांनंतर सतानेच्छा होऊन ही वृत्ति जागृत होते. संभोगाच्या वेळीं त्रास होत असेल तर इच्छा बंद होते. अशावेळीं त्याबद्दलचें कारण पाहून तें दूर करावें. नवऱ्यामध्यें व्यंग असेल, त्याला समाधान करण्याची ताकद नसेल तर हळुहळु विरक्तपणा येतो.

फाजील संभोगेच्छा:—Sexual feeling in excess कांहीं स्त्रियांना भयंकर संभोगेच्छा असते. मनोविकार जागृत होऊन जननेंद्रियामध्यें दाह उत्पन्न झाल्यामुळेंहि इच्छा होते.

नवऱ्याचें न पटणें, वैधव्य येणें, अशा स्त्रियांमध्यें अतृप्त मनोविकार राहिल्या-मुळें स्वप्नें पडून रेतस्खलन होऊन समाधान होतें. कुमारिकेमध्येंहि वयांत आल्या-नंतर अशा प्रकारची स्थिती होते. स्त्रियांचा स्वभाव नैसर्गिकच लाजाळु असल्या-मुळें त्या आपले मनोविकार दाबूं शकतात. सायकलवर बसणें, मांड्या घासणें, शिवण्यांच्या मशिनवर काम करणें, यामुळें मनोविकार जागृत होतात. भिडेमुळें—अगर भितीमुळें जरी स्त्रिया अगर कुमारिका बोलल्या नाहींत तरी याचा हळुहळु शरिरावर परिणाम होतो. ह्या गोष्टी शहरांमध्यें असणाऱ्या मुली, अविवाहित कुमारीका यांच्या प्रकृतीचें बारकाईनें निरीक्षण केलें असतां आढळून येईल. निसर्ग आपलें कार्य समजून व उमजून बजावित असतो; व ही स्थिती फार दिवस चालू राहिली म्हणजे क्षय, पाडुरोग सारखे विकार होऊं लागतात. मज्जा-तंतूचे विकार असल्यास अशा प्रकारची इच्छा होते. कित्येकवेळां वेडहि लाग-ण्याचा संभव असतो.

Masturabation in the female:—

मुष्टिमैथुन करणाऱ्या स्त्रिया रोगी असतात. ज्या मुलींना ही खोड असते, त्या हट्टी व रागीट बनतात, पुढें पुढें त्या फार लाजाळु, भितऱ्या व एकलकोंड्या बनतात. त्यांना एकांतवास प्रिय असतो. योनीच्या ठिकाणीं excoriation आढळतात. अशक्तता व मज्जातंतुक्षीणता असणाऱ्या मुलींना लघवीला वारंवार होतें. अशावेळीं बारकाईनें चौकशी करावी. अशा संवयीला मारानें अगर रागें भरून चालत नाहीं, औषधें किंवा शस्त्रक्रियाहि चालत नाहीं तर ते भाग स्वच्छ धुऊन कोरडे ठेविले पाहिजेत. ह्या संवयीमुळें मज्जातंतूवर परिणाम होतो. जननेंद्रियें स्वच्छ धुतलीं नाहींत तर तेथें घाण राहून ते भाग उत्तेजित होतात व मज्जातंतु उत्तेजित होऊन रेतस्राव होतो व हळुहळू शरिरप्रकृतीवर त्याचा परिणाम होऊं लागतो.

# प्रकरण १५ वें.

## संतति नियमन ( Brith Control )

कालमानाप्रमाणें संतति कमी जास्ती असावी, किंवा मुलींच असूं नये अशा तऱ्हेचे प्रश्न निरनिराळ्या सबबींनीं पुढें विचाराला मांडले जात आहेत. संतति-नियमन केलें असतां, त्या पासून भावी परिणाम प्रत्येकाला काय भोगावे लागतील, अगर त्या साधनांचा शरीरप्रकृतीवर निराळा कांहीं परिणाम होईल कीं काय, या विचाराकडे सहसा कोणाचें लक्ष जात नाहीं. संभोग हें शास्त्र आहे. व त्यापासून परस्परांना शारीरिक व मानासिक आनंद व सौख्य होत असतें, हा आनंद उत्पन्न होण्यास परस्परांच्या मनांत एकसमयावच्छेदें करून तेच विचार आले पाहिजेत. ह्या मध्यें कांहीं आडकाठी असेल किंवा कोणी प्रकृतिनें रोगी असेल तर त्यापासून फायदा न होतां नुकसानच होईल. शास्त्रानें याला नियम घालून दिलेले आहेत. व ते पाळणारानाच त्याचें रहस्य काय हें समजणारें आहे. संभोगापासून होणाऱ्या सुखाला तीन प्रकारची आवश्यकता असते. शारीरिक, ( Physical ) रसायनिक ( Chemical ) व घर्षण ( Frictitionl ) ह्या तीन अदृश्य शक्तींचा ( electricity ) एके ठिकाणीं संयोग होतो त्याच वेळेला मनाचें खरें समाधान होतें, परंतु ह्या गोष्टी नेहमीं करीन म्हटलें तर त्यांपासून दोघांच्याहि शरीरप्रकृतीवर अनिष्ट परिणाम झाल्यावांचून राहणार नाहींत. परस्परांचा वीर्यपात एकाच वेळीं होतो, त्याच वेळेला खरें समाधान व सुख होत असतें, परंतु ह्या गोष्टी प्रतिबंधक साधनांनीं साधत नसतात. संततिनियमनाची जरुरी दरवर्षी पाळणा आणणाऱ्या स्त्रिया, अशक्त, शारीरिक व्यंग असणाऱ्या, दारिद्र्यांत गांजलेल्या, कष्टप्रद प्रसूति असणाऱ्या अशा स्त्रियांना या मार्गाची आवश्यकता बहुतांशी असूं शकते व त्या संबंधीं कोणतीही गोष्ट करतांना तज्ज्ञ डॉक्टरांचा सल्ला घेऊनच ती विचारांत अगर कृतींत उतरणें योग्य होईल. स्वतःच्या जबाबदारीवर अशा प्रकारच्या गोष्टी करणें केव्हांहि हानिकारक झाल्यावांचून राहणार नाहीं.

गरोदरावस्था प्रतिबंध करणें:—( Prevention of Pregnancy ) बेकारी, दरवर्षी येणारीं बाळंतपणें, विषय सुखाचें सेवन ह्या कारणांमुळें संततिनियमनाची आवश्यकता प्रत्येकाला वाटूं व पटूं लागलेली आहे. संततिनियमन

करणारीं नाना तऱ्हेचीं साधनें पाश्चात्यांकडून पुरवलीं जात आहेत सांसारिक व वैवाहिक सौख्यासाठीं लग्न करणें ही अत्यंत महत्त्वाची बाब आहे परंतु आजकाल लग्न झालें म्हणजे—रोजच्या जेवणां प्रमाणें स्त्रीसंभोग करणें ही एक आवश्यक गोष्ट आहे अशी अलीकडील नवमतवादी तरूण स्त्रीपुरुषांची समजूत झालेली असते! वीर्याचा व शरीरप्रकृतीचा किती निकट संबंध आहे याचा सहसा कोणी विचार करीत नाहीं. फाजील वीर्यपात, त्याचप्रमाणें फाजील पुरुषसंबंध झाला तर त्याचा शरिरावर अनिष्ट परिणाम झाल्याशिवाय रहात नाहीं. मुलें न होतां आमची चैन सतत चालली पाहिजे असें सांगणारा वर्ग फार बोकाळला आहे. याचें कारण म्हणजे धार्मिक शिक्षणाचा अभाव व वैयक्तिक स्वातंत्र्य हेंच म्हणावें लागेल. पाश्चात्य शिक्षणानें त्यांच्या चांगल्या गोष्टी आम्हीं न उचलतां शरिराला हानिकारक, निरुपयोगी अशा गोष्टींचें आम्हीं अनुकरण केलेलें आहे व करीत आहों. पाश्चात्यांची प्रत्येक गोष्ट चांगली अशीच आमची समजूत झालेली आहे. असो. या बाबतींत वैद्यकीय दृष्ट्या शरिरावर काय परिणाम होतात याचा विचार करूं.

संततिनियमनांचे तीन प्रकार आहेतः—

पहिला प्रकारः—योनीमध्यें वीर्याचा प्रतिबंध करणें, अशा प्रकारें प्रतिबंध केला म्हणजे गरोदरावस्था प्राप्त होत नाहीं. ज्या स्त्रीच्या मनांत कामविकार नसतात किंवा अगदीं अल्प असतात तिच्यावर या साधनाचा तिच्या इच्छेवर कांहीं परिणाम होत नाहीं; परंतु याच्या उलट जिची इच्छा प्रबळ आहे, तिला या साधनांनीं समाधान न होतां उलट कामेच्छा वाढून त्याचा प्रतिबंध झाल्यामुळें ओटींत दुखणें, मज्जातंतुशिथिलता, हुषारी नसणें व नानातऱ्हेचे वायूचे विकार होत असतात. नैसर्गिक नियमित संबंधामुळें परस्परांच्या प्रकृतीवर जो फायदा होतो त्याच्या उलट मुलें पुरवलीं परंतु हा मार्ग नको असें स्त्रीच्या वारंवार होणाऱ्या प्रकृतीच्या अस्वास्थ्यपणामुळें वाटूं लागतें.

( २ ) दुसरी कृति म्हणजे गर्भाशयामध्यें वीर्यजंतूचा प्रतिबंध करणें होय. यामुळें गरोदरपणा येत नाहीं. वरच्या पेक्षां ह्या मार्गानें संबंधाला अडचण येत नाहीं; परंतु कित्येक वेळां गरोदरपणाही येण्याचा संभव असतो; व हळुहळु वंध्यत्व येतें.

( ३ ) औषधानीं वीर्यजंतू मारणें ही तिसरी तऱ्हा आहे. परंतु ह्या जंतुघ्न औषधांच्या तावडींतून एखादा वीर्यजंतू गर्भाशयामध्यें गेला तर गरोदरपणा येतो. सर्वांमध्यें त्यांतल्या त्यांत ही कृति बरी म्हणतां येईल.

शास्त्रीय दृष्टीनें खात्रीचे असे आजकाल जीं संततिप्रतिबंधक साधनें व उपाय पुढें मांडण्यांत आलेले आहेत त्यांची थोडक्यांत खालील प्रमाणें माहिती आहे.

प्रकार १ लाः—ह्यामध्यें दोन प्रकारच्या वड्या असतात. फेंस येणाऱ्या ( effervesent ) व फेंस न येणाऱ्या. ( non-effervesent ) फेंस युक्त वड्या वीर्यजंतु नाशनांचें काम उत्तम करतात. सीमोरी ( Semori ) स्पेटन, पेटेनटेक्स ह्या नांवानें मिळणाऱ्या वड्या त्यांतल्या त्यांत उत्तम व खात्रीच्या असतात.

प्रकार २ राः—फेंस न येणाऱ्या वड्या, ( non-effervesent ) त्यांमध्यें क्वीनाइन, लॅक्टिक असिड, चिनसोल हीं द्रव्यें असून ह्या कोकोबटर पासून तयार करतात.

प्रकार ३ राः—रबर पेसरी ही गर्भाशयाच्या तोंडाला टोपी सारखी बसल्यामुळें वीर्यजंतूचा शिरकाव आंत होत नाहीं. ही डच पेसरी या नांवानें प्रसिद्ध असून हिचे १८ नंबर आहेत. ह्या पेसरीची निवड करतांना शक्यतों मोठ्या आकाराची घेण्याची सावधगिरी बाळगावी. योनी अगर गर्भाशय यांमध्यें बिघाड असेल तर डुमास कॅप घ्यावी. कॅरोमेक्स डायफ्राम म्हणून ह्या पेसरीचा एक दुसरा प्रकार आहे.

प्रकार ४ थाः—१–२००० पाण्यांमध्यें पोटेशपरमेगंनेट घालून त्यांमध्यें स्पंज बुडवून तो योनींमध्यें ठेवावा किंवा साबणाचें पाणी किंवा गोडेंतेल याचा उपयोग करावा.

प्रकार ५ वाः—जेथें रबर पेसरी मिळत नसतील तेथें मऊ कापसाची घडी लिंबाचा रस अगर तुरटीचें पाणी—यांचें सौम्य द्रावण करून त्यामध्यें बुडवून उपयोग करावा.

प्रकार ६ वाः—थंड पाण्यामध्यें रबरस्पंज बुडवून ठेवला असतां १५ सेकंदांत वीर्यजंतु मरतात. हें औषध सोपें, अपायरहीत व इंद्रियाला इजा न करणारें आहे.

प्रकार ७ वा:—पुरुषानें शस्त्रक्रिया करून घेणें. ही शस्त्रक्रिया १५–२० मिनिटांत स्थानिक संज्ञा नाशक औषधानें करतां येते. ह्यामध्यें शुक्रवाहक नलिका ( Vasadeferentia ) कापून ती बांधून ठेवतात, त्यामुळें वीर्यजंतु जाण्यांचें बंद होते. ह्या क्रियेमुळें गर्भधारणा होत नाहीं. याला इंग्रजींत व्हासेक्टॉमी असें म्हणतात; त्याच प्रमाणें स्त्रियांमध्यें फलवाहक नलिका कापून बीजें गर्भाशयांत जाण्यांचें बंद करितात याला इंग्रजींत सॅलपिंजेक्टॉमी असें म्हणतात.

अशा तऱ्हेच्या शस्त्रक्रिया ज्या स्त्रीपुरुषांनीं करून घेतल्या आहेत त्यांची मानासिक व शारीरिक शक्ति वाढते असा तज्ज्ञांचा अनुभव आहे.

प्रकार ८ वा:—ग्रॅफन बर्गस रींग ( grafen berg's ring ) या नांवाची चांदीची वाटोळी रिंग असते, ती गर्भाशयांच्या ग्रीवेला अडकवतात, परंतु त्या पासून रक्तस्राव, पोटांमध्यें दुखणें असे प्रकार होऊं लागल्यामुळें ही पद्धत मागें पडलेली आहे.

प्रकार ९ वा:—पुरुषानें रबराची पातळ पिशवी वापरणें. (French letter)

प्रकार १० वा:—संयोग झाल्यानंतर तावडतोब थंड पाण्याचा डुश घेणें; परंतु हा मार्ग फलप्रद नसतो. वारंवार डुश घेतल्यामुळें शरीर प्रकृतीवर अनिष्ट परिणाम होतो.

प्रकार ११ वा:—स्त्रीला दर २८ व्या दिवसांनीं पाळी येते. पाळी आल्यानंतर १० व्या दिवसापासून १७ दिवस पर्यंत संयोग केल्यास गर्भधारणा होत नाहीं असें जपानचे डॉ आगिनो यांचें मत आहे.

प्रकार १२ वा:—संभोगापूर्वीं सैंधव गोळ्या तेलांत भिजवून योनीमध्यें १५–२० मिनिटें ठेवावा व तो काढून टाकून संभोग करावा.

प्रकार १३ वा:—वीर्यपात होण्यापूर्वीच इंद्रिय बाहेर काढणें.

चिकित्सकांचें कर्तव्यः—हल्लीं डॉक्टर वैद्यांना प्रॅक्टीसमध्यें संततिप्रातिबंधक सल्ला विचारणारे पुष्कळ आढळतात. त्यांच्या माहिती साठींच वरील उपाय दर्शविले आहेत. परंतु आपल्याला एवढेंच म्हणतां येईल किंवा सांगतां येईल कीं, ह्या सर्व कृति निसर्गाच्या तत्त्वांविरुद्ध असल्यामुळें परस्पराला शारीरिक व मानसिक परिणाम भोगावे लागतील मग ते आज असोत अगर कालांतरानें असोत. निसर्गाच्या विरुद्ध वागणाराला केव्हां ना केव्हां तरी शिक्षा मिळाल्याशिवाय रहात नाहीं, हें प्रत्येकानें लक्षांत ठेविलें पाहिजे.

ज्यांना मुलें नकोशीं असतात, त्यांच्या स्त्रीअंडामध्यें ग्रंथी (Tumour) होण्याचा संभव जास्त असतो. संसारामध्यें मातृपद प्राप्त होणें हें प्रत्येक आर्य-स्त्रीला स्वर्गाच्या आनंदाप्रमाणें वाटत असतें. तरुण स्त्रीपुरुषांना आरंभीं आरंभीं मूल नकोसें असतें व त्याकरितां अशा प्रकारचे ते उपचार करित असतात व शेवटीं आयुष्यामधील एका काळांत त्यांना मुलांची इच्छा होते. परंतु नंतर कांहीं उपयोग न झाल्यामुळें पश्चात्ताप करण्याची पाळी येते. एखादे आईबाप एक मुल झालें म्हणजे हे प्रतिबंधक उपाय योजतात; परंतु झालेल्या प्रथम मुलाला आपल्याला बहीण किंवा भाऊ असावा अशी इच्छा निसर्गतःच असते. पैशापेक्षां या संपत्तीचें महत्त्व संसारांत मोठें असतें व तो आनंद ज्याला तें सुख परमेश्वराच्या कृपेनें लाभलें आहे त्यालाच कळतें. या सर्व गोष्टींचा विचार करून प्रत्येक तरुण स्त्री-पुरुषांनीं या मार्गांत पडावें.

Sterlization of women:—ज्यांना पुष्कळ मुलें झालेलीं आहेत व ज्यांना गरोदरावस्था ही प्राणांवर बेतणार असें दिसत आहे त्यांनी या प्रकारची शस्त्रक्रिया करून घ्यावी. यापासून त्रास न होतां शरीरप्रकृति चांगली राहील.

आतां कित्येकांना संतति कां होत नाहीं व संतती होण्यास स्वाभाविक परि-स्थिती कशी असावी लागते याचा विचार करूं. संतति होणें न होणें हें दैवाधीन अगर ईश्वराधीन असतें असें म्हटल्यास हरकत नाहीं. श्रीमंत व गरीब या दोघांची तुलना केली असतां जगांमध्यें आपल्याला गरिबाच्या मागें संततीचें लेंढार लाग-लेलें दिसतें. जिथें खावयास पुष्कळ असतें तिथें संततीचा अभाव दिसतो. याचा शास्त्रीय दृष्टीनें विचार केला असतां असें आढळून येतें कीं गर्भधारणा होण्याला वीर्यजंतू चलीत ( active ) असावा लागतो. शारीरिक मेहनतीचीं कामें कर-णारा वर्ग ह्यांचा वीर्यजंतू ॲक्टिव्ह ( चलीत ) असल्यामुळें त्यांच्या संबंधामुळें गर्भधारणा ताबडतोब होण्याचा बहुतांशी संभव असतो. पतिपत्नीची प्रकृति चांगली असतां मूल कां होत नाहीं असें बहुतेक ठिकाणीं दिसून येतें; याचें कारण पाहूं गेलें असतां स्त्रीच्या स्रावांमध्यें पुरुषांचा वीर्यजंतु जिवंत राहूं शकत नाहीं. खरें पाहिलें असतां गर्भधारणेचा एक वीर्य जंतु व एक फल स्त्रीबीज एवढी गर्भ-धारणा होण्यास पुरेशीं होतात. नेहमीं संयोग केल्यास परस्परांची ताकद कमी होते. हा वीर्य जंतु ४० वर्षांनंतर वीर्यामध्यें उत्पन्न झाल्यामुळें कांहीं इसमांना उतार वयांत मुलें झालेलीं आढळतात. ज्या स्त्रियांना दरवर्षीं मुलें होतात, त्या स्त्रियां-

मध्यें गर्भाशयाचें पूर्ण संकोचन न झाल्यामुळें संबंध होतांच गर्भधारणा ताब-डतोब होते.

संतति होण्याकरितां आपल्या धर्म ग्रंथांत वड, पिंपळ ह्यांना प्रदक्षिणा करण्यास सांगितलेलें आहे व त्यापासून होणाऱ्या व्यायामामुळें, अगर त्यामधून वहाणाऱ्या ऑक्सीजनचा जननेंद्रियावर परिणाम होत असल्यामुळें संतानोत्पत्तीस आवश्यक अशी परिस्थिती बनत असावी असें अनुमान आहे. पुष्कळ वेळां संभोग होतो परंतु परस्परांचीं जननेंद्रियें कार्यक्षम अगर लहान मोठीं अथवा त्यांत व्यंग अस-ल्यामुळें गर्भधारणा होत नसली पाहिजे. मनाच्या इच्छेविरुद्ध बळजबरीनें संभोग केला असतां गर्भधारणा झालेली आढळते, परंतु हीं उदाहरणें अपवादा-त्मक म्हणावीं लागतील. गर्भधारणा होण्यास पुढील गोष्टींची आवश्यकता असते:—

( १ ) पाळी नियमीत बरोबर येणें, ( २ ) फाजील स्राव न होणें, ( ३ ) संभोगापासून परस्परांना पूर्ण समाधान होणें, ( कारण पुष्कळ वेळां स्त्रीला त्यापा-सून त्रास होत असतो ), ( ४ ) इंद्रिय नैसर्गिक स्थितींत असणें, ( ५ ) मनो-विकाराच्या उत्तेजनामुळें गर्भाशयामध्यें फळ बीजें उत्पन्न होतात त्या योग्य वेळीं संभोग होणें. अशीं कारणें असावीं लागतात व अशी स्थिती असेल तरच गर्भ-धारणा होत असते.

# प्रकरण १६ वें.

## डोकें दुखणें ( Headaches ).

हा डोकें दुखण्याचा विकार पुरुषांप्रमाणेंच स्त्रियांमध्येंहि पुष्कळ आढळतो. साधारणतः डोकें दुखूं लागलें म्हणजे डोक्याला सुंठ घालणें, बाम लावणें, कॅफी-ॲस्पर्रीनच्या गोळ्या घेणें, फारच दुखत असल्यास दालचिनीचें तेल लावणें असे प्रकार प्रत्येक घरामध्यें चालत असतात. हे उपचार थकल्यानंतर डॉक्टरला अगर वैद्याला प्रकृति दाखविण्याची पाळी येते. डोकें दुखणें हा विकार सामान्य दिसला, तरी त्यांचीं अंतस्थ मूळ कारणें नाना प्रकारचीं असूं शकतात. उन्हाळ्यामुळें, त्रासानें, जागरणानें डोकें दुखतें व तें वरील उपचारानें कमी होतें, परंतु हे उपाय थकल्यांनंतर कांहींच फायदा न दिसल्यास त्याचें कारण अंतर-इंद्रियांमध्यें बिघाड असला पाहिजे, किंवा अंतरगत इतर कांहीं तरी विकार असला पाहिजे असें मानणें भाग होतें. शिरोव्यथा अथवा डोकें दुखणें या विकाराचें व्यथापरत्वें आपल्या आयुर्वेदांत वातिकशूल, पैत्तिक शूल, श्लैष्मिकशूल, क्षयरोगजन्य, कृमि-विकारजन्य, सूर्यावर्त, अनंतवात, शंखक, अर्धावभेदक असे प्रकार व त्यांचीं कारणें व लक्षणें सांगितलीं आहेत. या विकारांत मुख्यतः तीन भेद होऊं शकतात. परावर्ती--रिफ्लेक्स ( यांत दुसरे अवयव बिघडण्यानें त्याचा संबंध घडल्यापासून होणारे विकार येतात ) प्रकृति विशिष्ट किंवा दूषित रक्त जन्य. व स्थानिक असे तीन प्रकार होत. परावर्ती मध्यें हृदय, फुप्फुसें, यकृत, मूत्रपिंड, गर्भाशय-याचे विकार, मलावरोध, अग्निमांद्य व अजीर्ण यामुळें उत्पन्न झालेले दोष रक्तांत शिरल्यानें होणारे बिघाड हे येतात. दूषित रक्तजन्यांमध्यें पांडुरोग, ज्वर, हिंवज्वर आमवात, उपदंश यांचे दोष रक्तांतून सर्व शरीरभर फिरल्यानें होणारे बिघाड येतात.

तसेंच या विकृतीमध्यें कारणपरत्वें मुख्य दहा भेद पुढील प्रमाणें होतात. ( १ ) रक्ताधिक्य जन्य—कंजेस्टिव्ह. ( २ ) रक्तक्षय जन्य—ॲनिमिक, (३) कृमिजन्य ( ४ ) ज्ञानतंतू संबंधीं बिघाडानें—नर्व्हस् ( ५ ) पित्तजन्य-बिलियस् ( ६ ) अजीर्ण जन्य—ग्यास्ट्रिक् ( ७ ) उपदंशजन्य—सिफिलिटिक् ( ८ ) आमवातजन्य—ह्युमॅटिक् ( ९ ) अग्निमांद्यासंबंधीं-डिस्पेप्टिक् ( १० ) मेंदूच्या विकृतीपासून—ब्रेन हेडेक् असें दहा भेद होत. यांचे पुनः स्थानपरत्वें

चार भेद होतात ते पुढील प्रमाणें ( १ ) भुंवईच्यावर, दोन भुंवयाच्यामध्यें, कपाळ व डोकें यांच्या सांध्यावर ( २ ) आंखावर ( ३ ) माथ्यावर ( ४ ) डोक्याच्या मागच्या बाजूस अशा निरनिराळ्या भागात वेदना करणारे हे चार भेद होत.

या डोकेदुखीच्या विकाराची सामान्य व विशिष्ट अशीं दोन प्रकारचीं कारणें असूं शकतात तीं पुढीलप्रमाणें–सामान्य कारणें–चहा अगर कॉफीपानाचा अतिरेक, मद्यपान, अपुरी झोंप, दंतरोग, जुनाट मलावरोध, डोळ्यांवरील ताण, डोक्यांतील खांडकें–उवा, कठीण व जड टोपी वापरणें, अशुद्ध व अस्वच्छ हवा, मल--मूत्र--शिंक यांचा वेग दाबणें, हीं सामान्य कारणें असून विशिष्ट कारणें पुढीलप्रमाणें होत—( १ ) डोक्यांत रोग वगैरे होऊन वातवाहिनीवर दाब पडणें ( २ ) चहा, कॉफी, दारू यांच्या अतिरेकानें उन्हांत फिरल्यानें, हृदय फार जोरांत चालल्यानें वगैरे कारणांनीं डोक्याकडे रक्त अधिक जातें व त्यामुळें वातवाहिनीला अधिक रक्त पोंचणें. ( ३ ) धातुक्षय, पंडुरोग, धुपणी, शोक चिंता यामुळें डोक्याकडे रक्ताचा पुरवठा कमी होऊन डोक्यांतील वातवाहिनीला रक्त कमी पोहोंचणें. ( ४ ) अजीर्णांत मल पांढरा असेल तर आंतड्याकडे पित्त जात नाहीं, यामुळें तें पित्त रक्तांत शोषल्यानें ते दोष डोक्यांतील वातवाहिनीकडे पोंचणें.

एकंदरींत डोकेंदुखी या विकाराची सर्वसाधारण कारणमीमांसा वरीलप्रमाणें आहे.

आतां निरनिराळ्या कारणामुळें होणाऱ्या डोकेदुखीबद्दल विचार करूं.

सणसणून डोकें दुखणें—( थ्राबिंग हेडेक्स् ) तंग कपडे, कॉलर्स वगैरेच्या दाबामुळें रुधिराभिसरण व्यवस्थित होत नाहीं व त्यामुळें त्याचा पुरवठा हृदयाला होत नाहीं. कॉलर्सनीं विशेषतः मान व गळा यांमधील रक्तवाहिन्यांवर दाब पडून त्यास प्रतिबंध होतो व त्यामुळें हा विकार होतो. या विकारांत जडपणा, उद्वेग, अनुत्साह, निद्राधिक्य हीं लक्षणें दिसून येतात. डोक्यांतील रक्तवाहिन्याकडे रक्त फार जातें. पण तें परत येत नाहीं; त्यामुळें तें रक्त एकाच ठिकाणीं सांचून राहतें व शरीरांतील नैसर्गिक क्रिया बिघडवितें, त्यास कंज्जेशन असें म्हणतात; हें कंज्जेशन या विकारांत फार होतें.

पित्तविकारामुळें डोकें दुखणें:—उन्हामध्यें फिरलें असतां, जागरण झालेलें असतांना, काळजीमुळें, पित्त वाढल्यामुळें, उलटया, चक्कर, अंधेरी यांमध्यें कपाळाचा भागच फक्त दुखत असतो; शिवाय पायांमध्यें मुंग्या येणें, अशीं लक्षणें होत असतात. नैसर्गिक पित्तप्रकृति असेल तर विकार जास्त बळावतो. कित्येकांमध्यें दर पंधरा दिवशीं ही कपाळदुखी सुरू झाल्याचें आढळून येतें. कांहीं स्त्रियांमध्यें पाळीच्या वेळीं डोकें दुखण्याची संवय असते. कोणत्याही कारणानें डोकें दुखत असेल व त्यावेळीं पाळी ( Menstruation ) आली, तर डोकें जास्त दुखतें व स्राव योग्य प्रमाणांत झाल्यानंतर चवथ्या—पांचव्या दिवशीं डोकें दुखण्याचें बंद होतें. प्रकृति चांगली असली तरी अशा प्रकारच्या दुखण्याची संवय पाळी आली असतांना सुरू होते. कित्येक वेळां उलटी झाल्यानंतर अगर झोंप आल्यास, विश्रांति घेतल्यास हें डोकें दुखणें कमी होतें.

युरिक ॲसिडमुळें डोकें दुखणें:—ज्या स्त्रियांना वारंवार डोकें दुखण्याची संवय आहे, त्यांना ही डोके दुखी लघवीमध्यें युरिक ॲसिड असल्यामुळें होते. युरिक ॲसिड हें लघवीमध्यें असलेल्या क्षारांपैकीं एक द्रव्य आहे व तें सामान्य जनांना आहे किंवा नाहीं हें लघवी तपासल्यानंतर कळून येतें.

मांसाहार, मासे, कॉफी अशा प्रकारचा आहार करणाऱ्या स्त्रियांच्या लघवींत हें ॲसिड सांपडण्याचा जास्त संभव असतो. हा आहार बदलून ताज्या पालेभाज्या किंवा यकृताला उत्तेजक असें लघवी साफ करणारें औषध घेतलें असतां डोकें दुखण्याचें कमी होतें.

पित्तविकारामुळें डोकें दुखतें किंवा मेंदूमध्यें कांहीं विकार असल्यामुळें डोकें दुखतें, हें रोग्यांच्या माहितीवरून ठरवतां येतें.

पित्तविकारांमुळें व ओटींतील इंद्रियांना कांहीं इजा असल्यास डोकें जास्त दुखतें हें साधारणपणें खालील कारणावरून समजून येतें. काळजी, भिती, फाजील श्रम, अजीर्ण, व महिन्याचा रक्तस्राव या सर्व गोष्टींचा विचार करून औषधयोजना केल्यास रोग्याला फायदा होतो.

पाठिच्या कण्यामध्यें दुखणें:—ओटींतील इंद्रियांमुळें पाठीच्या कण्यांत दुखत

असतें. झोंपेचें औषध व विश्रांति मिळाल्यास हा दुखावा कमी होतो. हें दुखणें मज्जातंतु शिथिलतेच्या विकारांतही आढळतें.

मेंदुमध्यें गांठ झाली असतां डोकें दुखणें:—मेंदुमध्यें गांठ ( Tumour ) झाली असतां डोकें दुखणें हें मुख्य चिन्ह आहे. या विकारांत उलट्या, डोळा दुखणें, व एखादी बाजू लुली होणें हीं लक्षणें आढळतात.

मूत्र-पिंडाच्या विकारांमुळें डोकें दुखणें:—गरोदरपणांत मूत्र पिंडाना विकार होण्याचा जास्त संभव असतो, व त्यामुळें डोकें दुखत असतें.

अशा प्रसंगीं प्रथमतः लघ्वी तपासून त्याप्रमाणें औषध दिलें असतां तें कमी होतें. मान व डोकें यांस सांधणारा मागील महत्त्वाचा मणक्याचा भाग या ठिकाणीं विशेष वेदना असल्यास मूत्रपिंडाची विकृती ( दाहरूप ) आहे असें समजावें. मूत्रपिंडांना सूज असल्यास रक्तांत मूत्रशोषण होऊन डोकें दुखतें तें पाळी पाळीनें किंवा सतत दुखत असतें आणि बहुतेक तें कपाळांत दुखतें.

रक्त कमी झालें असतां डोकें दुखणें:—पांडुरोग झाला म्हणजे डोकें सारखें दुखत असतें. झोंप कमी होते व मज्जातंतु शिथिलतेचीं चिन्हें होत असतात. मज्जातंतूचें पोषण होत नसल्यामुळें, पाठीमध्यें कोणत्याना कोणत्यातरी भागांत दुखत असतें. डोक्यांमध्यें कोणीतरी खिळा घालून ठोकतो आहे अशा प्रकारच्या कळा तिथें लागत असतात.

सतत डोकें दुखत असणें:—रोग्याला विचारलें असतां सर्व डोकें दुखत आहे असें त्याजकडून सांगण्यांत येतें. व तें दुखणें प्रत्येक वेळीं निरनिराळ्या भागांत पसरत असतें. सकाळपासून डोकें दुखण्याला सुरवात होते ती रात्रीपर्यंत टिकते. डोकें चेपून पाहिलें असतां मऊपणा आढळून येत नाहीं. उलटी होत नाहीं, यकृतोत्तेजक जुलाब दिला तरी दुखणें थांबत नाहीं, हा विकार पुरुष व स्त्रिया ह्या दोघांना विशेषतः तरुणपणांत झालेला आढळतो. ह्याचें कारण काय असावें हें अद्याप गूढ आहे. अशा स्थितींत भांगेचा अर्क अगर एक्सट्रॅक्ट दिला असतां तें हळु हळु कमी होतें, असें आढळून येतें.

गर्भाशय व बीजकोश यांचा दाह अगर क्षोभ यामुळें डोकें दुखणें—रक्तवाहिन्या व वातवाहिन्या सर्व शरीरभर पसरलेल्या आहेत व त्यांतील प्रवाह सारखा सुरू

आहे. यामुळें एका ठिकाणचा दोषाचा संबंध दुसऱ्या ठिकाणीं जाऊं शकतो. यास दोषाचें स्थानांतरगमन—रीफ्लेक्स—ॲक्शन असें म्हणतात. गर्भाशय, बीजकोश या ठिकाणीं क्षोभ झाल्यानें रक्तवाहिन्या व वातवाहिन्या यांच्यामार्फत त्या त्या इंद्रियांतील दोष, ज्ञानतंतू, मज्जारज्जू व मेंदू या भागापर्यंत पोंचतात व त्यामुळें डोकें दुखतें व तें मस्तकांत मागील भागांत असतें; तें मंद किंवा तीव्र असतें आणि त्याच्या वेदना पसरतात. पण ही वेदना पसरण्याची क्रिया विशेषतः मागल्या बाजूस डोकें दुखत असतांना होते. याचवेळीं गर्भाशय व बीजकोश याच्या रोगांचीं कांहीं लक्षणें असूं शकतात त्याचा तपास करून खात्री करून घ्यावी.

उपदंश विकारांमुळें डोकें दुखणें:—(१) अंगांत ताप असणें, (२) उपदंशाची तृतीयावस्था असणें, (३) हाडें सडणें. अशा स्थितींत डोकें दुखतें व तापहि असतो त्यावेळीं अंगांवर डाग दिसूं लागतात व डोकें दुखणें सुरू असतें. मेंदूच्या गांठीमुळें डोकें दुखत असतें. उपदंशाच्या तृतीयावस्थेमध्यें हाडांचे अवयव सडूं लागणें व रात्रींचें डोकें दुखणें जास्त प्रमाणावर चालू असतें. अशा प्रकारच्या दुखण्यामध्यें उपदंशजन्य चिकित्सा केली पाहिजे.

संधिवाताच्या विकारांत डोकें दुखत असतें.

औषधांच्या अगर बाह्य विषांच्या परिणामामुळें डोकें दुखणें:—क्विनाइन, अफु, लोह अगर मादक पदार्थांचें प्रमाण जास्त गेलें असतां डोकें दुखतें. सिनेमा, नाटकें, वगैरे ठिकाणीं गर्दी असली तर त्यापासून होणाऱ्या विषारी वायूमुळें डोकें दुखत असतें. अशा प्रकारची पीडा फार दिवस टिकत नाहीं. योग्य तें कारण शोधून उपचार केला असतां कमी होतें.

तापांमध्यें डोकें दुखणें:—ताप आला असतां डोकें दुखत असतें. व तें तापाचें उष्णतामान पाहिलें असतां समजून येतें. ताप व डोकें दुखणें तीव्र असेल तर टॉयफाईड फीव्हरचें लक्षण समजावें, व त्याप्रमाणें औषधोपचार करावा.

रक्ताधिक्यामुळें डोकें दुखणें:—मेंदूमध्यें फाजील रक्तस्राव होत असला तर डोकें दुखतें. फाजील रक्तस्राव होणें किंवा रुधिराभिसणामध्यें अडथळा असणें ही स्थिति साधारणपणें फुप्फुसांच्या अगर हृदयांच्या विकारामध्यें आढळते.

डोळ्याला विकार असला अगर दृष्टी मंद असली तर वाचतांना डोळ्यांवर ताण पडून डोकें दुखूं लागतें, दांत सडलेला असला अगर पोकळ असला तर त्यांमध्यें अन्न कुजून डोकें दुखूं लागतें.

पीनस विकार, नाकांमधील अंतस्त्वचेला सूज येणें, नाकांच्या आंतल्या बाजूस मोड येणें, नाक चोंदल्यासारखें वाटणें, श्वासोश्वासास अडथळा येणें, यामुळें एकसारखें डोकें दुखत असतें. तपकीर ओढली असतां तात्पुरतें कमी होतें. नाक तपासून त्यामध्यें विकार असल्यास दूर करावा म्हणजे डोकें दुखणें थांबतें.

कानांच्या आंतल्या पडद्यांचा दाह. टॉन्सील्स्, सप्तपथाला सूज ( pharynx ) यांमुळेंहि डोकें दुखत असतें. साधारणपणें डोकें दुखण्याला काय कारणें असावीत याचा निरनिराळ्या तऱ्हेनें उहापोह केलेला आहे. यांतील वर्णनें वाचून आपलें डोकें दुखण्याच्या कारणांची कल्पना होऊं शकेल. व त्याप्रमाणें डॉक्टरला सांगितल्यास पुष्कळ वेळां रोग्याचा लवकर फायदा होतो असा अनुभव आहे व या करितांच लक्षणांवरून ( Symptoms ) रोग समजण्याचा प्रयत्न आरंभापासून करण्यांत आलेला आहे.

# प्रकरण १७ वें.

## पाठीमध्यें दुखणें ( Pain in the back ).

पाठीमध्यें दुखणें हें आयुर्वेदांचे मतें वात विकारांत गणलेलें आहे. शरिरांत वातव्याधी उत्पन्न होण्याचें कारण तुरट, तिखट, कडू या रसाचें अतिसेवन, अत्यंत अल्प, रुक्ष, व हलकें अन्न भक्षण, जागरण, पोहणें, मार बसणें, अत्यंत श्रम, अतिशय थंडी लागणें, लंघन, धातुक्षय, अति मैथुन, मलादिकांच्य वेगाचें धारण, शोक, चिंता, भीती शरिरांतून रक्त फार जाणें, मांसक्षय होणें अशा निरनिराळ्या कारणांनीं शरिरांत वातव्याधी उत्पन्न होते असें सांगितलें आहे.

पाठीमध्यें दुखणें, कंबर दुखणें, वगैरे ८० प्रकारचे व्याधींच्या वातविकारांत समावेश केलेला आहे. पाठींत दुखणें हा विकार आयुर्वेदाच्या मतें गृध्रसी वातांतील एक प्रकार असून त्यांत इतर लक्षणांचा समावेश होतो. कुल्ल्याचे संधी, कंबर, पाठ, मांड्या, गुडघे व पाय हे क्रमाक्रमानें ताठणें, पीडा होणें, सुई टोंचल्याप्रमाणें वेदना होणें, इत्यादि लक्षणें वरवर पहाणाराला गृध्रसी वाताचीं दिसून येतात.

ही पाठ दुखण्याची संवय पुष्कळ स्त्रियांमध्यें आढळते व ती बरेच दिवस अगर वर्षानुवर्षें चालू असते. थंडीमुळें, किंवा वारा लागला असतां पाठ दुखूं लागते व त्यावर वातहारक तेलें लावलीं असतां तें दुःख कमी होतें; परंतु बरेच दिवस पाठ दुखत असल्यास त्याचा ओटींतील भाग व जननेंद्रियें यांच्याशीं संबंध असूं शकतो.

पाठ दुखण्याची संवयः—कित्येक स्त्रियांमध्यें पाठ दुखण्याचीच संवय आढळून येते. मूत्रपिंडाच्या खालच्या बाजूला हें दुःख नेहमीं होत असतें. जोराचें काम केलेलें असेल, शरिराची हालचाल थकवा येईपर्यंत झालेली असेल तर पाठ जास्त दुखूं लागते. पाळी येण्याच्या पूर्वीं व नंतरहि जास्त दुखूं लागते व त्यामध्यें मलावरोधाची संवय असेल तर मग तें दुखणें विशेष तीव्रतेनें जाणवतें. पाठीवर निजलें असतां, अगर वांकलें असतां, किंवा त्यावर तेल चोळून शेकलें असतां तात्पुरतें बरें वाटतें. पाठ दुखण्यांची संवय असणारांमध्यें इतर भागांमध्यें कांहीं बिघाड आहे किंवा काय याची तपासणी केली असतां कांहीं आढळून येत नाहीं.

# आजच्या स्त्रियांचें आरोग्य

पाठ दुखण्याचें मूळ कारणः—तरुण स्त्रियांमध्यें ही संवय रजःस्राव सुरू झाल्यानंतर होते. कमर घट्ट आंवळणें, वाटेल तसें वागडणें, एकांतवास हीं कारणें आरंभाला असतात. पाठ जास्त केव्हां दुखेल हें सांगतां येत नाहीं. हवा पालट केली तर तात्पुरतें बरें वाटतें. मन हलकें असेल, शरीरप्रकृति चांगली नसेल, काळजी असेल तर वाटेल ते इलाज केले तरी बरें वाटत नाहीं. अशा स्थितींत लग्न झालें व दरवर्षी पाळणा सुरू झाला तर हें दुःख वाढत जातें. मूल अंगावर पीत असेल व त्यास दांत आले असतील किंवा ४–५ वर्षांचें झालेलें असे तों पर्यंत दुध पीत असेल तर हें दुखणें वाढत असतें. कित्येक स्त्रियांना अज्ञानानें हें कारण पटणार नाहीं पण तें खरें आहे. झोंप चांगली लागली व पाठीमागें घट्ट अशी उशी ठेवली तर बरें वाटतें; परंतु, सकाळीं उठल्यावर पुनः दुखण्याची सुरुवात होते. उशी ठेवल्यावर स्त्रीला बरें वाटत असेल तर कमरेला कांहीं तरी आधार पाहिजे हें सिद्ध होतें. मुल अंगावर बरेच दिवस दूध पीत असलें तर कमरेच्या वर स्नायूच्या कमताकतीमुळें दुखत असतें.

कारणें:—स्नायूमध्यें जोर नसणें, चालणें, उभें रहाणें, यांमुळें पाठीवर ताण पडून दुखावा उत्पन्न होतो. विश्रांति घेतली असतां बरें वाटतें, यांवरून स्नायूचा कमजोरपणा आहे हें कारण सिद्ध होतें. रुधिराभिसरण बरोबर न झाल्यामुळें स्नायूंचें पोषण होत नाहीं व त्या ठिकाणीं वातहारक तेल चोळलें असतां अभिसरणादि क्रिया वाढून रोग्याला बरें वाटतें व स्नायुहि मजबूत होऊन दुखावा कमी होण्यास मदत होते.

स्त्रियांच्या पाठीचे स्नायु अशक्त कां असावेत ही गोष्ट विचार करण्यासारखी आहे व ह्याचा दूरवर विचार केला असतां हल्लीचें सदोष पुरुषीशिक्षण हें होय. शरीर सुदृढ असेल तर मन सुदृढ राहतें. मनांचा शरिरावर ताबा चालतो. यासाठीं स्त्रियांना शाळेमध्यें व्यायामाचें शिक्षण पाहिजे व तो व्यायाम स्नायूंना मजबूत करील अशा प्रकारचा पाहिजे. व्यायामशाळा म्हणजे करमणुकीचीं साधनें नव्हेत. बुद्धीमध्यें स्त्रिया पुरुषांपेक्षां तीव्र असतात. अलीकडचा पुरुष व स्त्रिया यांचा शिक्षणक्रम पाहिला तर तो एकच असतो व या शिक्षणांचा स्त्रियांच्या प्रकृतीवर दुष्परिणाम कसा होत असतो इकडे शाळेचे चालक अगर आईबाप यांचें लक्ष जात नाहीं हें अत्यंत गैर होय. केवळ उच्च शिक्षण संपादन व वर्तमानपत्राची

तारीफ याकडे लक्ष देऊन समाधान व आनंद मानणें सर्वथैव उचित नाहीं. परंतु त्यावेळीं त्या मुलीचें हें दुबळें शरीर स्वतःच्या कुटुंबाचा संसार कसा करणार इकडे लक्ष देणें महत्त्वाचें आहे असें कोणालाच वाटत नाहीं; व अशा प्रकारच्या दुर्लक्षपणांमुळें १ लें बाळंतपण झाल्यानंतर अगर उच्च शिक्षण घेऊन बाहेर पडल्यानंतर स्त्रियांची स्थिती अत्यंत कष्टमय होते हें त्या दृष्टीनें पाहाणाऱ्याच्या सहजीं नजरेस येणारें आहे. याचें कारण पाहूं गेलें असतां जीवनशक्तीकडे दुर्लक्ष हें होय. शरीरप्रकृति चांगली असली म्हणजे मानसिक वाढही चांगली असूं शकते. याकरितां अभ्यासापेक्षां शरीरप्रकृतीकडे आगाऊ काळजीपूर्वक लक्ष दिलें म्हणजे पश्चात्तापाची वेळ येणार नाहीं.

जननेंद्रियांमध्यें इजा असल्यास पाठ दुखणें:—ओटीमधील इंद्रियांना दुखावा असल्यास त्रिकास्थी ( Sacrum ) च्या वरच्या बाजूला दुखतें. शिवाय त्या त्या इंद्रियांच्या बिघाडाप्रमाणें इतर चिन्हें होत असतात. गर्भाशय स्थानच्युत होऊन मागें वळलेला असेल तर स्त्रीला पोटावर निजवलें असतां जास्त दुखूं लागतें, एखादे वेळीं एका इंद्रियांत इजा असते व त्याचीं लक्षणें परिवर्तन ( Reflex ) होत असतात. स्त्रियांमध्यें उजव्यापेक्षां डावी बाजू अशक्त असते व यामुळें त्या बाजूमध्यें जास्त कळा येत असतात. जननेंद्रियांमुळें होणारें पाठींतील दुखणें तीव्र नसलें तरी राहून राहून होत असतें. अतिशय काम करून थकवा आल्यास दुखण्याचा जोर वाढतो. हें दुःख पाळीच्या वेळींच नंतर वाढतें.

गुदद्वारामुळें पाठ दुखणें:—(Rectal Backache) ओटीच्यामध्यें असणारीं इंद्रियें, म्हणजे गर्भाशय व त्यांचे इतर भाग, गुदद्वार, योनिमार्ग यांच्यामध्यें दोष असल्यास पाठ दुखते. गुदद्वारांमध्यें पीडा असते व त्यामुळें पाठ दुखते, पण रोग्याला गर्भाशयाचा विकार असल्यामुळें पाठ दुखत असेल असें वाटत असतें. मलावरोध, मूळव्याध अशा प्रकारचे विकार असल्यास पाठ दुखते. व त्याबद्दलचीं कारणें दूर केलीं असतां पाठ दुखणें कमी होतें.

अग्निमांद्यामुळें पाठ दुखणें:—अमांशयाला ( Stomach ) विकार असल्यास पाठ दुखते व हें दुःख खांद्याच्या मागील बाजूला आढळून येतें व तें हातांपर्यंत पसरतें. आमांशय दाबला असतां त्यामध्यें कळा येतात. अन्न पोटांत गेलें असतां दुखतें किंवा पोट रिकामें असतां दुखतें, हें पाहिलें पाहिजे. साधारणतः

हें दुखणें जेवल्यानंतर वाढतें असें अनुभवास येतें. कांहीं वेळां जेवल्यानंतर दुःख कमी होतें. उलटी झाल्यानंतर दुःख कमी होतें. किंवा उलटी झाल्यामुळें तें वाढतें. गर्भाशयाला विकार असल्यास अग्निमांद्य होतें. अशा वेळीं तज्ज्ञानें गर्भाशयाचा विकार पाहून त्याप्रमाणें औषधांची योजना केली असतां रोग्याला फायदा होतो.

मलावरोधः—मलावरोधांची संवय असणाऱ्या बाईची कंबर नेहमीं दुखत असते. वेळच्या वेळीं शौचाला न जाण्याची संवय स्त्रियांमध्यें जास्त आढळून येते. मग त्या कामांत असोत अगर रिकामपणांत गप्पाष्टका करण्यांत काल घालवीत असोत. मलमूत्रांचे वेग कोंडून ठेवूं नयेत अशी आपल्या मुनिवर्यांची शिकवण हिंदुधर्मामध्यें सांगितलेली आहे. नियमीत शौचाला जाण्याची संवय मोडली म्हणजे आंतड्यांच्या स्नायूंमध्यें शिथिलपणा येतो, व त्यामुळें कितीहि कडक जुलाब घेतले तरी शौचाला होत नाहीं. मलावरोध असाच चालू राहिला तर आंतड्यांमध्यें एक प्रकारचें विष तयार होऊन अतिसार, संग्रहणीसारखे विकार होऊं लागतात.

मूत्रपिंडामुळें पाठींत दुखणें:—मूत्रपिंडाला विकार झाल्यास पाठींत दुखत असतें. दुखावा तीव्र असेल तर इतर भागांत दुखूं लागून रोग्याला बेचैन करतो व मूत्राशयाचा दाह होऊन लघवीचा रंग बदलतो.

कटिशूळ:—( Lumbago ) कटिशूळाची व्यथा म्हणजे हा एक स्नायुगत वात आहे. हालचाल झाली असतां, उभें राहिलें असतां, वाकलें असतां कळा फार वाढतात. दुखण्याची जागा दाबली असतां दुखते. पाठीमध्यें रोग्याला भरून आल्यासारखें वाटतें.

इतर कारणें:—बाळंतपणांत त्रास होणें, प्रसूति लांबणें, संधिवात, हाडांचा क्षय वगैरे स्थानपरत्वें व कारणपरत्वें पाठींत दुखावा होतो. आणि त्या त्या प्रमाणें निरनिराळीं नांवें त्या त्या विकारांना दिलेलीं असतात. सामान्य स्त्रीपुरुषांना तें कळणें क्लिष्ट व अवघड असल्यामुळें मुद्दाम त्याचें विवरण केलेलें नाहीं.

# प्रकरण १८ वें

## अन्तःफलकामध्यें दुखणें ( Ovarian Pain )

स्त्रियांच्या रोगांवर निरनिराळ्या नामांकित डॉक्टर वैद्यांनीं पुस्तकें लिहीलेलीं आहेत. परंतु त्यांमधील माहिती तज्ज्ञाच्या देखरेखीखालीं मिळवून अनुभव असल्या-खेरीज मनाला पटणार नाहीं. सामान्य जनतेला शास्त्रीय ज्ञानाचा गंध नसतो व त्यांना लक्षणांवरून रोग काय आहे तें समजण्याची जिज्ञासा असते; शिवाय वैद्यकीय पुस्तकांचा क्रमांक पाहिला तर रोगांचीं कारणें, लक्षणें, निदान, चिकीत्सा अशा-प्रकारची पद्धत असते; यामुळें विषय लवकर ध्यानांत येण्यास कठिण जातें.

गर्भाशयाच्या दोन्हीं बाजूला फलवाहक नलिकेनें ( ovarian Tubes ) स्त्रीअंड ( ovary ) जोडलेले असतात. ह्या जागेच्या ठिकाणीं दुखण्याची संवय पुष्कळ स्त्रियांमध्यें आढळते; परन्तु याचा परिणाम शारिरावर झालेला आढळत नाहीं. दुखण्याची जागा स्त्रीअंडामध्यें असली तरी त्याचीं कारणें निराळीं असतात. या दुखण्याचे स्थूलदृष्ट्या चार प्रकार होतात. अंतरावरणाच्या पडद्याचा दाह, ( Peritoneum ) ( २ ) परिवर्तन होणारा दुखावा. ( Reflected Pain ) ( ३ ) मज्जातंतुशिथीलता, ( ४ ) हिस्टेरिकलः—दुखावा मनामध्यें आहे अशा प्रकारची कल्पना.

अंतरावरणांच्या पडद्याचा दाहः—( Peritoneal Pain ) ह्या पडद्याला सूज आल्यानंतर दुखावा होत असतो. हा दाह स्त्रीअंडापर्यंत पोंचल्यामुळें दोन्हीं ठिकाणीं दुखत असतें व तो दाह स्थानिक असतो. ह्या दाहामध्यें गर्भाशयाची स्थिती तो मागें पुढें होतो किंवा नाहीं कीं स्थिर आहे हें पाहिलें पाहिजे, त्याप्रमाणें ओटीमध्यें गोळा लागतो किंवा काय इकडे लक्ष दिलें पाहिजे. गर्भाशयाच्या मागें व बाजूला स्त्री—अंडाचा स्पर्श झाला व तो दाबला तर तो मागेंपुढें होतो. याप्रमाणें गर्भाशय व स्त्रीअंड यांची हालचाल आढळून आली तर अंतरावरणाच्या दाहांचा त्याच्याशीं संबंध नाहीं असें आपोआप सिद्ध होतें.

परिवर्तन होणारा दुखावाः—( Reflected pain ) जननेंद्रियामध्यें बिघाड झाला तर नानाप्रकारचीं लक्षणें व दुःख होत असतें. दुखण्याच्या जागीं मऊपणा आढळतो. हा दुखावा जोरानें दाबला असतां कमी होतो.

स्त्रीअंडामध्यें दुखावा असल्यास त्या ठिकाणीं मऊपणा व दुखावा हीं लक्षणें आढळतात. गर्भाशय, मलाशय, यकृत्, मूत्रपिंड यांच्यामुळें सुद्धां वरील प्रमाणें लक्षण आढळतें. स्त्रीअंडाच्या जागेमध्यें इतर जननेंद्रियांमध्यें विकार असल्यास सुद्धां दुखावा होतो. गर्भाशयांच्या ग्रीवेला व्रण होणें, गर्भाशय स्थानच्युत होणें, दुष्टव्रण ( cervix ) नलिकेचा विकार हीं इतर कारणें होत. पाळी येण्यापूर्वी व पाळीमध्यें हा मृदुपणा विशेषेंकरून आढळून येतो.

मज्जातंतुशिथिलतेमुळें होणारा दुखावा—( Neurasthenic Pain ) पांडुरोग, अशक्तपणा, इन्फ्लुएन्झा, रक्तस्राव, अशक्तपणा, अंगांतील रक्त कमी होणें वगैरे कारणामुळें काटकपणा, सहनशक्ति कमी झालेली असते, वयामुळें अल्पसुद्धां दुःख सहन करण्याची ताकद नसते. हा दुखावा नेहमीं डाव्या बाजूला जास्त आढळतो. स्त्रियांमध्यें नैसर्गिक डावी बाजू अशक्त असते. ही गोष्ट दुष्टव्रण झाला असतां आढळून येते. हा व्रण उजव्या बाजूला विशेष जाणवतो. मूळव्याध, गर्भाशयाचा स्थानच्यूतपणा ह्यामुळेंहि दुखत असतें.

हिस्टेरियामध्यें स्त्रीअंडाच्या ठिकाणीं दुखावा होत असतां त्यांमध्यें स्थानिक उपचार केला तर रोग्यांचें लक्ष त्या बाजूकडे लागून दुःख कमी न होतां जास्त होतें. मज्जातंतूशिथिलता व हिस्टेरिया या दोहोंत स्थूल फरक म्हणजे एकामध्यें स्थानिक कारण समजून इलाज केला तर फायदा आढळून येतो तर हिस्टेरियामध्यें त्याच्या उलट अनुभव येतो.

स्त्रीअंडाच्या दुःखाचीं चार कारणें असतात. अतिशय मुलें होणें, मज्जातंतुशिथिलता, महिन्याची पाळी, मद्यपान व विषयसेवनांचा अतिरेक हीं होत.

स्त्रीअंडामध्यें होणारें दुःख साधारण असेल तर पडून राहिलें असतां कमी होतें, यामध्यें मज्जातंतूचा दाह असेल तर पडून राहण्यानें बरें वाटत नाहीं. ज्यांना बरींच मुलें झालेलीं असतात त्यांच्यामध्यें हा दुखावा विशेष आढळतो. या विकारांत मांस कमी झालेलें असतें व अग्निमांद्य, मलावरोध, निद्रानाश ह्याचा त्रास असतोच.

स्थानिक चिन्हें:—लघ्वी होतांना त्रास होणें, प्रदर व उन्हाळे होतात. कित्येक वेळां स्त्रीअंडामध्यें मऊपणा येऊन त्या गर्भाशयांच्या खालीं आढळणें. व हे योनीमार्ग किंवा गुदद्वार हीं दाबून पाहिलें असतां आढळून येतें. स्त्रीअंड स्थानच्यूत झाला तर संभोगाच्यावेळीं दुखावा होतो व १-१ तासपर्यंत कळा येत

असतात. त्यामध्यें शस्त्रक्रिया करणें भाग पडतें. पाळी येण्याच्या पूर्वी स्त्रीअंडांत ओटीमध्यें रक्ताधिक्य झाल्यामुळें दुखूं लागतें व स्राव सुरू झाल्यावर कमी होतें. अशक्तता, अंगांत रक्त कमी असेल तर स्त्रीला पडून रहावें लागतें.

कारणें:—गर्भाशयाची वाढ बरोबर झालेली नसेल तर स्त्रीअंडाची वाढही अपुरी असते. हा दुखावा म्हणजे स्रावाच्या वेळीं रजःकण बाहेर पडण्याची स्थिती होय. ( ovulation ) मद्यसेवन करणाऱ्या स्त्रियांमध्यें हा दुखावा विशेष आढळतो. संततिप्रतिबंधक उपाय केले असतां किंवा अपुरा संभोग केला असतां स्त्रीअंडांमध्यें दुखत असतें. हे उपाय बंद करून निसर्गाचा मार्ग आचरण केल्यास आपोआप बरें वाटूं लागतें. पत्नीच्या इंद्रियामध्यें दोष असेल तर ही पीडा होते. संभोगाच्या वेळीं इंद्रियांमध्यें रक्ताधिक्य जास्त होतें. हें रक्ताधिक्य जास्त होईल तर योनिमार्गें रक्तस्राव होऊं लागतो. हा रक्तस्राव होणें फायदेशीर असतें. रक्तस्राव झाल्यानंतर दाब कमी होतो व दुःख नाहींसें होतें न झाल्यास दुखावा वाढतो. परस्परांच्या इच्छेनें होणाऱ्या संभोगापासून दुःख होत नाहीं, परन्तु परस्परांच्या इच्छेविरुद्ध वागल्यास त्यापासून अनिष्ट परिणाम होतो. मुष्टि-मैथून, अतृप्त इच्छा हेंहि ह्या दुःखाला कारण असतें. लग्न झाल्यानंतर स्त्रीअंडा-मधील होणारें दुःख कमी होतें. बरेच दिवस स्त्रीअंडांच्या ठिकाणीं दुखत असेल तर काय कारणें व लक्षणें होतात हेंच या ठिकाणीं सांगण्याचा मुख्य हेतु आहे. प्रत्यक्ष आकृति, शारीरइंद्रियविज्ञानशास्त्र याची माहिती असल्याशिवाय डॉक्टर ज्याला क्रॉनिक ओव्हरीयन पेन म्हणतात तें समजणार नाहीं. परन्तु स्त्रीअंड ज्याला इंग्रजींत ओव्हरी असें म्हणतात त्यामध्यें दुखावा कां होतो व अशा प्रकारच्या केसीस प्रॅक्टिसमध्यें फार आढळत असल्यामुळें ह्या विशिष्ट इंद्रियांच्या लक्षणांचा उहापोह केलेला आहे.

---

# प्रकरण १९ वें.

## पोट दुखणें ( Abdominal pain ).

पोट दुखण्याची व्यथा पुष्कळ स्त्रियांमध्यें आढळते. साधारणतः पोट हा छातीच्या खालील भाग म्हणजे पोट, असें म्हणण्याची सर्वसाधारण समजूत आहे. पोट म्हणजे ज्यामध्यें अन्न जातें त्याला पोट अगर आमांशय (Stomach) असें म्हणतात. पोटाचा खरा अर्थ आमांशय असा आहे. परंतु पोट हा शब्द म्हटल्याबरोबर पोट ह्या शब्दाखालीं अगर पोटाच्या भागाच्या आंतल्या बाजूस किती इंद्रियांचा ( organs ) समावेश होतो, हें कोणाच्या ध्यानांत येत नाहीं. सुज्ञ वैद्य अगर डॉक्टर याला पोट दुखतें म्हणून सांगून भागत नाहीं, तर तें कोणत्या भागांत दुखत आहे हें समजण्याची जरूरी असते. यकृत्, मूत्रपिंड, मूत्राशय, गर्भाशय, आंतडीं वगैरे महत्त्वाचीं इंद्रियें पोट ह्या शब्दाखालीं झांकलेलीं असतात व ह्या इंद्रियांपैकीं एखाद्या इंद्रियांमध्यें बिघाड झालेला असल्यास पोट दुखत असतें. अजीर्ण झालें म्हणजे जें पोटांत दुखत असतें, त्यालाच पोट–दुखी असा शब्द वापरतां येईल. पोट–दुखी हा शब्द नेहमीं वापरण्यांत येत असल्यामुळें या प्रकरणांच्या आरंभीं पोट–दुखी शब्द मुद्दाम घातलेला आहे व ह्याचा इतर इंद्रियांशीं कशाप्रकारें संबंध आहे, आणि त्यांचीं लक्षणें कशीं होत असतात, याचा आतां विचार करूं.

पोटाच्या स्नायूंच्या तंतुमय पेशीमुळें पोटांत दुखणें:—अंगामध्यें रक्त कमी झालें म्हणजे अशक्तता वाढते, स्नायूंचें व मज्जातंतूंचें पोषण होत नाहीं व अशा स्थितींत काम करण्याची पाळी आली, म्हणजे त्यांना ताण पडून पोटामध्यें दुखूं लागतें. हें दुःख तीव्र नसतें, परंतु वेळांवेळानें होत असल्यामुळें त्रासदायक होत असतें. अशक्तपणामुळें सहनशक्ती कमी होते व त्यामुळें अल्पहि त्रास सहन होत नाहीं. अमुक ठिकाणीं दुखत आहे, हेंहि रोग्याला निश्चित सांगतां येत नाहीं. पाठ, बेंबीच्या खालीं, मांड्याच्या खालींपर्यंत दुखत असल्याचें तपासून पाहिलें असतां आढळून येतें.

यावेळीं पडून राहिलें असतां बरें वाटतें. अशा तऱ्हेच्या दुःखाचा संबंध गर्भाशयांशीं असतो हें लक्षांत ठेवलें पाहिजे. पांडुरोग, झोंप नसणें, अशक्तपणा, अग्निमांद्य हे विकार असल्यास, तिकडे लक्ष देऊन त्याप्रमाणें चिकित्सा केली पाहिजे.

ओटीमधील जननेंद्रियांचा दाहः—गर्भाशय मागें वळणें, तो स्थानच्युत होणें, गर्भाशयांच्या आंतल्या बाजूला सूज, फलवाहिनी व अंतःफलक यांना सूज ( ovaries & tubes ) यामुळें पोटांत दुखत असतें. हा दुखावा बेंबीच्या खालीं, पाठ व मांड्यापर्यंत होत असलेला आढळून येतो. त्या प्रसंगीं कोणी तरी घण मारीत आहे, अशा प्रकारचें दुःख होत असतें. पडून राहिलें असतां थोडेसें बरें वाटतें. पोट तपासलें असतां ह्यामध्यें स्थानिक इंद्रियांत कोणत्या ठिकाणीं बिघाड झालेला आहे हें कळून येतें. गर्भाशय स्थानच्युत असेल तर पाठीमागें त्रिकास्थीच्या ठिकाणीं दुखावा आढळून येतो. स्त्रीला पोटावर निजण्यास सांगितलें असतां त्रिकास्थीची जागा कोणती व दुखावा कोणता हें समजून येतें,

रजोदर्शन, मद्यपान, व विषयसेवन ह्यामुळें तें दुःख जास्त वाढतें.

गर्भाशयाचा संकोचः—गर्भाशयांचें संकोचन होत असेल तर दुःख सुरू होतें. ह्या संकोचनाला प्रसूतीच्या वेळीं वेणा असें म्हणतात. निजून राहिलें असतां दुखावा वाढतो, परंतु उकिडिवें बसलें असतां दुःख कमी होतें. हें दुःख राहून राहून होत असतें. एकदम कळा येतात, कांहीं वेळ बंद रहातात, पुन्हां सुरू होतात, अशी क्रिया चालू असते. गर्भाशयाच्या आंत गांठ झाली असेल तरी दुखावा होत असतो. हें दुःख रोगी दुखाव्याच्या बाजूला हात लावून दाखवीत असतो. परंतु त्याचा संबंध आंतील इंद्रियाशीं असतो.

मूत्रपिंडांच्यामुळें दुखणें:—मूतखडा, मूत्रनलिकेचा दाह, मूत्रपिंडामध्यें सूज, यांमुळें दुखत असतें. हा दुखावा मांड्यापर्यंत होत असतो. मूत्रपिंडांच्या ठिकाणीं दाबून पाहिलें असतां समजून येतें. लघ्वी होतांना त्रास होतो. थेंबथेंब लघ्वी होत असते व कळा येत असतात.

मूतखडा झालेला असल्यास दुःख तीव्र होत असतें व उलट्या होतात. लघ्वीमध्यें रक्त व क्षार आढळतात, लघ्वी होत नसेल, तर क्षार व खडे आंत राहून मूत्रनलिकेचा मार्ग बंद होतो, त्याला सूज येते व ती सूज पिकून पू येऊं लागतो.

मूत्र पिंडाला दुष्टव्रण होतो व त्यामुळें अतिशय पिडा होते व या विकारांवर शस्त्रक्रिया करणें भाग पडतें.

मूत्रपिंड हालणें ( Movable kidney ):—ह्याचे लक्षणांवरून तीन प्रकार कल्पलेले आहेत. एका प्रकारामध्यें लक्षणें कांहींच होत नाहींत. दुसऱ्या प्रकारामध्यें मूत्रपिंडाच्या ठिकाणीं थोडें दुखत असतें. पाळीच्या वेळीं हा दुखावा विशेष आढळून येतो. तिसऱ्या प्रकारामध्यें रुधिराभिसरणामध्यें प्रतिबंध होऊन मूत्रपिंडांत रक्ताची वाढ होते, कळा वाढतात, चक्कर, बेशुद्धी, घाम सुटणें, नाडीची गति वाढणें, उलट्या होणें, लघ्वी कमी होऊन रक्तासारखी लाल होणें, हीं लक्षणें होतात. मूत्रपिंडाला सूज येते, दुर्लक्ष केल्यास हीं लक्षणें वाढतात. यांमध्यें मूत्रल औषधें दिलीं असतां एक दोन आठवड्यांत फायदा होतो.

ज्या स्त्रिया पाणी कमी पितात, त्यांच्या मूत्रपिंडांत दुखत असतें व हा दुखावा पाणी भरपूर प्याल्यास कमी होतो. हा दुखावा होण्याचें कारण लघ्वींतील क्षार मुत्रपिंडांत राहून जातात व हे क्षार पुरेशा पाण्याच्या अभावीं मूत्रमार्गानें बाहेर पडत नाहींत व ही संवय अशीच चालू राहिली, तर मूतखडा वगैरे विकार होऊं लागतात. मलावरोध असणाऱ्या स्त्रियांमध्यें एक प्रकारचा ( बॅसिलाय कोलाय ) जंतु तयार होतो व तो मूत्रमार्ग हळूहळू बिघडवून दुखावा उत्पन्न करतो.

पोटदुखीः—आमांशयाचा दाह, अग्निमांद्य, आमांशयामध्यें व्रण होणें, दुष्ट व्रण वगैरे कारणांमुळें पोटात दुखत असतें. अन्न न पचल्यामुळें पोटांत वायु होऊन—अन्न कुजून दुखावा उत्पन्न होतो व तो अन्नामध्यें बदल केला म्हणजे कमी होतो.

नळांमध्यें दुखणें: —( Bowel pain ) या विकाराला अजीर्ण, मलावरोध, आंतडें दबणें ( Distension ) मज्जातंतुशिथिलता व खनिज विषें हीं कारणें होत.

अन्न पचन होतांना आंतड्यांची एक प्रकारची हालचाल सुरू होते. त्यामुळें ( Peristaltic ) पोटांत दुखूं लागतें. अन्नपचन बरोबर झालेलें नसेल, तर अन्न जागच्याजागीं राहिल्यामुळें दुखूं लागतें व हें अन्न पचन होण्याकरितां कांहीं औषध घेतलें म्हणजे कमी होतें. मलाचे खडे झाल्यामुळें शौचाला साफ होत नाहीं, निसर्ग ती घाण बाहेर काढण्याचा नेट करीत असतो. अशा वेळीं मलावरोधाची संवय असल्यामुळें दुखावा उत्पन्न होतो. अन्न कुजल्यामुळें, पोटांत वात धरतो, त्यामुळें आंतड्याची स्थिती खालींवर होतें व अन्नपचनाला विरोध उत्पन्न होतो.

या विकारांमध्यें आंतड्यांची नैसर्गिक स्थिति पालटत असल्यामुळें होणारा दुखावा कमी होणें कठीण जातें व एखादेवेळीं शस्त्रक्रियेवर अवलंबून रहावें लागतें. भीति, काळजी, मनाचा उद्वेग वगैरे मानसिक कारणामुळें पोटांत कळा येत असतात. शिसें, तांबें, वगैरे विषांपासूनही पोटांत दुखत असतें.

पोटांत होणारें दुःख हें आंतड्यांपासून किंवा गर्भाशयापासून आहे हें खालील लक्षणांवरून समजून येतें.

आंतडीं व गर्भाशय यांमधील फरकः—आंतडयांपासून होणारें दुःख स्थानिक नसतें व आपण बोटें लावूं त्याप्रमाणें तें फिरत असतें. गर्भाशयापासून होणारें दुःख ओटीच्या भागांत बेंबीच्या खालीं व तें स्थानिक असतें, चाललें असतां जास्त होतें, उकिडवें बसलें असतां कमी होतें, हाललें असतां जास्त दुखतें. आंतड्यांमध्यें दुखावा असेल, तर एनिमा अगर शौचाचें औषध घेतलें असतां कमी होतें.

पोटांच्या अंतरावरणाच्या दाहांमुळें ( peritonitis ) पोटांत दुखत असतें.

पित्तशयांमध्यें खडे झाले म्हणजे, पित्त बरोबर वाहत नाहीं व त्यामुळें पोट दुखत असतें, त्याला इंग्रजीमध्यें बिलयरी कॉलीक असें म्हणतात.

ह्यामध्यें दुखावा तीव्र असतो, उलटया होतात व कळ उठते. औषधानें बरें नच झाल्यास शस्त्रक्रिया करण्याची पाळी येते.

मज्जातंतुशिथिलता झाली म्हणजे पोटच नव्हे, तर सर्व अंग दुखत असतें. अशा वेळीं मागें मज्जातंतुशिथिलतेमध्यें लिहिल्याप्रमाणें लक्षणें पाहून चिकित्सा करावी.

पोटदुखी हा नेहमीं आढळणारा विकार आहे. परंतु पोट म्हणजे इंग्रजींत स्थूलदृष्ट्या Abdomen असें म्हणतात. छातीपासून बेंबीजवळचा भाग पोटाचा भाग व बेंबीखालचा ओटीचा भाग असें म्हणण्याची रीत पडलेली आहे.

# प्रकरण २० वें.

## गर्भाशयांत दुखणें [ Uterine-Pain ]

ओटीमध्यें नेहमीं दुखण्याची तक्रार असली म्हणजे त्यांचा गर्भाशयांशीं संबंध येतो. बाळंतपणानंतर हा दुखावा नेहमीं आढळतो. गर्भाशय पूर्वस्थितीवर न आल्याचा हा परिणाम होय. गर्भाशयांत दुखण्याचे खालीलप्रमाणें चार प्रकार आहेत.

( १ ) गर्भाशयाची पूर्वस्थिती ( २ ) गर्भाशयाची अर्धवट पूर्णस्थिती ( Involution of the uterus ) ( ३ ) अर्धवट स्थितीचे परिणाम ( ४ ) गर्भाशयांच्या अंतरावरणांचा दाह गरोदरावस्थेमध्यें मुलाच्या होणाऱ्या वाढीमुळें गर्भाशयाचा आकार व वजन वाढत असतें. प्रसूति झाल्यानंतर पहिल्या दिवशीं १॥ ते २॥ पौंड वजन असतें व त्याचा पश्चिम भाग ( Fundus ) नाभीपर्यंत असतो. प्रसूतिनंतर वाढलेला नैसर्गिक गर्भाशयाचा आकार हा पूर्वस्थितीवर येणें याला इंग्रजींत इनव्हेल्युशन असें म्हणतात. बाळंतपणानंतर १२ दिवसांनीं गर्भाशयाचा पश्चिम भाग कमी होतो. १५ दिवसानंतर गर्भाशयाचें वजन -॥- पौंड होतें व ३ आठवड्यानंतर ४ ते ६ औंस होतें. ही पूर्वस्थिती येण्यास साधारणपणें १ ते ३ महिने लागतात. गर्भाशय पूर्वस्थितीवर आला नाहीं व त्याचें संकोचन बरोबर झालें नाहीं तर तो शिथिल राहून वेदना होत राहते. ( Subinvolution ) व क्वचित् प्रसंगीं गर्भाशयाचा आकार मुळच्या आकारापेक्षां कमी होतो.

कारणें:—गर्भाशय पूर्वस्थितीवर येण्यास प्रसूता स्त्रीची प्रकृति निरोगी पाहिजे व गर्भाशयाचें पूर्ण संकोचन झालें पाहिजे. गर्भाशयाचें संकोचन चालू असतां रुधिराभिसरणहि उत्तम चालून त्या त्या इंद्रियांना पोषण मिळत असतें. संकोचनामध्यें व्यत्यय आला तर रुधिराभिसरणामध्यें प्रतिबंध होऊन गर्भाशय पूर्ण स्थितीला येण्यास अडथळा येतो. वार अगर नाळेचा साधा तुकडा आंत राहिला असतां संकोचनास बाध येऊन रक्तस्राव फार होऊं लागतो व अशा वेळीं शस्त्रक्रियेनें हा भाग बाहेर काढावा लागतो. या स्थितीमध्यें ताप असतोच व त्यामुळें जीवनक्रिया बरोबर चालत नाहीं, यामुळें गर्भाशय पूर्वस्थितीवर येण्यास

अडचण पडते. ओटींमध्यें सूज घेऊन ताप येत असेल तर गर्भाशयाबरोबर इतर इंद्रियांच्या रुधिराभिसरणांमध्यें फरक होतो. ज्यांना बरींच मुलें झालेलीं आहेत त्यांच्यामध्यें गर्भाशय पूर्व स्थितीवर यावयास वेळ लागतो व शिवाय त्याचें पूर्ण संकोचन होत नाहीं हें वेगळेंच. अशक्तपणा हें एक कारण आहे. शिवाय मूल अंगावर बरींच वर्षें दूध पीत रहाणें, हेंहि हानिकारक आहे. अशिक्षित वर्गामध्यें कित्येकवेळां असें दिसून येतें कीं, मुलाला दांत येऊन त्यानंतर दुसरें मूल झालेलें असलें तरी अंगावरील दूध पिण्यास देण्यांत येत असतें, यांपासून शरिरप्रकृतीला अपाय होत आहे याची त्यांना जाणीव नसते.

अकालीं बाळंतपण येणें:—गर्भपात, गर्भस्त्राव, पुरे दिवस न होतां–प्रसुति होणें याला अकाल प्रसूती असें म्हणतात; या कालांत गर्भाशयांतील भाग बाहेर पडून जात नाहीं व त्यामुळें त्याचें अपूर्ण संकोचन होतें.

जननेंद्रियांच्या भागांला जखम होणें:—आंतील भागांला जखम झाल्यामुळें ताप येतो व त्यांमधील त्वचा फाटल्यामुळें संकोचनामध्यें प्रतिबंध येतो. ( Perineum ) क्षय, मधुमेह, मूत्रपिंडाचे विकार, उपदंश, जखम होऊन पू वहाणें, न्युमोनिया, खोकला, हृदयांच्या पडद्याचा विकार, गलिच्छ रहाणी, गर्भाशय स्थानच्यूत होणें वगैरे विकारांमध्यें गर्भाशयाचें अपूर्ण संकोचन होण्याचा संभव असतो.

अपूर्ण संकोचनाचा परिणाम:—शरिरांवर यांचा विशेष परिणाम होत नाहीं. गर्भाशयाचा आकार मोठा असल्यामुळें ओटीचा भाग फुगीरसारखा मोठा दिसतो. अशा स्त्रियांमध्यें दमा होण्याचा संभव असतो. गरोदरपणांत सूज येते, त्यांना बाळंतपणानंतर थकवा आला तर पाय सुजण्याची तक्रार आढळते. गर्भाशयाच्या अपूर्ण स्थितीमुळें शारीरिक विकृती होत नसली तरी रुधिराभिसरणामध्यें व्यत्यय येण्याचा व त्यापासून निराळे विकार होण्याचा जास्त संभव असतो.

बाळंतपणानंतर गर्भाशयाप्रमाणें योनीमार्गहि विस्तृत झालेला असतो व त्यांचें संकोचन गर्भाशयाप्रमाणेंच होत असतें. ज्यांना बरींच मुलें झालेलीं आहेत, त्यांचा योनिमार्ग पूर्ण स्थितीला येत नाहीं तो मार्ग मोठा रहातो. संकोचनाच्या अभावीं दाह होण्याचा संभव जास्त असतो व त्यामुळें प्रदरांसारखे विकार नेहमीं चालू असलेले अनुभवास येतात.

( १ ) प्रसूतिनंतर नाळ अगर पडद्याचा भाग आंत न राहूं देणें. ( २ ) गर्भाशयसंकोच होण्याकरितां औषध देणें. ( ३ ) पूर्ण विश्रांती देणें. बाळंतिणीला निदान तीन महिने अंगाला तेल लावणें. सात्विक आहार घेणें, घरकाम वगैरे न करणें असे आपल्यामध्यें पूर्वकालीं निर्बंध कां होते हें चाणाक्ष वाचकांच्या ध्यानीं येईलच. अलीकडच्या सुधारलेल्या काळांत अंगाला तेल लावणें व त्याचप्रमाणें शेक घेणें अडाणीपणाचें किंवा गांवढळपणाचें मानलें जातें; कारण पाश्चात्य स्त्रियांमध्यें ही पद्धत आढळत नाहीं. इंग्रजी शिक्षणामुळें आमची स्वतंत्रपणें विचार करण्याची शक्ति जाऊन अंधानुकरण करण्याची प्रवृत्ति मात्र जास्त बळावत चाललेली आहे. परंतु शिक्षणांबरोबर सारासार विचारशक्ति वापरली तर आपल्या रितीमध्यें कांहीं तरी शास्त्रीय तत्त्वांचा भाग आहे हें आढळून आल्याशिवाय राहाणार नाहीं.

हॉस्पिटलच्या सोई आजच्या परिस्थितीला अनुरूप आहेत यांत संशय नाहीं, कारण प्रसूतिपण हा एक पणच असतो असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. परंतु दहा दिवसानंतर आपल्या घरीं आल्यानंतर अंगाला तेलपाणी लावून न घेतल्यामुळें १—२ बाळंतपणें झाल्यानंतर, फार काय प्रथम बाळंतपणांतसुद्धां क्षयासारखे विकार जडतात. अंगाला तेल लावल्यापासून स्नायूंना स्निग्धरूपी द्रव्य मिळत असतें, त्यांची ताकद वाढते व रुधिराभिसरणाला मदत होत असते. तेव्हां सुशिक्षीत स्त्रियांनीं या पूर्वोपचारांमध्यें कांहींतरी तथ्य आहे असें समजून ते प्रकार अमलांत आणावेत व आमच्या व्यवसाय बंधूंनीं ते अमलांत आणण्याचे प्रयत्न सुरू करावेत; निदान प्रतिबंध तरी करूं नये.

गर्भाशयाच्या अंतस्त्वचेचा दाहः—( Metritis ) या विकारांत गर्भाशयाचा आकार मोठा होणें, दुखवा व मृदुपणा याप्रमाणें फरक होतात. यांच्यामध्यें पोट व बेंबी खालीं दुखावा होत असतो. दुखावा तीव्र नसला तरी राहून राहून होत असतो; पडून राहिलें असतां साधारण बरें वाटतें. पाळी येण्याच्या पूर्वी आगाऊ कांहीं दिवस दुखूं लागतें. गर्भाशय विस्तृत झाल्यामुळें रक्तस्राव फार होतो; किंवा क्वचित थोडा होतो. योनीच्या आंतल्या बाजूस सूज असल्यामुळें श्वेतप्रदर चालू असतो. गर्भाशयाचा दाह होत असल्यामुळें लघ्वीला वारंवार जावें लागतें. हा विकार असतांना मूळव्याध, शौचाला होतांना त्रास होणें व गुदद्वारांच्या ठिकाणीं

चिरा पडणें, स्तनांमध्यें दुखवा, ही लक्षणें होत असतात. अशक्त प्रकृतीच्या स्त्रीला हीं लक्षणें जास्त जाणवतात.

एकंदरींत शक्य तों सुखकर प्रसूतिपणा होण्याबद्दल काळजी बाळगली पाहिजे. हा विकार बरेच दिवस असेल तर वंध्यत्व येतें, प्रसूती झाल्यास गर्भाशयामध्यें कांहीं न राहील याबद्दल काळजी घेणें, व स्राव होत नसेल तर गर्भाशयाच्या ग्रीवेला शस्त्रप्रयोग करविणें; किंवा जळवा लावून रक्त काढविणें लागतें. ग्लीसरीनचा बोळा योनीमार्गात ठेवल्यावर स्राव कमी होण्यास मदत होते. हा बोळा आंत ठेवल्यानंतर स्त्रीनें पडून राहिलें पाहिजे.

---

# प्रकरण २१ वें

## स्त्रियांना हिस्टेरिया उर्फ उन्माद कां होतो ?

हिस्टेरिया म्हणजे ज्याला आयुर्वेदांत उन्माद असें म्हणतात तो विकार. हा एक मज्जातंतूचा विकार आहे व तो स्त्री व पुरुष या दोघांनाहि होतो. पुरुषांना हा विकार झाल्यास त्याला अपस्मार असें म्हणतात. हिस्टेरिया हा शब्द प्रचलित झालेला आहे. हा विकार झाला असतांना इंद्रियांमध्यें बिघाड आढळत नाहीं. तरुण स्त्रिया, कुमारिका, गरोदर स्त्रिया, यांमध्यें हा विकार विशेष आढळण्यांत येतो. शिवाय मद्यपान करणारे, आत्महत्या करणारे अशा कुटुंबांत आनुवंशिक आढळतो. मनाला उत्तेजक असें वाङ्मय वाचण्यांत आलें असतां हिस्टेरियाचा विकार जडतो. आपल्या मनाजोगत्या, प्रेम असणाऱ्या व्यक्तीशीं विवाह न झाल्यास मनोविकारचें उद्दीपन होऊन हा विकार सुरू होतो व फाजील विषयसेवन अगर मनोविकारांचें संयमन होऊन इच्छा अतृप्त राहील्यामुळेंहि हा विकार उद्भवतो. हिस्टेरियाचा विकार जडला म्हणजे तो ताब्यावर येण्यास फार वेळ लागतो. शहरासारख्या ठिकाणीं रहाणाऱ्या मुलींमध्यें रजोदर्शन अकालीं येत असतें. रजोदर्शन झाल्यानंतर मनो-विकार जागृत होत असतात व अशा काळांत प्रेमविषयक शृंगारात्मक वाचनाची गोडी लागली म्हणजे तें सौख्य अनुभवण्याच्या इच्छेचा मनांमध्यें प्रादुर्भाव होऊं लागतो. घरांमध्यें शिस्त चांगली असेल, आईबाप धार्मिक वळ-णांचे असतील तर त्यांच्या आचरणांचा मनावर परिणाम होऊन हे विचार लुप्त होत असतात; परंतु हल्लीं अशा प्रकारची स्थिति किती कुटुंबांत आढळून येत असेल ? शिक्षणांचा प्रसार, त्यांमध्यें नाना तऱ्हेच्या प्रेमविषयक कादंबऱ्या, मासिकांतील मनोविकारोत्तेजक लघुकथा यांचें वाचन, नग्न चित्रांचें उघडपणें दर्शन, अनुकूल परिस्थिती व परस्पर सहवास घडणें व तत्संबंधीचें सौख्य अनुभववावें कसें ह्या विचारांचा मनावर पगडा बसणें, व तोच ध्यास मनाला लागून राहिल्यामुळें बेचैन होणें यामुळें एकादे वेळीं आकस्मिक स्फोट होऊन हिस्टेरिया सुरू होतो. हिस्टेरीयाचा विकार जडला म्हणजे त्या मुलीचा विवाह तावडतोब करणें ही गोष्ट अत्यन्त महत्त्वाची होय. लग्न झाल्यानंतर सुद्धां हा विकार चालू रहातो व चालू राहिल्यास मग प्रसूतीनंतर तो कमी होतो असें अनुभवास येतें. हा विकार जडला म्हणजे मन कमकुवत होतें. सारा

दिवस डोकें विचार करीत असतें. घरांतील वडील माणसांनीं एखादी विरुद्ध गोष्ट केली तर ती मनाला लागते, अगर एखादी गोष्ट क्षुल्लक असली तरी त्यांचा मोठा बाऊ वाटत असतो, मन चंचल झालेलें असतें व आपल्याला कांहीं तरी झालेलें आहे, अशा बद्दल सारखे विचार चालू असतात. मनावर ताबा नसतो. मनाची दुर्बलता एवढी झालेली असते कीं कोणी मोठ्यानें बोललें असतां सहन होत नाहीं व प्रत्येकजण आपल्याविषयींच चर्चा करीत आहे कीं काय अशा प्रकारची मनाची साशंक स्थिति होऊन जाते. हिस्टेरियाचा झटका आला म्हणजे सर्व अंग शून्य होऊन जातें. कांहीं वेळेला अर्धी बाजू लुली पडते. सुई टोंचून पाहिलें असता संज्ञानाश झालेला आढळून येतो.- अंग थंड, बधिरेपणा, वास, चव यांचें ज्ञान नाहींसें होतें. सप्तपथाच्या अंतस्त्वचेवर परिणाम होऊन बोलणें बंद होतें. ह्या विकारांमध्यें शून्य भाग झालेल्या ठिकाणीं धातूचे तुकडे ठेवल्यास त्यांच्या विरुद्ध बाजूचाही संज्ञानाश तेवढ्याच भागांत नाहींसा झालेला आढळून येतो. डोकें दुखणें, सर्वांगांत कळा लागणें, कोणी सुया टोंचत आहे असें वाटणें, डोकें थंड झालें आहे असें वाटणें अशा प्रकारचे निरनिराळे विकार अथवा लक्षणें होत असतात व यामुळें कित्येक वेळीं अशा प्रकारच्या हिस्टेरियाग्रस्त स्त्रिया केंस विंचरण्यासारख्या क्षुल्लक गोष्टीसहि भीत असतात.

हिस्टेरियाचा दुसरा प्रकार असा आहे. अंतःफलक, स्तन, कपाळ, मान वगैरे विशिष्ट भागांवर हात लावला असतां तेथें दुखूं लागतें व हीच स्थिती शरीराच्या प्रत्येक ठिकाणीं आढळून येतें. कित्येक वेळां अशा जागीं दाबलें असतां हा झटका कमी होतो. अंतःफलकांची जागा (ovary) वरील दोन्हीं बाजू ह्या दुखाव्यांच्या विशिष्ट जागा होत. कांहीं वेळां कानामध्यें आवाज घूं घूं होत असतो व त्यामुळें कान दुखतो-कित्येकींना या झटक्यामुळें अर्धांगवायु, आंकडी, स्नायूची स्थिरता व संज्ञानाश झाला असावा असें वाटतें. विशेषतः पायांच्या स्नायूंवर परिणाम होऊन रोग्याला उठतां येण्याची पंचाईत होते. ह्या स्थितींत रोग्याला उभें रहाणें अगर चालणें शक्य नसतें तरी निजून बाकीच्या सर्व क्रिया चालू असतात. पुष्कळ वेळां झटका आल्यानंतर अर्धांगवायूचीं लक्षणें होतात, परंतु झटका कमी झाल्या नंतर पुनः पूर्वस्थितीवर येतें. गळ्यांच्या स्नायूंवर परिणाम झाल्यास बोलतां येत नाहीं व रोगी तोंड हालवतो

परंतु आवाज निघत नाहीं अशी स्थिती होते. अपस्मार व उन्माद यांचीं लक्षणें जवळजवळ सारखींच आढळतात, परन्तु त्यामध्यें महत्त्वाची गोष्ट म्हणजे हिस्टेरिया झालेल्या स्त्रीमध्यें शारीरिक दुखापत अगर तें कारण आढळत नाहीं; परंतु अपस्मार अगर फीट्स्मध्यें रोग्याला शारीरिक इजा झालेली आढळून येते. हिस्टेरियामध्यें साधारणपणें शुद्धि आढळून येते व रागानें किंवा मोठ्यानें बोललें असतां झटका कमी होऊन रोगी ताबडतोब घाबरून उठून बसतो.

गर्भाशयाचा विकार, रजःस्राव बरोबर न होणें, मेंदूची अशक्तता, भय, शोक, खेद, कामविकार, मुष्टिमैथुन, अति विषयासक्ती, अगर तिचा अभाव असणें, नाटकें, सिनेमा वगैरे पाहून तशाप्रकारचे विचार मनांत येणें, काम नसणें, आळस, व्यायाम न करणे, संसारामधील चिंता यामळें हा विकार होतो.

लक्षणें:—गळा बंद झाल्यासारखा वाटणें, स्तब्धता, हंसणें, रडणें, उलटया, ढेंकर, दांतखिळी बसणें, आवाज बसणें, पोट चढणें, वारंवार बेशुद्धी येणें, श्वास वाढणें, अशा प्रकारचीं लक्षणें होतात. हिस्टेरियाच्या विकारांत रोग्याला धास्ती नसते. क्वचित् प्रसंगीं उलटया होऊन रक्तस्राव होतो, हा रक्तस्राव उलटीच्या रूपानें तोंडांतून अगर आंतड्यांमधून गुदद्वारें होत असतो. ह्या विकारांमध्यें वायूचा जोर जास्त असल्यामुळें आंतड्यांमधील वायूमुळें पोटांत गोळा अगर गांठ झालेली आहे असें वाटतें. परंतु झटका कमी झाल्यानंतर हीं लक्षणें कमी होतात. कांहीं स्त्रियांमध्यें झटका आल्यास शरीर धनुष्याकार होतें. तर कित्येकामध्यें जीभ बाहेर पडते. ही स्थिति प्रत्येक स्नायूंच्या आकुंचनावर अवलंबून असते. स्नायूंचा संकोच झाला व झटका कमी होऊन त्यांमध्यें बदल झाला नाहीं तर रोगी सुधारणें कठीण होऊन जातें. कांहीं स्त्रियांना ह्या विकाराचें स्तोम माजवण्याची हौस आढळून येते व हें खरें कीं खोटें आहे हें वैद्यालाहि समजणें कठिण जातें. कित्येक स्त्रिया मी आठ आठ दिवसांत कांहींच खाल्लें नाहीं व मला भूक लागतच नाहीं असें तोऱ्यानें सांगतांना आढळतात व ही लबाडी त्यांच्यावर पहारा ठेवला असतां आढळून येते. घरांतील माणसांचें आपल्याकडे दुर्लक्ष आहे असें आढळून आल्यास अंगांत सुया टोंचून घेऊन मी मरत आहें असें दाखवतात व आपल्याकडे लक्ष वेधून घेतात. या विकारांत जिव्हास्तंभ होतो व रोग्याला मुक्याप्रमाणें खुणा करून सांगण्याची पाळी येते. असो. हिस्टेरियामध्यें असे नाना प्रकार आढळतात. नेहमीं आढळणाऱ्या स्त्रीचीं हीं लक्षणें दिलेलीं आहेत.

# प्रकरण २२ वें.

## लघ्वीला वारंवार होणें ( Too Frequent Micturition )

लघ्वीला वारंवार होणें व लघ्वी होतांना कळा लागणें ह्या दोन्हीं गोष्टी दिसण्यांत सारख्या असल्या तरी त्या निराळ्या आहेत. इंग्रजीमध्यें याला ( Too Frequent urine and incontinence of urine ) असें म्हणतात. लघ्वी वारंवार होते त्यांमध्यें मूत्राशयांचा दाह झालेला असतो व वारंवार लघ्वी राहून राहून होते; परंतु त्याच्या उलट ( continence ) मध्यें लघ्वी होणें चालू असतें. मूत्राशयाचा दाह झाला म्हणजे आग होते व लघ्वीला वारंवार जावें लागतें. ओटीमधील इंद्रियांना सूज असेल तर अशा प्रकारची स्थिती होते. ह्या विकारांमध्यें निरनिराळ्या प्रकारचीं लक्षणें होत असतात. कधीं आग होते. कधीं आग होत नाहीं, परंतु हीं सर्व लक्षणें कमी जास्त होणें बाजूच्या इंद्रियांवर अवलंबून असतें. ह्यांचे ४ भेद केलेले आहेत.

( १ ) स्थानिक कारण नसतें.

( २ ) गर्भाशय व गर्भाशयांची Appendages यांमध्यें दोष उत्पन्न होणें.

( ३ ) मूत्र मार्गाची परीक्षा करून ठरवणें.

( ४ ) मूत्राशय अगर मूत्रपिंड यांना विकार आहे किंवा काय हें लघ्वी पाहून ठरविणें.

( १ ) ह्या विकाराची तपासणी करतां गर्भाशयामध्यें विकार नसेल तर लघ्वीमध्यें दोष आढळत नाहीं.

गरोदरपणांत वारंवार लघ्वीला होतें.

मज्जातंतूचे विकारः—कलायखंजमध्यें ( Tabes-dorsalis ) मूत्राशयांचा दाह होऊन वारंवार लघ्वीला होतें, जन्मतःच मूत्राशय लहान असल्यास हा त्रास मधून मधून होण्याचा जास्त संभव असतो.

मूत्राशय खालीं आल्यामुळें ( Over distension ) वारंवार लघ्वीला होतें. मधुमेह व इतर मेहांचे विकार यामध्यें मूत्राशयांत लघ्वी सांचत असल्यामुळें वारंवार लघ्वीला जावें लागतें.

रात्रीच्या वेळीं झोपेंत लघ्वीला होण्याची संवय पुष्कळ मुलींमध्यें सांपडते. व ही संवय कांहीं काळानंतर कमी होते. मज्जातंतुशिथिलता, पाठीवर निजणें,

योनिमार्गाचा दाह, क्षय, मुळव्याध, भगंदर, या विकारामुळें ( reflex irritation ) मज्जातंतुमध्यें परिवर्तन होऊन लघ्वीला होतें.

चिकित्साः—कारण काय तें शोधून त्याप्रमाणें उपचार करावा. अतिशय मेहनत करूं नये. रात्रींच्या वेळीं दुसऱ्याला उठवण्यास सांगून लघ्वी करावी. लहान मुलींमध्यें अशा प्रकारची संवय लावल्यास ही खोडी जाते. चटईवर निजण्यास सांगावें. रात्रीं झोंपतांना पाणी देऊं नये. पाठीच्या मणक्यांवर थंड पाणी सोडावें. पौष्टिक औषधें घ्यावींत.

लघ्वीचा वेग आंवरून धरला व अशाप्रकारची संवय लागली तर हा विकार होतो.

मूत्राशयांचा दाहः—मुलें पुष्कळ झालीं म्हणजे मूत्राशयाचा दाह होण्याचा जास्त संभव असतो. व हा इतर इंद्रियांमध्यें-शिथिलपणा आल्यामुळें होतो. मज्जातंतुशिथिलता, पाठ, कमर दुखणें, झोंप न येणें, हीं या विकाराला समान्यतः कारणें होत. गरोदरपणा, गर्भाशय भ्रंश झाल्यास (Prolapse) खालील लक्षणें होतात. लघ्वी होतांना त्रास न होणें, पडलें असतां बरें वाटणें, व पाट दुखणें. गर्भाशयामध्यें ग्रंथी झाल्यास अगर गर्भाचा दाब पडल्यास मूत्रमार्गामध्यें बदल होऊन वारंवार लघ्वीला होतें.

मूत्रमार्गामध्यें क्षत होणें, पु, प्रमेह, दुष्टव्रण, मूत्रमार्गाचा संकोच, मूत्र पिंडाचा विकार, मूत्र पिंडामध्यें पु होणें, ताप-वगैरे मुळें हें विकार होतात.

---

# प्रकरण २३ वें.

## वंध्यत्व ( Sterility )

वंध्यत्व म्हणजे मूल न होणें. स्त्रीचें वय १७ वर्षांच्या पुढें झालें असेल व लग्न होऊन ४–५ वर्षे झालीं तरी मूल झालें नसेल तर साहजिकच या प्रश्नांची विचारसरणी सुरू होते. स्त्रीची प्रकृति दिसण्यांत चागली सुदृढ असते परंतु मूल होत नाहीं असें बरेच ठिकाणीं दिसून येतें. परंतु नैसर्गिकपणें अगर विकारांनीं अशक्त असलेल्या स्त्रिया ज्यांना मूल होणें म्हणजे जिवावरचें दुखणें; अशांच्या मागें दरवर्षी बाळंतपण लागत असलेलें दिसून येतें. ज्यांना मुलांचें वरदान आहे ते अपत्यजनन ह्या गोष्टीचा विचारच करीत नाहीं; परंतु मूल होणें न होणें हें प्रारब्धाधीन असलें तरी याच्या मुळांशी शास्त्रीय तत्त्व आहे हें प्रत्येकानें लक्षांत बाळगिलें पाहिजे. शास्त्रज्ञांनी वंध्यत्वाचे २ प्रकार कल्पविले आहेत. एक Absolute व एक relative sterility गरोदरपणा न येणें, गर्भस्राव. गर्भपात वगैरे न होणें ह्या गोष्टी ज्या शास्त्रांत आढळतात त्यांना Absolute sterility म्हणतात. जिला मुलें होतात–परंतु मुलें जगत नाहींत तिला Relative sterility म्हणतात.

वंध्यत्वांची कारणें:—स्त्रीकडे दोष नसला तरी पुरुषांचा वीर्यदोष, (२) वय, ( ३ ) स्त्रीअंडांमध्यें व्यंग असणें. ( ४ ) शस्त्रक्रियेचें कारण, संभोगाच्या वेळीं अडचण, पाळीच्या वेळीं त्रास, ( ५ ) रहाणीमधील फरक, ( ६ ) रोगविकृती. Inconpata biriz:—म्हणजे प्रकृति वैचित्र्यपणा असें म्हणतां येईल. यांमध्यें परस्परांची प्रकृति चांगली असते, संबंधाला अडचण येत नाहीं परंतु मुलें होत नाहींत. अशा पुरुषांनें अगर स्त्रीनें पुनर्विवाह केला तर त्यांना मुलें होतात व हें कसें व कां होतें याचें शास्त्रज्ञांनासुद्धां अद्यापपर्यंत कोडें पडलेलें आहे.

पुरुषांच्या ठिकाणीं असणारें वंध्यत्व. ( Male sterility ) पुरुषांमध्यें १–६ याप्रमाणांत हें वंध्यत्व आढळतें. संभोगशक्ती असते, परंतु वीर्यामध्यें वीर्यजंतू नसतो व वीर्य क्षीणता व नपुंसकत्व हें कारण असतें. साधारणपणें स्त्रियांमध्यें १७ ते २४ वर्षे हा मूल होण्याचा काळ असतो. गर्भाशय किंवा स्त्रीअंड यांमध्यें व्यंग असेल तर वंध्यत्व येतें, परंतु अलीकडे ती कमतरता भरून काढण्याकरितां निरनिराळ्या ग्रंथीचे एक्सर्स्ट्रक्ट दिले असतां फायदा झाल्याचें आढळून येतें.

विटाळ साफ न येणें अगर त्याच्यामध्यें अडचण असणें, मूल होण्यास प्रतिबंध करणें, पाळीच्या वेळीं पोटांत दुखणें, विटाळ साफ न येणें अशा स्त्रियांमध्यें संभोगेच्छा कमी असते व यामुळें वंध्यत्व येत असतें. विटाळासंबंधींच्या विकरांस ग्रीवेचें प्रसरण ( dilatation of the cervix ) केलें असतां विटाळ साफ होऊं लागतो व संभोगेच्छाहि वाढते.

ज्या स्त्रियांचा विवाह उशीरां होतो त्या स्त्रियांना मूल होणें कठीण जातें असें बहुतेक ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येतें. संभोगाच्या वेळीं त्रास होत असला व अपूर्ण संभोग घडलेला असला तरी सुद्धां गरोदरपण येतें. याचें कारण वीर्यजंतूंच्या हालचालीमुळें एकादा वीर्यजंतु योनीमधून सटकन गर्भाशयामध्यें जातो व त्यामुळें गरोदरपण येतें; परंतु साधारणतः पूर्ण संभोग होऊन वीर्यजंतु योनीच्या वरील भागांत असेल तरच शक्य असतें. रजवटीच्या संभोगामध्यें गरोदर झाल्याचीं चिन्हें आपल्याला नेहमीं आढळतात, याला कारण वीर्यजंतुंची हालचाल हें होय.

Profluvium Seminis:—हा असा प्रकार आहे कीं, पुरुषांचा संभोग झाल्यानंतर वीर्य आंत न रहातां तें बाहेर पडून जातें व त्यामुळें गरोदरपणाला प्रतिबंध होतो. अशामध्यें संभोगाचा निराळा प्रकार आहे त्याची तज्ज्ञ डॉक्टरकडून माहिती घ्यावी.

Artificial insemination:—गर्भाशयांत वीर्य न गेल्यामुळें गरोदरपणा येत नाहीं त्यामुळें वंध्यत्व येतें, अशा वेळीं पिचकारीनें वीर्य घेऊन ती सोडण्यांत येते व अशा कृतीनें वंध्यत्व दूर झालेलीं उदाहरणें आढळतात.

Influence of sexual feeling:—मनोविकारांचा दाब.

कामेच्छा जागृत होणें व वंध्यत्व यांचा परस्परांशीं संबंध आहे. पुष्कळ वेळां असें पहाण्यांत येतें कीं कष्टार्तव, योनीमार्गाचा संकोच ह्या गोष्टी दूर करून स्त्रीला कामेच्छा असली तरी गरोदरपणा रहात नाहीं व वंध्यत्व दूर होत नाहीं.

अशावेळीं पुरुषांचें प्रकृतिवैचित्र्य, वय, अगर शारीरिक व्यंग हेंही कारण असूं शकतें. मूल होण्याला इतर गुप्त कारणें असूं शकतात व तीं समजणेंही कठीण जातें व अशा वेळीं नशिबावर हवाला ठेवावा लागतो.

Too frequent intercourse:—अतिशय संभोगामुळें वंध्यत्व होतें.

बाहेरख्याली स्त्रीयांमध्यें मुलें सहसा होत नाहींत. अतिशय संभोगामुळें वीर्य पाण्यासारखें पातळ होतें, स्राव थोडा होतो व त्यामध्यें वीर्य जंतु नसून इतर ग्रंथीचा स्राव असतो. (Accessory glands) ब्रह्मचर्य पाळलें असतां वीर्यजंतु पुष्कळ तयार होतात. या करितां वंध्यत्वाचा विकार दूर करतांना स्त्रीनें ब्रह्मचर्य पाळणें श्रेयस्कर आहे.

३–४ महिने पतीसहवासापासून स्त्री दूर जाऊन राहिल्यास वंध्यत्वाचा विकार दूर होतो.

मद्यपान, चहासारखीं उत्तेजक–पेयें फार पिण्यामुळें वीर्यजंतूवर परिणाम होऊन संतति होण्यास प्रतिबंध होतो.

स्थूलता:—(obesity) २०–२५ वर्षांपर्यंत मुल झालें नाहीं म्हणजे अंगांत चरबी वाढूं लागते व स्थूलपणा येऊन अंग बेडौल होतें.

स्थानिक विकार:—गर्भाशय स्थानच्यूत होणें, गर्भाशयाचा दाह, योनिमार्गांत व्रण असणें, प्रदर, फायब्रॉइडग्रंथी असणें, वगैरे जननेंद्रियांच्या विकारांमुळें वंध्यत्व येण्यास कारण होतें.

———

# प्रकरण २४ वें.

## प्रदरविकार

रजोदर्शन झाल्यापासून चार ते पांच दिवसपर्यंत मागें वर्णन केलेल्या स्वरूपाचा व पीडा रहित असा जो रजःस्राव होतो तो विकाररहित मानावा. अशा प्रकारें होणारा स्राव हा स्त्रियांच्या नैसर्गिक व विकाररहित स्थितींतच होत असतो. त्यांत कमज्यास्त स्वरूप दिसून आल्यास अगर त्यावेळीं इतर विकार, वेदना, त्रास वगैरे लक्षणें होऊं लागल्यास आर्तव विकारी झालें असलें पाहिजे असें समजावें. पाळीच्या मुदतींत चार ते पांच दिवसपर्यंत व्यवस्थित स्वरूपाचा स्राव होणें व नंतर तो बंद होणें हें स्त्रीच्या निरोगी स्थितीचें लक्षण होय. पाळीच्या मुदतींत प्रमाणापेक्षां ज्यास्त एकसारखा स्राव होणें, किंवा पाळीच्या पूर्वी मध्यंतरी केव्हां तरी रक्तस्राव होणें व तो बरेच दिवस अगर एक सारखा चालू राहणें, अगर स्त्री प्रसूत झाल्यानंतर स्वाभाविक होणाऱ्या स्रावापेक्षां फारच अधिक व ज्यास्त दिवस स्राव चालू राहणें या विकारास प्रदर असें म्हणतात. हा स्राव गर्भाशयांतून योनीमार्गें होत असतो. व तो सफेत, लाल व पिंवळा अशा रंगाचा असतो. आपल्या आर्यवैद्यकांत या विकाराचें कारण पुढीलप्रमाणें दर्शविलेलें आहेः—विरुद्ध भोजन, मद्य सेवन, आत्यंतिक संभोग, गर्भपात, अतिमार्गक्रमण, दिवसा झोंप वगैरे वगैरे कारणांनीं हा रोग उद्भवतो असें सांगितलें आहे; परंतु कित्येकांच्या मतें हा कांहीं स्वतंत्र रोग नसून इतर रोगाचें चिन्ह आहे; हें म्हणणें कदाचित् खरेंहि असेल परंतु, मग बहुतेक रोग असेच आहेत, असें म्हटलें तरी चालेल. ज्वर हा सर्व रोगांचा राजा आहे. " **बिना जीर्णेनच ज्वरं** " शरिराच्या सोसिक शक्तीबाहेर झालेल्या आहार विहारांचें परिणाम लक्षण ज्वर होय. त्याचप्रमाणें अतिसार, तसेंच विस्फोट रोग, म्हणजे रक्तदूषित होऊन त्यांतील दोष त्वचा गत होतात तेव्हां त्याच्या स्वरूपास खरूज, गळवें, फोड म्हणावें लागतें. त्याचप्रमाणें योनिमुखाशीं किंवा योनीच्या ग्रीवेच्या ठिकाणीं आणि गर्भाशयामध्यें सूज येऊन त्या ठिकाणीं जागा कुजणें, तिथें अनेक कारणांनीं ग्रंथी व चट्टा उत्पन्न होणें आणि त्याचा परिणाम त्या जागेच्या रोगाच्या मानानें तेथून अनेक रंगांची लस वाहणें यांस प्रदर असें म्हणतात. तसेंच खोंकला म्हणजे गळयांतील कोणताहि पदार्थ बाहेर काढण्याच्या साधनाची

कृति होय. तो खोकला जर स्वतंत्र रोग आहे असें मानिलें तर प्रदर सुद्धां स्वतंत्रच आहे. सर्व रोगांना कारणें असतातच. कारणावांचून कोणतेंहि कार्य घडत नसतें. प्रदराचे प्रकार वर दर्शविले आहेत त्यापैकीं आतां श्वेत प्रदर याबद्दल विचार करूं. या श्वेत प्रदरामध्यें, म्हणजे या वाहणाऱ्या लसयुक्त स्रावामध्यें सफेत पणाचा भाग विशेष असतो व इतर रंग फारच कमी प्रमाणानें असतात. म्हणून त्यास श्वेतप्रदर म्हटलें जातें. योनीच्या जागे पैकीं तीन ठिकाणीं कारणपरत्वें स्राव होत असतो. त्याचीं कारणें व स्वरूपें स्थानधर्माप्रमाणें निरनिराळीं असतात. आधुनिक वैद्यकाप्रमाणें पाहिलें तर योनिमुखापासून होणारा स्राव हा राखाडया-रंगाप्रमाणें भुरकट असून चिकट असतो. जर योनिदाह होत असेल तर तो स्राव पुवाप्रमाणें असतो. हा स्राव कधीं कधीं योनीच्या ग्रीवेच्या भागापासून देखील होतो. योनीच्या ग्रीवेपासून होणारा स्राव फार चिकट असून पुष्कळ होतो व त्यांत आम्लधर्म विशेष असतो आणि सफेद गोंदाप्रमाणें तकतकीत असतो. ग्रीवेच्या आंतील व बाहेरील मांसपिंड दूषित झाल्यामुळें असा स्राव होऊं शकतो.

सगर्भावस्थेमध्यें आणि ऋतुकाळाच्या प्रारंभीं व नंतर सुद्धां चारपांच दिवस या जागेंतून प्रवाह चालू असतो; परंतु त्यांस एवढी तकाकी व चिकटपणा नसतो. ऋतुकाळांत आर्तवाच्या अभावीं नुसतें सफेत पाणीच स्रवतें, या विकारांस जरी विशेष रोग म्हणावयाचा नाहीं तरी यापासून शरिरास सूक्ष्म प्रमाणानें त्रास होतो. गर्भाशयांत होणारा स्राव यांत पांढरेपणा जास्त असून तो बुळबुळीत असतो. योनिदर्शक यंत्रानें प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय याच्या स्थानांचा निश्चितपणा होऊं शकत नाहीं.

रक्तप्रदरः—पाळीच्या आंत केव्हां तरी रक्तस्राव चालू होऊन तो ज्यास्त दिवस चालू रहाणें किंवा प्रसूत झाल्यावर स्वाभाविक होणाऱ्या स्रावापेक्षां फारच अधिक आणि ज्यास्त दिवस तो स्राव चालू असणें त्यास रक्तप्रदर असें म्हटलें जातें. हा यकृत् किंवा मूत्रपिंडाच्या विकारानें किंवा उतार वयांत रजोदर्शन बंद होण्याचे वेळीं रक्तस्राव फार होत असल्यानें किंवा प्रसूतीनंतर गर्भाशयाचें आकुंचन बरोबर न झाल्यानें हा विकार होत असतो. या विकारानें स्त्री दिवसेंदिवस क्षीण होत जाऊन तिला ग्लानि येते. शरीर फिक्कट होतें, डोकें दुखतें, कर्णनाद होतो, तहानेचा शोष, चक्कर एवढेंच नव्हे, क्वचित प्रसंगीं फीटहि येते.

हीं सर्व किंवा कांहीं लक्षणें अगर रोगाचीं चिन्हें प्रत्येक स्त्रीच्या प्रकृतीनुरूप होत असतात.

कोणास ऋतु दर्शनाचे योग्य मुदतीनंतर पुनः आठ दहा दिवसांनींच स्राव चालू होऊन तो सारखा कांहीं दिवस चालू राहतो व त्यांत आर्तव ( विटाळ ) सुद्धां ज्यास्त स्रवतें, अशा स्त्रीला अनार्तव कालीं बहुधा श्वेतप्रदर असतोच. कोणास दहा पंधरा दिवशींच रजोदर्शन होतें, त्यांत प्रथम मुरडा चालू होऊन मग काळया रंगाचे गोळे पडतात. कोणास वेदना न होतां विटाळ ज्यास्त जातो. गर्भाशय रक्त संचयामुळें मोठा दिसून त्याला [illegible] करून पाहिल्यास त्याची शिथिलता अनुभवास येते. कोणास शुद्ध अळित्याप्रमाणें तांबड्या रंगाचा स्राव होतो. अशी प्रकृतीनुरूप प्रत्येक स्त्रीला निरनिराळीं लक्षणें होत असतात.

सोमरोग—हाहि एक प्रदरांतीलच प्रकार आहे. हा श्वेत प्रदरांप्रमाणेंच दुसरा पाण्यासारखा स्राव मूत्रमार्गानें स्त्रियांना होत असतो. अत्यंत संभोग, शारीरिक श्रमाचा अतिरेक, दुःखघात, अतिसार, विषम, क्षय, वगैरे कारणांनीं शरिरांत असणारें जें जलस्वरूप शरीर पोषक पाणी त्यांचें शरिरांतील स्थान भ्रष्ट झाल्यामुळें तें दूषित होऊन मूत्रमार्गानें स्रवूं लागतें. हा स्राव शुद्ध पाण्याप्रमाणें, व मलरहीत, थंड, पीडा रहीत व निर्गंध असतो. हा विकार भयंकर त्रासदायक असून त्यामुळें स्त्रिया दिवसेंदिवस क्षीण होत जातात, बेचैनपणा वाढतो, मूत्रावरोध होऊंच शकत नाहीं, मस्तक जड होतें, तोंड व टाळ्याचे ठिकाणीं कोरड पडते, जांभया येत राहतात, त्वचा शुष्क होते व केव्हां केव्हां मूर्च्छाही पण येऊं शकते.

वरील एकंदर हकीगतीवरून स्त्रियांना होणाऱ्या निरनिराळ्या प्रकारच्या प्रदराचीं कारणें, लक्षणें समजून येतील, आतां निरनिराळ्या वयाच्या स्त्रियांना जो प्रदर विकार होतो व तत्संबंधीं जे इतर विकार जाणवतात—होतात त्याचा विचार करूं.

मुलींना होणारा प्रदरः—लहान मुलींमध्यें योनिमुखांच्या दाहांमुळें प्रदराचा विकार होतो याला कांहीं लोक खर जाणें असें म्हणतात. मोठ्या स्त्रियांना सुद्धां हा विकार होतो. मुलीला पाठीवर निजण्यास सांगावें व योनिओष्ठ (labia) बाजुला करून पहावें म्हणजे अंतःत्वचा लाल पू मिश्रीत अशी आढळून येईल.

कारणें:—अस्वच्छता, कृमी, सर्दी, शारीरिक व संसर्गजन्य विकार योनीचा भाग स्नान करतांना स्वच्छ न केल्यास त्यामध्यें घाण जमून अंतःत्वचेचा दाह होतो. न्युमोनिया, पूप्रमेह, कृमिविकार यांच्यामुळें सुद्धां हा विकार होण्याचा जास्त संभव असतो. पूप्रमेह व उपदंश झालेल्या आईबापांपासून हा विकार मुलांना होतो. योनिमुखांचा दाह असतांना जर काळजी बाळगली नाहीं तर ती सूज आंतल्या भागांपर्यंत जाते. सुजेमुळें वारंवार खाज उत्पन्न होते, मुल नखांनें खाजविण्याचा प्रयत्न करतें व त्यामुळें तेथें व्रण होतात. गर्भाशयापर्यंत सूज पसरत असल्यास तिचा त्रास मोठेपणांत पाळीच्या वेळीं होतो.

चिकीत्साः—योनिमार्ग रोज स्वच्छ धुतला पाहिजे.

अविवाहित स्त्रियांमधील प्रदरः—तरुण अविवाहीत कुमारिकांना मधुन मधुन पांढरा, पिंवळा स्राव सुरू होतो. साधारणतः इकडे कोणी लक्ष देत नाहींत. योनी मार्गाचा दाह झाल्यामुळें हा स्राव सुरू होतो. हा स्राव पहिल्याप्रथम पाण्या-सारखा असतो व नंतर तो घट्ट होऊन कमी होतो. कांहीं स्त्रियांमध्यें योनिमार्ग नेहमींच ओलसर असतो, यांपासून शारीरिक परिणाम होत नसला तरी त्यांपासून मनाला त्रास होत असतो. तुरटीसारख्या ग्राही औषधानें तो भाग नेहमीं धुतला असतां सूज कमी होऊन स्राव कमी होण्यास मदत होते. अशक्त-पणा असल्यास, लोह, मंडूर भस्म वगैरे औषधें पोटांत घ्यावींत.

ओटीमध्यें रक्ताधिक्य झाल्यामुळें होणारा प्रदरः—ज्या स्त्रियांच्या ओटीच्या भागांत रक्ताधिक्य अधिक झालें असेल अशा स्त्रियांमध्यें प्रदराचा विकार नेहमीं आढळून येत नाहीं, पाळीच्यावेळीं व पाळीच्यापूर्वी दुखावा उत्पन्न होऊन प्रदर व रक्तस्राव सुरू होतो. या विकाराला फार वेळ उभें रहाणें, रजोविकार दाबणें अतृप्त संभोगेच्छा हीं साधारणपणें कारणें आढळून येतात.

चिकित्साः—फार वेळ उभें राहूं नये. रोगाची माहिती विचारून घ्यावी. मनो-विकार प्रक्षुब्ध झाले असल्यास लग्न करून देणें चांगलें, बिछान्यांत पडून रहावें. मलावरोध दूर करावा. भूक व झोंप लागण्याचें औषध घ्यावें. ह्या विकारांकडे दुर्लक्ष केलें तर प्रदराच्या बरोबर दुष्टव्रण, गुल्म हे विकार होण्याचा जास्त संभव असतो. अविवाहीत कुमारिकेमध्यें हा विकार बरेच दिवस असल्यास आंतल्या भागामध्यें कांहींतरी वाढत आहे कीं काय हें तपासून त्याप्रमाणें इलाज केल्यानें हा विकार कमी होतो.

# आजच्या स्त्रियांचें आरोग्य

विवाहित स्त्रियांमधील प्रदरः—विवाहीत स्त्रियांमधील असणारा प्रदर याचा खोल विचार केला पाहिजे. ह्या स्रावाचा गर्भाशय, गर्भाशयांचें मूख, योनिदाह या सर्वांशीं संबंध असतो. अतिसंभोगामुळें हा विकार होतो. याची वेळींच काळजी घेतली नाहीं, तर पांडुरोग, क्षय यांसारखे विकार होतात. अलीकडे ह्या विकारांचा प्रादुर्भाव जास्त झालेला आढळून येतो. हा विकार बरा होण्याला आंतून व बाहेरून इलाज केले असतां लवकर कमी होतो. प्रदर हें लक्षण आहे. ( symptom ) व जननेंद्रियाला सूज आल्यामुळें हा विकार होतो. स्थानपरत्वें याचीं चिन्हें काय होतात याचा विचार करूं. गरोदरपणांत योनिमुखांच्या दाहांमुळें हा विकार बरेच दिवस चालू असलेला आढळून येत असून योनीच्या भागांत मृदुपणा, जाडपणा जास्त येतो. प्रसुतिनंतर गर्भाशय व योनीचा भाग हा पूर्वस्थितीवर आला नाहीं, त्यामध्यें वैगुण्य राहिलें, प्रसूतीच्या वेळीं योनिमार्गाला इजा, त्वचात्रुद्धी वगैरे गोष्टी झाल्या, तर ते भाग पूर्वस्थितीवर येण्यास अडचण पडते. ह्या भागाचें पूर्णपणें प्रसरण गर्भारपणांत झालेलें असतें. बाळंतपणानंतर त्यांचें पूर्णपणें संकोचन झालें नाहीं तर हे भाग ढिले रहातात व त्यामुळें त्यामधील असणाऱ्या ग्रंथीचा स्राव फार होत असतो. बाळंतपणानंतर १-२ महिन्यांनीं अशा विकारांची बाई आली व तिची अंतरपरीक्षा केली तर आंतील भागांतून लाल, पूर-रक्त त्यांतून वहात आहे असें आढळून येतें. काहीं दिवसांनंतर ही स्थिती पालटून पांढरा पिंवळसर स्राव सुरू राहून त्याचे कपड्यांवर डाग पडतात. बाळंतपणांत योनिमुखाला इजा झालेली असली म्हणजे त्याचा संबंध गर्भाशयाच्या ग्रीवेला पोंचतो व त्यामुळें दोन्ही ठिकाणांहून स्राव होत असतो. दोन्ही स्रावांची तुलना केली तर योनिमार्गांतूनच स्राव फार होत असतो. पतीला प्रमेहाचा विकार असेल तर स्रावामध्यें खालील प्रमाणें फरक होतो. हा स्राव घट्ट चिकट, पिंवळा व पुष्कळ प्रमाणांत असून खालील भाग मऊ व लाल झालेला असतो. ह्या स्रावांची परीक्षा केली असतां तो कोणत्या जातीचा आहे हें समजून येतें.

योनि मुखांमध्यें दुखावा होणें:—योनिमार्गांत दुखावा उत्पन्न होऊन आंतल्या बाजूला सूज आलेली आहे असें रोग्याला वाटतें. संभोगाच्या वेळीं हा दुखावा वाढतो. स्राव कमी असेल तर दुखावा कमी असतो. ज्या स्त्रियांना लग्न झाल्यानंतर बरींच वर्षें मुलें झालेलीं नाहींत त्यांच्यामध्यें ही स्थिती आढळते.

पुळयामुळें होणारा योनीमुखाचा दाहः—( Granular Vaginitis ) यांमध्यें गोंवरा प्रमाणें आंतल्या भागांमध्यें बारीक पुळ्या येतात. दुसरा प्रकार देवी प्रमाणें फोड येतात त्याला Pustular Vaginitis म्हणतात. ह्या स्रावांची योग्यवेळीं काळजी बाळगली नाहीं तर आंतल्या बाजूला लहान लहान मोड तयार होतात व ( Polypus ) मोडांमुळें योनी मार्गांत आग व त्रास होत असतो.

गर्भाशयाच्या अंतःत्वचेचा दाहः—बाळंतपणा, बरींच वर्षे पाळी बंद असणें, गर्भाशय स्थानच्युत होणें, मलावरोध, रक्तस्राव चालु असणें, शारीरिक श्रम करणें, संभोग, ताप या कारणांमुळें गर्भाशयाच्या आंतल्या बाजूचा दाह होऊन स्राव सुरू होतो.

प्रदर ( वृद्ध बायकांमधील )—वृद्ध स्त्रियांमध्यें इंद्रियें कमजोर व त्यांची शक्ति कमी झाल्यामुळें प्रदर पुष्कळ प्रमाणांत व दूषित असतो. हा स्राव योनी किंवा गर्भाशय किंवा योनी व गर्भाशय या दोन्हीं मधून होतो. योनिदर्शक यंत्र आंत ठेवलें असतां स्राव कोठून येतो तें समजून येतें.

शारीरिक लक्षणें:—योनिदर्शक यंत्रानें पाहिलें असतां योनीचा भाग गुळगुळीत व त्यांतून रक्त व पू येत आहे असें आढळून येतें. योनीमधून फक्त स्राव येत असेल तर ग्रीवा निरोगी असते. पू गर्भाशयाच्या तोंडांत आंत असतो व ग्रीवा लाल झालेली असते. गर्भाशयामधून पू येत असेल तर तो भाग स्वच्छ केल्यानंतर गर्भाशयांतूनच पू येत आहे असें आढळून येतें.

ग्राहीः—स्तंभक औषधें योनीद्वारांत ठेवावीं व त्यामुळें स्राव कमी होतो असें दिसून आल्यास तो गर्भाशयांतूनच येत आहे असें समजावें.

वृद्धावस्थेंतील योनिमार्गाचा दाहः—( Senile Vaginitis ) पूप्रमेह, मूत्राघात किंवा मोड आल्यामुळें हा दाह होतो.

चिकित्साः—ह्यामध्यें गर्भाशयांचें परिवर्तन झाल्यामुळें व पेशी ही सडत असल्यामुळें विकार बरा होणें कठिण असतें. वृद्धावस्थेंतील गर्भाशयाच्या अंतरावणाचा दाह ( endometritis ) या विकारांत पू व रक्त फार वहाणें, दुखाव्यामुळें रात्रीं झोंप न येणें, अशक्तता वाढत जाणें, हीं लक्षणें होतात. विटाळ बंद झाल्यानंतर हा विकार होतो. पुढें दुष्ट व्रण ( cancer ) होण्यांचा जास्त संभव असतो. स्रावांवरून प्रथमतः हा दुष्ट व्रण आहे किंवा काय हें ठरविणें कठीण असतें; कित्येक वेळां शस्त्रक्रिया करून गर्भाशय काढणें भाग पडतें.

# भाग दुसरा

## गरोदरावस्था

# प्रकरण १ लें

## प्रास्ताविक सूचना

विवाहीत स्त्रियांमध्यें गरोदरपणाचा काळ अत्यंत महत्त्वाचा आहे. या कालां मध्यें ज्याप्रमाणें वागणूक टेवावी त्याप्रमाणें गर्भावर परिणार होतो व बाळंतपण सुखकर होणें त्यावर अवलंबून असतें. पुष्कळ स्त्रियांना याचा अनुभव नसल्यामुळें त्या मानसिक दृष्टया दुर्बल बनतात. गर्भ सुदृढ होणें हें पतिपत्नीच्या शुद्ध वीर्य-बलावर अवलंबून असतें. गर्भस्थापना होण्याच्या वेळीं परस्परांची मानसिक, व शारीरिक स्थिती ज्या प्रकारची असेल त्याप्रमाणें गर्भावर त्याचा परिणाम होतो. आपण नेहमीं एखादें सुदृढ मुल पहातों, परंतु त्याच्या चेहऱ्यावर तेज दिसत नाहीं, आहे मांसाचा गोळा—साधारण आवाज झाला तर तें मुल भितें तें पुढें कोणत्या प्रकारें पराक्रमी होणार हें उघड दिसतें. संभोगकाळीं परस्परांचें मन सुप्रसन्न, काळजीविरहीत असेल तरच त्याचा इष्ट परिणाम संततीवर होत असतो. आर्यवैद्यक किंवा पाश्चात्यवैद्यक, तसेंच आपले धर्मशास्त्रकार, यांनीं गरोदरावस्थेंत प्रत्येक स्त्रीला ज्या इच्छा होतात त्या पूर्ण करण्याचा घरांतील मंडळीनें प्रयत्न केला पाहिजे, तिचें मन सुप्रसन्न राहील, तिच्या मनांत भिती उत्पन्न होणार नाहीं, विचार वाईट येणार नाहींत अशा प्रकारची वागणूक तिनें स्वतः व कुटुंबांतील प्रत्येक मंडळीनें बाळगली पाहिजे असें सांगितलें आहे. आपल्यामध्यें निरनिराळ्या महिन्यांत डोहोळे जेवण गरोदर स्त्रीला देण्याची चाल पडलेली आहे; त्याचप्रमाणें, पुंसवन, वगैरे संस्कार यांचा हेतु काय, ते रूढ कां झाले, याचा विचार करतां त्यांचा उद्देश गर्भवंतीला व गर्भाला उत्तम तऱ्हेचे संस्कार होऊन मन प्रसन्न रहावें हाच दिसतो. ह्या संस्कारांचें महत्त्व अलीकडे वाटेनासें झाल्यामुळें, व पूर्वजांचा हेतु काय याचा विचार करण्याची आमची

संवय नष्ट झाल्यामुळें, नूतन पिढी कोणत्या प्रकारची होत आहे हें आपल्याला दिसतच आहे; परंतु त्याबरोबरच हल्लींची परिस्थिती विसरून चालणार नाहीं. परकीय सत्तेच्या जोखडांखालीं, परावलंबित्व व रहाणी दिवसेंदिवस वाढत असल्यामुळें शेंकडा ५ लोक सोडून बाकीच्यांना ह्या गोष्टी करणें दुर्घट झालें आहे. तात्पर्य एवढेंच कीं आपले पूर्वज, व आपल्या धर्मानें घालून दिलेले षोडश संस्कार ह्यांचा धार्मिक अगर वैद्यकीय दृष्टया विचार केला तर भावी पिढी सुदृढ, आनंदी, चिरायु व्हावी हाच हेतु होय हें सांगण्याची जरुरी नाहीं. गर्भवतीला नानातऱ्हेचीं फळफळावळ, पालेभाज्या, मधुर पक्वान्नें, हीं देण्यांत यावींत. उत्तम, स्वच्छ, सुगंधयुक्त वस्त्रें वापरावींत. शुद्ध हवा घ्यावी, फिरावयास जावें, ह्या व्यायामाची खेडेगांवांतील स्त्रियांना जरुरी नसते, कारण शारीरिक व्यायाम स्वाभाविक त्यांच्या कडून भरपूर होत असतो. शहरांसारखी, घरेंही जवळ जवळ नसल्यामुळें शुद्ध हवा मुबलक मिळत असते.

अभद्र, वाचाळ अशा बोलणाऱ्या स्त्रियांची संगत टाळावी, फार काय त्यांना घरांत येण्याची बंदी करावी. डोहोळ्यांवरून सुज्ञ स्त्रीला चांगलें अगर वाईट समजत असतें परंतु त्याचा विचार करूं नये. नेहमीं आनंदी असावें. स्वच्छ कपडा वापरावा. आपल्या इष्ट देवतेचें नेहमीं स्मरण ठेवावें. वडील माणसाचा नेहमीं मान ठेवावा. शिळें अन्न खाऊं नये. शरिरास फार श्रम होतील अशा प्रकारें काम करूं नये. जागरण, भितीदायक पदार्थांकडे पाहाणें, वांकडे तिकडे हातपाय करून बसणें, मळमूत्र कोंडणें, धावणें, नाचणें, मशिनवर शिवण काम करणें, घाईघाईनें जिन्यानें उतरणें ह्या गोष्टी वर्ज्य कराव्यात. पहिल्या ५ ते ६ महिनेपर्यंत फार जपलें पाहिजे. कारण यावेळींच गर्भस्राव अगर गर्भपात होण्याची भिती असते. चहा, कॉफी वगैरे फार पिऊं नये. त्याचप्रमाणें, तिखट, मसालेदार पदार्थ फार खाऊं नयेत. प्रकृतींत अस्वास्थ्य वाटलें तर हलगर्जीपणा न करतां ताबडतोब डॉक्टरला दाखवावें. स्वस्थ बसून राहूं नये. कांहींतरी काम करीत असावें. मात्र तें काम थकवा येईपर्यंत करूं नये. कामामुळें, सर्व स्नायू जोरदार बनतात व बाळंतपणाच्या वेळीं त्रास होत नाहीं. ज्या स्त्रिया पडून राहातात त्यांना त्रास झाल्याशिवाय रहात नाहीं.

गरोदरपणांत स्वभावांत फरक होत असतो. चिडखोर, रागीट, मंद, उदास अशा प्रकारची मनोवृत्ती बनते. तरी यावेळीं न रागावतां सौम्य शब्दानें मन वळवलें पाहिजे. **गरोदरपणांत औषध घेतां कामा नये** अशा प्रकारची दृढभावना झालेली पुष्कळ स्त्रियांमध्यें आढळून येते. फार काय अशा स्त्रिया डाक्टरकडे आल्यास औषध कडक देऊं नका, गरोदर आहे, असें वारंवार बजावून सांगत असतात, जसें काय या औषध देणाराला जबाबदारीची जाणीवच नसते असें त्यांना वाटत असतें. गरोदरपणांत कांहीं स्त्रियांमध्यें बारीक कडकी येत असते व हा ताप नव्हे असें मानून हलगर्जीपणा होत असतो. तसेंच कित्येकींना श्वेतप्रदरहि चालू असतो. पण गर्भारपणामध्यें असेंच होतें अशा वेड्या समजुतीनें औषध घेण्याची टाळाटाळ होते व त्याचा परिणाम अखेर बाळंतरोगांत होतो. याकरितां ९ महिन्यापर्यंत बारकाईनें स्वतःच्या प्रकृतिकडे निदान गर्भा-करितां तरी अवश्य लक्ष दिलें पाहिजे.

वरील एकंदर विषयाचें सविस्तर व सोपपत्तिक विवेचन प्रकरणशः पुढें केलेलें आहे. प्रथमतः गर्भिणीचीं लक्षणें कोणकोणतीं असतात व गर्भधारणा झाल्याची खात्री कशी करून घ्यावयाची त्याबद्दलचा विचार करूं.

# प्रकरण २ रें.

## गरोदरपणा व त्याचीं लक्षणें.

स्त्रियांना दरमहा २८ दिवसांनीं जो मासिक विटाळ येतो त्याबद्दलचें विवरण मागें केलें आहेच. "**मासेनोपचितं काले धमनीभ्यां तदार्तवं । ईषद्रक्तं विवर्णंच वायुर्योनि मुखं नयेत् ॥**" म्हणजे दरमहा आर्तवाचा संचय होऊन तें वायूमुळें रोहिणी मार्गानें योनींतून स्रवतें. त्यास दरमहाची पाळी असें व्यवहारांत म्हटलें जातें. हल्लीं नवीन पाश्चात्य शोधावरून असें निश्चित झालें आहे कीं, स्त्रीच्या अंडाशयांतून दरमहा एक अंडें सुटतें व त्याबरोबर रक्तस्राव होतो. पूर्वीच्या पाश्चात्य डॉक्टरांची अशी कल्पना होती कीं, पुरुषाशीं संबंध झाल्यावर किंवा गर्भ राहिल्यावर हें अंडें सुटतें, परंतु मॉसिअर रॅसि बॉर्स्कि यांनीं असें सिद्ध करून दाखविलें आहे कीं, स्त्रीपुरुषांच्या मैथुनाशीं अंडाशयांतून अंडें सुटण्याचा कांहीं संबंध नाहीं, हें अंडें गर्भाशयाच्या खोलगट जागेंत गेल्यावर आर्तवस्राव होतो; परंतु मैथुनांतीं पतन पावलेल्या वीर्याशीं जर या अंड्याचा मध्यंतरी संयोग झाला तर गर्भधारणा होते, अंडाशय दोन असतात व ते बदामाच्या आकाराचे असून गर्भाशयाच्या दोन्ही बाजूंस स्थिर असतात. आणि ते गर्भाशयास दोन नळयांनीं जोडलेले असतात. या नळया सुमारें चार इंच लांबीच्या असतात. या नळया खालीं अंतरभागीं पोंचेपर्यंत अंड्याची हालचाल होते व गर्भ राहिला नसेल तर अंडें आर्तवस्रावाबरोबर दरमहा गर्भाशयांतून बाहेर पडतें, हें अंडें इतकें सूक्ष्म असतें कीं, तें सूक्ष्म यंत्रावांचून नुसत्या डोळयांनीं दिसावयाचें नाहीं. गर्भ कोणत्या दिवशीं व वेळीं राहिला हें निश्चयात्मक रीत्या समजण्यास सुलभ व उघड मार्ग नसतो. तथापि गर्भधारणेच्या वेळीं स्त्रीला जीं लक्षणें होतात त्यावरून गर्भधारणेचें अनुमान निघतें. ज्यावेळीं गर्भस्थापन होतो त्यावेळीं स्त्रीला श्रम वाटतात, थकवा–ग्लानि येते, तहान लागते, मांड्या थकतात, उठल्यानंतर शुक्रशोणित बाहेर येत नाहीं व योनि स्फुरण पावते यावरून गर्भधारणेचें साधारण अनुमान निघतें तथापि कालांतरानें होणाऱ्या चिन्हानींच त्याबद्दलची खात्री होत असते.

सकाळीं झोंपून उठल्यानंतर बहुतेक गर्भिणीस मळमळ होऊन वांति होते. व त्यामुळें त्या आजारी होतात. कित्येकींना हा विकार गर्भधारणेनंतर थोड्या

आठवड्यांनीं उद्भवतो तर कित्येकींना गर्भधारणा होतांच सुरू होतो आणि कित्येकींचा प्रसूतीपर्यंतहि चालू रहातो. गर्भाशय व उदर यांमध्यें जो संबंध आहे त्यामुळें हा विकार उद्भवतो. पोटांत जे विकार होतात त्यामध्यें आणि या आजारांत एवढेंच अंतर असतें कीं, गर्भिणीची मळमळ थांबली कीं तिला लगेच बरें वाटतें. केवळ मळमळीवरून अगर वांतीवरून गरोदरपणा निश्चित ठरवितां येणार नाहीं; पण ती कोणत्या वेळीं कोणत्या प्रकारची होते आणि इतर चिन्हें कशा प्रकारचीं होतात याचा विचार करून मग गर्भधारणेचें निदान ठरविण्याचें आहे.

आपल्या आयुर्वेदांत स्त्रीच्या गरोदरावस्थेचीं ठोकळ चिन्हें पुढीलप्रमाणें सांगितलीं आहेत—स्तनाचीं बोंडें काळीं होणें, अंगावर रोमांच उठणें, डोळ्यां-वर झांपड येणें, अकारण उलटी होणें, तोंडास पाणी सुटणें, मनाला सुवासहि सहन न होणें, व शरीर कृश होणें अशी स्थिती दिसूं लागली म्हणजे ती स्त्री गरोदर आहे असें मानावें.

स्त्रीला गर्भ राहिल्याचें पहिलें मोठें चिन्ह तिचा मासिक विटाळ बंद होणें हा होय. सर्व चिन्हाच्या अगोदर हें चिन्ह दृष्टोत्पत्तीस येतें. हें जरी खरें असलें तरी तेवढयावरून तिच्या गर्भधारणेची निश्चितता ठरवितां यावयाची नाहीं. गरोदरपणांतहि कांहीं महिने कित्येक स्त्रियांना रजोदर्शन होत असतें, किंवा क्षय, पंडु, रोगांनीं ग्रासलेल्या, ज्यांच्या अंगावर तान्हें मूल पीत आहे अशा किंवा ज्यांच्या मनावर भयंकर आघात होऊन ज्या चिंताग्रस्त झाल्या असतील अशा स्त्रियांचें मासिक रजोदर्शन बंद होतें; तेव्हां अशा स्त्रियांच्या बाबतींत गर्भधारणेची कल्पना करणें युक्त होणार नाहीं. शिवाय या मासिक विटाळाच्या बाबतींत कित्येक प्रसंगीं असेंहि दृष्टोत्पत्तीस येतें कीं, स्त्री प्रसूत झाल्यानंतर तिला पुन्हां रजोदर्शन न होतांहि ती गरोदर रहाते. एवंच मासिक विटाळाच्या बाबतींत गर्भावस्थेचा खात्रीचा प्रश्न सोडविण्याचा झाल्यास तो जी स्त्री जात्याच निरोगी, धडधाकट असून जिला दरमहा बिनचूक ठराविक वेळीं रजोदर्शन होतें तिची जर ठराविक पाळी चुकली तरच तिला गर्भधारणा झाली असें मानतां येईल.

( ३ ) स्तनामध्यें होणारा फरक—गर्भधारणेनंतर स्तनामध्यें बरेच फेरफार दिसून येतात. ते घट्ट व मोठे होतात; स्तनांत सणसणूं लागतें, टोंचल्याप्रमाणें

वेदना होतात. स्पर्श केला असतां ते गांठूळ व टणक लागतात. स्तनाचीं बोंडें उंच होऊन त्यांच्या भोंवतालच्या वर्तुळाचा रंग अधिकाधिक काळा होत जातो व हीं वर्तुळें नेहमींपेक्षां बरींच वाढलेलीं असतात. तसेंच या काळ्या वर्तुळावर लहान लहान पुटकुळ्या दिसतात, त्यांचीं संख्या अदमासें बारा ते वीसपर्यंत असते. हीं वर्तुळें दिवसेंदिवस वाढत जाऊन त्यांचा घेर दीड इंचापर्यंत होतो. त्या भागाची कातडी ओलसर असते. जसजसे गर्भाला जास्त महिने लोटत जातात तसतसे काळ्या वर्तुळांच्या बाहेरच्या भागावर सफेत डाग दिसूं लागतात. स्तनावरील शिरा स्पष्ट दिसतात व स्तनाग्रें दाबून पाहिल्यास त्यांतून चिकट पदार्थ निघतो. स्तनाचा फुगीरपणा अगर वृद्धि यावरूनच केवळ गर्भारपणा ठरवितां येणार नाहीं. ज्यांचा विटाळ थांबला अशांनाहि अशींच चिन्हें होतात. शिवाय गर्भारपणाशिवाय अन्य कारणांनीं जर स्तन फुगीर झाले तर तो फुगीरपणा अल्पावधीचा असतो. तसेंच स्तनाग्राभोंवता-लची वर्तुळेंहि कारणपरत्वें अधिक काळीं होतात. तथापि तो काळेपणा गर्भवृद्धी-मुळें होणाऱ्या काळेपणा इतका काळाभोर नसतो. गर्भाशयांत गर्भ नसतांहि स्तनांत क्वचित् दूध आढळतें एवढेंच नव्हे लहान मुलींच्या स्तनांत दूध अस-ल्याचें फार काय, पण कित्येक पुरुषांच्या स्तनांतहि दूध सांपडत असल्याचें नजरेस येतें. गर्भारपणाची पहिलीच खेप असल्यास स्तनांतील व स्तनाच्या बोंडींतील हे फेरफार महत्त्वाचे असतात. व त्यावरून आणि इतर चिन्हांवरून स्त्रीचें गरो-दरावस्थेचें निदान निश्चित करतां येतें.

( ४ ) गर्भाचें चलनवलनः—गर्भधारणेनंतर कांहीं काळ गेल्यावर गर्भाशयांत गर्भ हालचाल करूं लागतो; ही हालचाल होऊं लागेपर्यंत गर्भास जीव नसतो अशी लौकीक समजूत आहे पण ती चुकीची असली पाहिजे. गर्भ राहिल्या दिवसापासून मुलास जीव असतो, पण जसजसा गर्भ वाढत जाऊन ओटीच्या आंतल्या भागाशीं सलग्न होत जातो तसतशी त्यांच्या हालचालीमुळें स्त्री अगदीं म्लान होते व वायूचे झटके यावे तशीं तिला चिन्हें होतात. पोटांतील मूल फार अशक्त असल्यास गर्भिणीस मूल मृत झालें कीं काय या विषयीं शंका उत्पन्न होते.

( ५ ) ओटीचें लक्षण—गरोदरावस्थेंतील पहिल्या १।२ महिन्यांत गरोदर

स्त्रीची ओटी लक्षांत घेण्याजोगी मोठी होत नाहीं. केव्हां केव्हां असेंहि नजरेस येतें कीं, नेहमीच्या पोटाच्या आकारापेक्षांहि पोटांत गर्भ असतांनाहि पोटाचा आकार लहान होतो. याचें कारण गर्भ जड असल्यामुळें तो वर न येतां खालच्या पोटांत उतरतो, तथापि तिसऱ्या महिन्यानंतर खालच्या अंगाला पोट वर्तुळाकार वर आलेलें दिसूं लागतें. गर्भ वाढत जाऊन शेवटीं ओटीची जागा व्यापून टाकतो. जसजसा तो वर चढत जातो, तसतशी बेंबीहि वर सरत जाते तरी पण ती भोंवतालच्या कातडी बरोबर समप्रमाणांत असते. गरोदरावस्थेच्या अखेरीस मात्र पोटाची पूर्ण वाढ झाल्यामुळें ती वर दिसूं लागते. गर्भ वाढत असल्यामुळें पोटाची कातडी तापते आणि त्यामुळें पोटावर चकचकीत रुपेरी रेषा दिसूं लागतात. ओटीची वृद्धी होण्यास आणखीहि निरनिराळीं कारणें असल्यामुळें तिच्या वृद्धी वरून तें गरोदरावस्थेचें द्योतक चिन्ह असेंच केवळ मानतां येणार नाहीं. जलोदरानें पोटांत पाणी वाढून ओटी मोठी होते, कातडीच्या आंत गॅस ( एक प्रकारचा वायु ) रूप पदार्थहि सांठवतो, जलोदर झाला असतां रोगी ज्या बाजूवर पडेल त्या बाजूस त्याच्या पोटास फुगीपणा येईल, तसेंच जलोदर रोगी उभा असतां त्याच्या पोटाच्या खालच्या अंगास विशेष फुगवटी येईल; जलोदर रोग्याच्या पोटास स्पर्श केला असतां तें हातास मऊमऊ लागतें पण गर्भामुळें पोट मोठें झालें असेल तर त्यास स्पर्श केला म्हणजे तें कठीण, ताठ, लवचिक लागतें. वयाच्या मानानें रजोदर्शन बंद होण्याच्या सुमारास स्त्रीच्या खालच्या पोटांत चरबीचा संचय होत असतो. व असें झालें म्हणजे कित्येक बायका आपणास गरोदरावस्था प्राप्त झाली अशी समजूत करून घेऊन फसतात. ज्या कधींहि गरोदर राहिलेल्या नाहींत त्यांच्या ठिकाणीं हा प्रकार विशेष दिसून येतो, पण ज्या वयांत असा प्रकार घडतो तें वय, व गर्भधारणा सूचक इतर कारणाचा अभाव हीं विचारांत धेतली म्हणजे चुकीची समजूत होणार नाहीं.

( ६ ) डोहाळे—गरोदरपणीं अभक्ष्य निसर्गनिषिद्ध, अयोग्य असे पदार्थ ( कोळसा, माती, राख ) खाण्याची इच्छा झाली म्हणजे त्यास डोहाळे लागले असें म्हणण्याचा प्रघात आहे; शिवाय जसे डोहाळे लागतात तसें मूल निपजतें अशी आपल्या लोकांत एक भोळी समजूत आहे. आपल्या वैद्यक शास्त्रांत असें

सांगितलें आहे कीं, जर गरोदर स्त्रीचे डोहाळे पूर्ण केले नाहींत तर ती कुबडा, थोटा, षंढ, खुजा असा व्यंग पुत्र प्रसवते; यासाठीं गरोदर स्त्रीची ज्या ज्या पदार्थावर इच्छा जाईल अगर जें जें ती इच्छीत असेल तें तें तिला देऊन तिची इच्छा पूर्ण करावी म्हणजे, तिला दीर्घायुषी व पराक्रमी अपत्य होईल. डॉ. ब्लाक म्हणतात. ज्या स्त्रीला डोहाळे लागले असतील तिनें आपल्या इच्छेस आळा घालण्याची खबरदारी राखली पाहिजे. तिनें आपलें मन दुसऱ्या कशावर तरी गुंतवावें.

( ७ ) इतर सूचक लक्षणें—गर्भधारणा झाल्याचीं आणखीहि सूचक लक्षणें होत असतात. तोंडास चूळ सुटणें, छातींत धडधडणें, दांत दुखणें, झोंप फार येणें, छातींत जळजळणें, सुस्ती येणें अशीं लक्षणें दिसून येतात, पण तीं सर्व सामान्य व व्यापक असल्यामुळें व पूर्वी सांगितल्या कारणाइतकीं अगर लक्षणाइतकीं हीं महत्त्वाचीं नसल्यामुळें त्यांचें विशेष विवरण करणें इष्ट वाटत नाहीं. वर सांगितलेल्या महत्त्वाच्या लक्षणांप्रमाणेंच याहि चिन्हानीं गरोदरावस्थेचें खरें निदान होण्याजोगें नसल्यामुळें उपरोक्त किरकोळ लक्षणास महत्त्व देतां येत नाहीं पण या किरकोळ लक्षणाचा व पूर्वी सांगितलेल्या महत्त्वाच्या लक्षणांचा एकवट विचार केला असतां स्त्री गरोदर आहे किंवा नाहीं हें खात्रीनें ठरवितां येईल.

( ८ ) मनस्थिति— स्त्रीला गर्भ राहण्यापूर्वी जी अगदीं शांत व प्रेमळ असते, ती गरोदर राहिल्यावर रागीट, चिडखोर व पिरपिऱ्या स्वभावाची होते. शिवाय कित्येक स्त्रीच्या ठिकाणीं याच्या उलटहि प्रकार दिसून येतो. जी पूर्वीची भांडखोर, चिडखोर, दुर्मुखलेली, त्रासदायक असते ती गरोदर राहिल्यावर गोड व मनामिळाऊ स्वभावाची बनते.

( ९ ) इतर चिन्हें व लक्षणें—गरोदर स्त्रीच्या पोटांत वाढणारा गर्भ तिसरे महिन्यापासून पुढें स्त्रीचे उदरावरून हात फिरवून पाहिल्यास वाढत असलेला गर्भाशय व त्यांतील गर्भाचे भाग यांचें सहजीं ज्ञान होतें. पोटांत वाढणारा गर्भाचा गोळा घट्ट आहे कीं, मऊ आहे, त्याचप्रमाणें त्या गर्भाचे हात पाय डोकें यांचें स्पर्शानें ज्ञान करून घेतां येतें; व गर्भाची होणारी हालचाल स्पर्शानें सहज समजते, बोटांनीं पोट व गर्भाशय दाबून व पोटावर दाबून ठेवलेल्या बोटावर टिचकी मारून पाहिल्यास वात असेल तर पोकळ आवाज व गर्भ किंवा इतर गोळा ( गुल्म ) असेल तर " धब्ब " असा जड आवाज येतो व त्यावरून पोटांत भासणारा गोळा जड कीं वाताचा आहे याची कल्पना होते. पोटांत वात वाढून कित्येकदां

स्त्रियांस गर्भ राहिल्याचा भास होतो. या गोष्टीचें निराकरण या आवाजावरून करतां येतें. तसेंच कानास नळी लावून गर्भवती स्त्रीचे पोटावर ठेवल्यास पुढील प्रमाणें माहिती समजून येतें. ( १ ) सोळापासून अठरा आठवड्यानंतर स्त्रीचे उदरावर कानांतील नळी लावून ऐकल्यास त्यांतून कांहीं विवक्षित जागीं गर्भाच्या हृदयाचे ठोके ऐकू येतात. या ठोक्याचें प्रमाण मिनिटास सुमारें १२० जवळ असतें. घड्याळाच्या ठोक्याप्रमाणें गर्भाच्या हृदयाचे ठोके जलद अगर " टिक, टिक " असे ऐकू येतात, मात्र गर्भाशयाचें आकुंचन झाल्यास अगर नाळेवर दाब बसल्यास वरील ठोक्याचें प्रमाण कमी होतें व गर्भाशयाचें प्रसरण होतांच व नाळेवरील दाब कमी होतांच पूर्ववत् १२० ठोके होतात. गर्भवती स्त्रीस ताप वगैरे असल्यास गर्भाच्या हृदयाचे ठोके १२० पेक्षांहि जास्त होतात. गर्भाच्या हृदयाचे ठोके ऐकल्यास गर्भारपणाची पूर्ण खात्री देतां येते. ( २ ) गर्भारपणीं गर्भाशय मोठा होतो व त्यामुळें त्यास रक्ताचा पुरवठा करणाऱ्या रक्तनलिकाहि मोठ्या होतात. व या फुगीर शिरांतून वाहत असणाऱ्या रक्ताच्या प्रवाहाचा एक विशिष्ट तऱ्हेचा आवाज " फुसूसूसू " असा निघतो. हा आवाज कानास नळी लावून गर्भवतीचे उदरावर ठेवून ऐकल्यास स्पष्ट ऐकू येतो. मात्र हा आवाज वाढलेल्या गर्भाशयावर सर्वत्र ऐकू न येतां विशिष्ट जागींच ऐकू येतो. ( ३ ) गर्भवती स्त्रीचे हृदयांतील ठोके तिच्या वाढलेल्या उदरावर ऐकू येतात. ( ४ ) गर्भवतीचे श्वासोच्छ्वासांतून निघणाऱ्या ध्वनीचा नाद तिचे उदरावर ऐकू येतो. ( ५ ) गर्भाशयांत वाढत्या गर्भाची सारखी हालचाल होत असते. त्यापासून गर्भाशयांत असणाऱ्या पाण्यांत एकप्रकारची खळबळ होते व त्यापासून विशिष्ट तऱ्हेचा आवाज उत्पन्न होतो. हा आवाज गर्भवती स्त्रीचे उदरावर कान ठेवून अगर नळी लावून ऐकल्यास ऐकू येतो. ( ६ ) स्त्री गर्भवती असल्यास तिची योनी अगर योनिमुख यांतील अंतस्त्वचेचा गुलाबी रंग जाऊन त्यांत निळसर झांक मारते. याशिवाय गर्भाशय वाढत असतांना दरमहिन्यास वाढणाऱ्या आकाराबरोबर स्त्रीचें उदर वाढतें व त्याचा आकार बदलत जातो.

एकंदरींत वर वर्णन केलेल्या एकंदर लक्षणांचा व चिन्हांचा विचार केल्यास विटाळ बंद होणें, स्तनांत फरक होणें, प्रातर्वांति-मळमळ, मूत्राधिक्य, त्वचेंतील बदल, गर्भाचें चलन भासणें या शक्य व उदराची वाढ होणें, गर्भाशयाचें आकुंचन होणें या संभवनीय आणि गर्भाचे हृदयांतील ठोके ऐकू येणें, गर्भाच्या शरिराचे वेगळाले भाग हातांस लागणें, गर्भाची हालचाल होणें या खात्रीलायक लक्षणांवरून स्त्रीच्या गरोदरावस्थेची खात्री देतां येईल.

# प्रकरण ३ रें

## गर्भाची वाढ कशी होते ?

स्त्री बीज गोलक व पुरुष बीज गोलकाचा संयोग होऊन त्यापासून तयार झालेल्या गोलकाचा आकार टांचणीच्या बोंथट टोंकाएवढा होतो. व तो गर्भाशयास चिकटून बसतो आणि त्या जागीं गर्भाशयापासून गर्भांत बारीक रक्तवाहिन्या शिरतात. व तो भाग जाड मधमाशीच्या पोळ्यासारखा घट्ट होतो त्यास वार म्हणतात. या वारेच्या मोकळ्या भागापासून निघणाऱ्या रक्तवाहिन्या लांबट होऊन त्या वळलेल्या दोरीप्रमाणें एकमेकांभोंवतीं गुंडाळून त्याची एक लांब दोरी तयार होऊन एका टोकांस गर्भ चिकटून लोंबत असलेला दिसतो. या गर्भाचे मधोमध लागलेल्या दोरीस नाळ म्हणतात, नंतर गर्भाच्या दोन्हीं बाजूस टोंकें वाढूं लागतात व एका बाजूस डोकें व एका बाजूस पायाचा भाग असे दोन भाग दिसूं लागतात. गर्भाचे अंगीं जे आनुवांशिक गुण उतरतात त्याचा उद्भव स्त्रीबीज गोलक पुरुष बीज मोलक यांच्या संयोगाचे वेळीं होत असतो.

आतां गर्भस्थापनेनंतर गर्भाची वाढ कसकशी होते याचा विचार पाहूं—गर्भ स्थापना झाल्याच्या पहिल्या आठवड्यांत गर्भपिंडांची लांबी $\frac{१}{१२}$ इंच होते व दुसऱ्या आठवड्यापासून त्याची वाढ जोरानें होत असते. त्यास गर्भाशयांतील बारीक रक्तवाहिन्या चिकटलेल्या असल्यामुळें त्यांतून त्यास रक्ताचा व पोषक द्रव्यांचा पुरवठा होत असतो. व गर्भ एक महिन्याचा होण्याचे सुमारास त्याचा आकार कबुतराच्या लहानशा अंड्याएवढा होतो आणि त्यांत मुलाचें शरीर $\frac{१}{३}$ इंच लांबीचें असतें. दुसऱ्या महिन्यांत गर्भपिंड २॥ इंच होतो व मुलाची लांबी १। इंच असते. तीन महिने झाल्यावर गर्भपिंड ३॥ ते ४ इंच होऊन त्यांत मुलाचें शरीर ३ ते ३॥ इंच होतें याच वेळीं त्याच्या शरिरावरील जननेंद्रियें बीज स्थितींत दिसूं लागतात. तसेंच अस्थि बीजहि पण दिसूं लागतात. यावेळीं गर्भाचें वजन तीन औंस भरतें, चौथ्या महिन्याचे अखेर गर्भाची लांबी ५ इंच होऊन वजन ७॥ औंस होतें, यावेळीं गर्भाचा स्त्री पुरुष भेद समजून येतो व सूक्ष्म केंसहि पण दृग्गोचर होतात. पांचव्या महिन्यांत गर्भाची लांबी दहा इंच व वजन एक पौंड होतें. डोक्याचे केंस दिसतात व अंगावरील सूक्ष्म केसहि पण नजरेस येतात. सहा

महिन्याचे शेवटीं गर्भाची लांबी एक फूट व वजन २ ते २॥ पौंड होतें व गर्भाचे कपाळावर भुंवया व डोळ्याच्या पापण्या दिसूं लागतात व शरिरावर सुरकुत्या असतात. सातव्या महिन्याचे शेवटीं गर्भाची लांबी चौदा इंच व वजन तीन पौंड होतें. या वयांत मूल जन्मल्यास तें जगूं शकतें व त्याच्या रडण्याचा आवाज हलका असतो. आठ महिन्यांत तर गर्भाची लांबी १६ ते १८ इंच होऊन वजन ४ ते ४॥ पौंड असतें. शरिरांत मेद वाढून सुरकुत्या नाहींशा झालेल्या असतात. नवव्या महिन्याचे अखेर गर्भाची लांबी १८ इंच होऊन वजन ५ पौंड असतें. दहाव्या महिन्यांत मूल पूर्ण वाढीचें होऊन त्याची लांबी २०।२१ इंच व वजन ६।७ पौंड असतें व तें जन्मल्यानंतर मोठ्यानें रडूं लागून ३।४ तासांत त्यास लघवीस होतें व गुदद्वारांतून काळा चिकट पदार्थ बाहेर येतो.

याप्रमाणें गर्भस्थापनेपासून त्याची वाढ होते व ती वाढ चाळीस आठवड्यांनीं पूर्ण होते. या काळांत गर्भाचें-मुलाचें पोषण, मलमूत्र विसर्जन श्वासोच्छ्वास वगैरे सर्व मातृशरिरांतून वारेच्या मार्गानें होत असतें व म्हणूनच मुलाची वाढ चांगली होणें अथवा अशक्त-खुजट होणें तसेंच मूल सशक्त-अशक्त होणें हें मातेच्या आहार-विहार व मानसिक अवस्था, संवयी, शारीरिक आरोग्य यांवरच सर्वस्वीं अवलंबून असतें म्हणून गरोदरावस्थेंत गर्भिणीनें शरिराची-मनाची जोपासना करणें व आहार विहारांत पथ्य सांभाळणें अत्यंत जरूरीचें असतें. गर्भातील मुलाचें डोकें वजनदार असतें व तें गर्भाशयांत असतांना त्याचें डोकें खालीं व नितंब वर अशी स्थिती असते व म्हणूनच बहुतेक मूल डोक्याकडून जन्मास येतें. कधीं कधीं मुलाचा जन्म पायाकडून अथवा नितंबाकडून होतो व केव्हां केव्हां मूल आडवेंहि पण येतें. पण हे दोन्ही प्रकार अपवादासारखे मानावे लागतात. तसेंच कित्येक स्त्रियांना एकाच वेळीं २,३,४,५ पर्यंत मुलें झाल्याचीं उदाहरणें आहेत पण ते अपवाद मानणें भाग आहे. सर्वसाधारण एकच मूल होतें हाच नियम खरा आहे.

टीपः—गर्भधारणा कोणत्यावेळीं झाली व प्रसूति कोणत्यावेळीं होणार ह्या बद्दलची माहिती शेवटीं जोडलेल्या पत्रकांवरून समजून येईल.

# प्रकरण ४ थें

## गर्भिणीची वागणूक

गर्भिणीची वागणूक कशी असावी याबद्दल आपल्या आर्यवैद्यकांत पुढील-प्रमाणें सांगितलें आहे " गर्भिणीनें श्रमाचें काम, मैथुन, ज्यानें तृप्ति होत नाहीं अशा पदार्थांचें सेवन, ज्यास्त खाणें, रात्रीं जागरण, शोक घोडा-गाडी यांवरून प्रवास, भीति वाटणाऱ्या गोष्टी, वांकडे तिकडे पाय पसरून बसणें, मलमूत्रावरोध एवढया गोष्टी वर्ज्य कराव्या. गर्भिणीनें गर्भ राहिल्या दिवसापासून आनंदांत असावें, तसेंच पवित्र असावें, अलंकार धारण करावे, शुभ्र वस्त्र परिधान करावें, मंगल दैवत, गुरु इत्यादिकांची भक्ति करावी, मलीन, विकारयुक्त, व हीन गात्रांस स्पर्श करूं नये, मनाला उद्वेग देणाऱ्या गोष्टी ऐकूं नयेत, शुष्क, मलीन, शिळें, ओलें व आंबलेलें अन्न सेवन करूं नये. मनास उद्वेग वाटणाऱ्या जागीं जाऊं नये. तसेंच क्रोध येईल असें कर्म करूं नये. मोठ्यानें बोलूं नये.

गर्भिणीचा आहारः—डॉ. ब्लॅक् यांनीं आर्य वैद्यकांचेंच मत जमेस धरून या बाबतींत सविस्तर विवेचन केलेलें आहे. व तें विचारणीय व आचरणीय असल्यामुळें गर्भिणीनें त्याप्रमाणेंच वर्तन ठेवणें सर्व प्रकारें हितावह होणार आहे. डॉ. ब्लॅक् म्हणतात गरोदरपणीं पोटांत जास्त अन्न जाईल तेवढें चांगलें असें बऱ्याच बायका म्हणतात. व त्या वेडया समजुतीनें ओ होइपर्यंत गर्भिणीला खाण्यास देतात. व यानुळें साहजिकच गर्भिणीच्या आरोग्यावर अनिष्ट परिणाम होतो. प्रथमपासून नेमस्त जेवणाची संवय असली म्हणजे गरोदरावस्थेंत नेहमींच्या क्रमांत फारसा फेरफार करावा लागत नाहीं. गर्भिणीनें गर्भारपणाच्या पूर्व मासांत हलकें, पाचक, पथ्यकर असें अन्न सेवन करावें; यावेळीं पोटांत अस्वस्थता उत्पन्न होते म्हणून मनास शिसारी येईल असे पदार्थ तिनें वर्ज करावे. जिभेचे कोड पुरविण्याकडे दुर्लक्ष करून साधा, पाचक पौष्टीक आहार घ्यावा. गर्भारपणाच्या आद्य मासांत नेहमीपेक्षां ज्यास्त आहाराची गरज नाहीं.

गर्भिणीच्या गर्भाशयांत वाढत असलेल्या गर्भाचें पोषण निव्वळ तिच्या रक्तांतून होतें व त्यामुळें वाढत्या गर्भशरिरांत तयार होणाऱ्या अस्थि, मांस, रक्त वगैरे पदार्थांतील मुख्य तत्त्वें क्षार ( calcium ) लोहक्षार ( Iron salts )

फॉस्फरस ( Phosphorus ) वगैरे क्षारांची उत्पत्ती मूळ मातेच्या शरिरांतील तयार असलेल्या वरील क्षारांपासून असते, व म्हणून गरोदरपणीं तिचे शरिरांत व रक्तांत असणारे क्षार व वरील पदार्थ गर्भाचे वाढींत खर्च होतात, व त्यामुळें तिला हे सर्व जिन्नस स्वतःचे शरिरांत अन्नांतून घ्यावे लागतात. म्हणजे हे सर्व जिन्नस ज्या पदार्थांत असतील अशा पदार्थांचा आहार तिनें घेतला पाहिजे. तेलकट, तिखट, मसालेदार, तळलेले असे पदार्थ साफ वर्ज करावे. गरोदरावस्थेंत शौचशुद्धी, घाम येणें, व लघवी साफ होणें या गोष्टींची फार आवश्यकता असते यासाठीं शरिरास हलकें वाटेल असा आहार तिला द्यावा. नेहमींची साधीं दोन जेवणें व मधल्या वेळेचा हलका फराळ असा आहाराचा नियम ठेवावा. गर्भिणीच्या पोटांतील गर्भ शरिरांत उत्पन्न होणारी घाण तिच्या शरिरांतूनच बाहेर पडावयाची असल्यामुळें प्रत्येक गर्भिणीनें मलमूत्र विसर्जन व शरीर स्वच्छता या गोष्टींकडे अवश्य लक्ष दिलें पाहिजे.

गर्भिणीनें पुढील पदार्थांचा आहारांत समावेश करावा. दूध—गाईचें अगर म्हैशीचें ज्यांना दुधानें रेच होतात अगर पोटफुगी होते तिनें निरसें धारोष्ण दूध घेणें चांगलें. दूध तापवितेवेळीं त्यांत पाणी व वावडिंग टाकून व पाणी साफ निःशेष करून मग तें दूध घेणें. ताक—ताजें मधुर ताक घेण्यास हरकत नाहीं. अशा ताकानें पचन होऊन लघवी साफ होते. लोणी व तूप खाण्यास मुळींच हरकत नाहीं. कडधान्यांपैकीं गहूं, तांदूळ, ज्वारी, तूर, मूग, चवळ्या हे जिन्नस खावे. फळें व भाज्या—पैकीं संत्रीं, मोसंबी, कागदी लिंबू, आलें, कोथिंबीर, टोमॅटो, मेथी, अळूं व इतर पालेभाज्या, लसूण, आंबा, स्ट्रॉबेरी, केळीं, अंजीर, द्राक्ष, डाळिंब, सीताफळ, रामफळ अशीं फळें खाण्यास हरकत नाहीं. संत्र्यांत व्हिटॅमिन्स भरपूर असतें व त्याच्यामुळें पचनास मदत होऊन तोंडास रुचि येते. यासाठीं तीं अधिक खाण्यास हरकत नाहीं तसेंच कांदे बटाटेहि खावे.

शरीरपोषक व बलवर्धक द्रव्यें ज्या पदार्थांत कमी ते पदार्थ कमी खावे. अगर खाऊं नयेत, कोबी, फुलकोबी, गाजर, साबूदाणा, जवसाचें तेल टीनच्या डब्यांतील ‘ फळें ’ मासे--लोणी--आमरस असे राखून ठेवलेले पदार्थ वर्ज करावेत. तसेंच सोडा टाकून शिजविलेले पदार्थ वर्ज करावे.

आपल्या आयुर्वेदांत गर्भिणीला कोणत्या महिन्यांत कोणतें अन्न द्यावें त्याची स्पष्टता पुढील प्रमाणें केलेली आहे. पहिल्या व दुसऱ्या महिन्यांत साठ दिवसांत तयार होणाऱ्या धान्याचे अन्न दुधाशीं द्यावें. चवथ्या महिन्यांत दह्याशीं; पांचव्या महिन्यांत दुधाशीं; सहाव्या महिन्यांत तुपाशीं साठीधान्य द्यावें. चवथ्या महिन्यांत दूध लोणी हे पदार्थ आहारांत विशेष असावे व पांचव्या महिन्यांत दूध तूप मिश्रित अन्न द्यावें असें सांगितलें आहे.

गरोदरावस्थेंतील उत्तर मासांत उदरांतील अस्वस्थता नाहींशी होते व भूकहि जास्त लागते. पण या मुदतींत तिनें मेहनतीचीं कामें करावयाचीं नसल्यामुळें तिच्या शक्तीचा व्यय कमी होत असतो. कोणत्याहि वेळीं जें अन्न खावयाचें तें वाढवूं नये. भूक जास्त लागल्यास एकाच वेळीं आकंठ न जेवतां थोडथोडें असें दोनच्या ठिकाणीं तीन वेळां खावें. गरोदरावस्थेंत मलावरोधाची भीति असते यासाठीं ती टाळण्यासाठीं संत्रें, मोसंबी, नारिंगें अशीं पक्व फळें आहारांत विशेष ठेवावीं; अपाय होणार नाहीं अशा खाद्य पदार्थांवर तिची इच्छा गेल्यास ते पदार्थ जरूर द्यावे, मात्र अशा पदार्थांनीं तिला कांहीं विकृती होण्याचा संभव असेल तर ते पदार्थ साफ वर्ज करावे. अंथरुणांतून उठण्यापूर्वी प्रातःकाळीं प्रथमारंभीं एक पेला भर काफी घेतली असतां गर्भारपणाच्या आरंभीं जी मळमळ होते ती होत नाहीं. कॉफी ऐवजीं तुळशीच्या पानांचा चहाहि देणें चांगलें.

कपडे—वस्त्राभरण—गरोदरावस्थेंत विशेषतः ऊबदार वस्त्रें वापरणें चांगलें; मात्र ते हलकें असून जड नसावें. तसेंच या अवस्थेंतील तिचे कपडे तिच्या स्थितीला अनुरूप असे असावे. दिवसेंदिवस वाढत्या गर्भाची वृद्धी होण्यास कपड्यामुळें त्रास होऊं नये अशा रीतीनें कपडे वापरावे. अंगांतील कपडा तंग नसावा, कमरेस करकोचा पडून कंबर कुजेपर्यंत घट्ट नेसण्याची कित्येक स्त्रियांना सवय असतें, परंतु त्यामुळें गर्भावर फार वाईट परिणाम होतो. अंगांतील कपडा असा असावा कीं त्यामुळें शरिराची हालचाल स्वाभाविकपणें होण्यास हरकत होऊं नये. घट्ट नेसल्यानें आंतील गर्भावर दाब पडतो, त्यास दुखापत होते, त्याची पूर्ण वाढ होत नाहीं आणि तो पडण्याचीहि भीती असते.

अंगांतील घट्ट कपड्यांनीं स्तनाग्रें चपटीं होऊन मुलांस पुढें दूध पिण्यास

अडचण पोंचते. यासाठीं गरोदर स्त्रीनें नेहमीं अंगांत ऊब राहील असे सैल कपडे वापरण्याची खबरदारी घ्यावी.

व्यायाम—प्रकृतीस्वास्थ्यासाठीं गरोदर स्त्रीला मोकळी हवा व व्यायाम याची फारच जरुरी आहे. गरोदरावस्थेच्या अखेरपर्यंत मोकळ्या जागेंत सोयीस पडेल त्याप्रमाणें अवश्य व्यायाम घेणें. दम लागेपर्यंत तिनें फिरूं नये. तसेंच फिरून आल्यावर अतिशय थकवा येईल इतकाहि व्यायाम करूं नये. फिरण्याच्या व्यायामाचा कंटाळा येत असेल तर ( गर्भारपणाच्या अखेरीस असें होत असतें). उघड्या हवेंत गाडींतून फिरण्यास जावें. मात्र गाडी अत्यंत सावकाश चालवावी. सायकलवर बसणें, टेनिस खेळणें, जोरानें धांवणें, घोड्यावर बसणें, पाण्याचे हांडे उचलणें, तसेंच दुसरें एखादें जड ओझें उचलणें, वगैरे शारीरिक श्रमापासून अनिष्ट परिणाम होण्याचा संभव असतो.

गर्दीचे समाज, नाटकें, सिनेमा, कडकडीत उपवास इत्यादिकांचा गर्भिणीवर अनिष्ट परिणाम होतो. यासाठीं त्यापासून अलिप्त रहावें.

व्यायामाच्या बाबतींत विचार केल्यास गरिबी व श्रीमंतीचा प्रश्न पुढें उभा राहातो. श्रीमंत स्त्रियांना घरगुती काम फारसें नसल्यामुळें त्यांचा काळ बहुतेक आळसांत जातो. यासाठीं अशाच स्त्रियांना व्यायामाची फार आवश्यकता असते. ज्यांना घरांतील लहानमोठीं कामें करावीं लागतात. अशा स्त्रियांना वेगळ्या व्यायामाची गरज नसते, असेंच केवळ समजावयाचें नाहीं. घरांत मुळीच काम नसलेल्या स्त्रियांनीं बागेंत उघड्या हवेंत फिरावें. फुलबागेची निगा ठेवावी. लहान मुलांना गाडींत बसवून त्यांचेबरोबर चालत जावें, स्वतः गायन करावें. शरिरांतील स्नायूस त्रास न होतां हालचालीनें व्यायाम मिळेल असें काम करावें. एकंदरींत व्यायामाचा हेतु एवढाच असतो कीं, त्यामुळें शरिरांतील स्नायूंस चलन मिळून ते बळकट होतात व घामावाटे शरिरांतील घाण बाहेर पडते व श्रमामुळें श्वासोच्छ्वास अधिक होऊन शरिरास प्राणवायूचा भरपूर पुरवठा होतो व यामुळें गर्भिणीचें रक्त शुद्ध राहून तिला भूक चांगली लागते. गर्भिणीनें दळण, कांडण व सर्वसाधारण घरांतील नेहेमीचें काम करण्यास हरकत नाहीं. तुळशीला प्रदक्षिणा घालणें, देवालयांत, समाजांत चालत जाणें वगैरे गोष्टी अवश्य कराव्या. मात्र किती चालावें हें जिचें तिनें ठरवावें; म्हणजे थकवा येणार नाहीं तोंपर्यंत चाल-

ण्यास हरकत नाहीं. व्यायामामुळें शरिरांतील स्नायूंचें आकुंचन व प्रसरण होतें व त्यामुळें त्याचें बळ वाढून प्रसूति होतांच ज्या मार्गानें मूल मातृशरीराबाहेर येतें त्या जागेच्या स्नायूचें नीट चलनवलन होऊन फार थकवा न येतां सुलभ व सुखप्रसूति होते. यामुळें गरोदरावस्थेंत व्यायामाचें फार महत्त्व आहे.

विश्रांति—गर्भिणीस विश्रांतीची फार जरुरी असते, तथापि तिनें तासाचे तास आळसानें नुसतें पडून राहणें योग्य नाहीं. रात्रीं लौकर झोंपून आठ नऊ तास झोंप घेणें. गर्भाची वाढ होत असतां दिवसेंदिवस पोट मोठें होऊन तिला तोलेनासें होतें व त्यामुळें उभें राहतांना हिंडतांना तिला श्रम होऊन दम लागतो म्हणून दोन दोन चार चार तासांनीं गरोदर स्त्रिया अंग टाकून पडतात. मधून मधून चार दोन तासांनीं तिला विश्रांतीची गरज असते. तरी दिवसाच्या चोवीस तासांपैकीं नऊ दहा तास तरी तिनें विश्रांती घेणें जरूर आहे.

शरीरस्वच्छता—गर्भिणीनें शारीरिक स्वच्छतेकडे विशेष लक्ष पुरविलें पाहिजे. शरीर रक्षणासाठीं सेवन केलेल्या आहारापैकीं पोषक द्रव्यें शरिरांतील अवयवांस मिळाल्यानंतर त्या आहारांतील निरुपयोगी चोथा व शरिरांतील इतर घाण यांनीं बनलेला मळ, शरिरांतून त्वचा, आंतडीं, फुफ्फुसें व मूत्रपिंड, यांतून बाहेर पडतो. यासाठीं या चार मार्गांचा स्वच्छतेकडे लक्ष देणें जरूर आहे.

स्नान व त्वचेची स्वच्छता—त्वचा ही शरीराचें रक्षण करणारी आहे. त्वचेंतून घामावाटें शरीरांतील घाण बाहेर पडते व शरीराची ऊब कमजयास्त न होतां सारख्या स्थितींत राहते. त्वचेवरील सूक्ष्म रध्रांतून रक्तांत सांठणारी घाण घामाच्या रूपानें बाहेर पडणारी घाण निर्वेधपणें बाहेर पडण्यासाठीं त्वचेवरील छिद्रें मोकळीं राहिलीं पाहिजेत. यासाठीं त्वचा स्वच्छ रहाणेसाठीं स्नान करणें जरूर आहे. स्नान दिवसांतून एकदांच करावें व स्नानाचें वेळीं शरीरास वारा लागूं नये. उन्हाळयाशिवाय इतर ऋतूंत गरम व उन्हाळयांत गारपाणी स्नानासाठीं घेणें चांगलें. फार कढत पाणी न वापरणें चांगलें. आंघोळीच्या वेळीं सर्वांग चांगलें भिजल्यावर साबूनें अंग घांसून नंतर पाण्यानें स्वच्छ करावें व लगेच कपडे पेहरावे.

आंतड्यांची स्वच्छता—सेवन केलेल्या आहाराचें पचन झाल्यावर बाकी राहिलेला चोथा मळाच्या स्वरुपांत बाहेर पडतो त्यास शौचविधी म्हणतात. शरीर स्वास्थ्यासाठीं एकवेळ शौचशुद्धी होणें जरूर आहे. परंतु बहुतेक गरोदर स्त्रियांना शौच-

शुद्धी होत नाहीं व ह्यामुळें त्यांना फार त्रास होतो. कित्येक स्त्रियांना नेहमीं मलावरोध असतो व अशा स्त्रिया गरोदर राहिल्यावर तो विकार ज्यास्त त्रासदायक होतो. शरिरांतील मळ व्यवस्थित बाहेर न गेल्यास तो तिथेंच कुजत राहून त्याचा शरिरावर अनिष्ट परिणाम होतो. मलावरोधामुळें रक्तांतून शरिरांत सांठणारा मळ मूत्रपिंडांतून लघवीच्या द्वारें बाहेर पडूं पाहतो व त्यामुळें आपल्या नित्यक्रमापेक्षां मूत्रपिंडावर विशेष ताण पडतो व यामुळेंच गरोदर स्त्रीस मूत्रपिंड दाह अनेक वेळां होत असतो. शिवाय मलावरोधामुळें फुफ्फुसावरहि अधिक काम पडतें. त्यामुळें गरोदर स्त्रीला दमा, चक्कर, घेरी, खोकला असे विकार जडतात. मलावरोधाचा त्रास न होण्यासाठीं गर्भिणीनें दररोज निरनिराळ्या वेळीं व निरनिराळ्या स्वरूपांत ८ ते १० पेले पाणी प्यावें. त्यानें पोटांतील मळ वाहून जाईल. रात्रीं झोंपतेवेळीं १ पेला पाणी व सकाळीं उठल्यावर एक पेला पाणी प्यावें. पाणी स्वच्छ व ताजें असावें, डॉक्टर वैद्याच्या सल्ल्याशिवाय गरोदर स्त्रीनें रेचक घेऊं नये. शौचशुद्धीचा साधा उपाय म्हणजे पालेभाज्या, ताजीं मधुर फळें, गव्हांचा भुसायुक्त शिरा याचा नेहमींच्या आजारांत उपयोग करावा.

मूत्रपिंडाची स्वच्छता:—प्रत्येक स्त्रीला दररोज ५० ते ५४ औंस लघवीला झालें पाहिजे; स्वत:चे व गर्भाचे शरिरांत सांठणारा मळाचा बराचसा भाग मूत्रावाटे स्त्रीच्या शरिरांतून बाहेर पडतो. हा मार्ग बंद झाल्यास अगर मळ कमी जाऊं लागल्यास गरोदर स्त्रीच्या हातापायांस सूज चढणें, पेटके, आंकडी येणें असे विकार होतात. यासाठीं गर्भिणीनें नेहेमीप्रमाणें लघवी साफ होते कीं नाहीं याकडे विशेष लक्ष पुरविलें पाहिजे. नेहेमीपेक्षां लघवी थोडी व लाल असून लघवीनंतर आग होत असल्यास ताबडतोब जेवण सोडून दुधावर रहावें व सबंध दिवसांत निरनिराळ्या स्वरूपानें ४–४॥ शेर पाणी पोटांत जाईल अशी तजवीज करावी. लघवींत कांहीं दोष असल्याचा संशय वाटल्यास वैद्य, डॉक्टरना लघवी दाखवावी, ही जी लघवी डॉक्टर–वैद्यांना दाखवावयाची ती सकाळीं उठल्यावर प्रथम होणारी सोडून नंतरच्या चौवीस तासांतील लघवी धरून ठेवावी व ती दाखवावी. लघवीच्या बाबतींत गरोदर स्त्रीची फार काळजी घेणें जरुरीचें आहे.

दांतांची स्वच्छता:—दांत सुदृढ व निरोगी असणें हें आरोग्याच्या लक्षणांपैकीं एक लक्षण व साधन आहे. गर्भिणीनें आपले दांत नेहेमी स्वच्छ

राखण्याची फार काळजी घेतली पाहिजे. दातांस कीड लागली असेल अगर दातांतून पू-रक्त जात असेल तर त्याची ताबडतोब व्यवस्था करावी. दांतांत असंख्य सूक्ष्म जंतु राहतात व ते लाळेंतून व घशांतून पोटांत शिरून रक्तांत मिसळतात. त्यापासून गर्भिणीच्या गर्भाच्याहि शरीरावर अनिष्ट परिणाम होण्याचा फार संभव असतो. गरोदरावस्थेंत पोटांत आम्लता ज्यास्त असते व ओकारींतून आम्ल तोंडांत येतें व त्याचा दांतांवर घातुक परिणाम होतो म्हणून दिवसांतून गर्भिणीनें आठ दहा वेळां मीठ अगर सोडयाच्या पाण्याच्या चुळी भरून टाकाव्या. तसेंच दात घांसण्यासाठीं मीठ अगर जंतुनाशक दंतमंजनाचा उपयोग करावा. आहाराचें पचन दांतांच्या सुदृढतेवर असून पचन होणारा आहार गर्भिणी व गर्भाचें पोषण करणारा असल्यामुळें दांतांच्या आरोग्याची व सुदृढतेची काळजी गरोदर स्त्रीनें अवश्य घ्यावी.

स्तनाची काळजी—गर्भिणीच्या स्तनाची वाढ तिच्या उदरांतील गर्भाबरोबरच होत असते. व स्तनांत दूध उत्पन्न होऊन त्यावर मुलाचें जीवनपोषण व्हावयाचें असतें. म्हणून या विषयाकडे गर्भिणीनें जरूर लक्ष दिलें पाहिजे. अंगांत घालावयाची चोळी घट्ट नसावी तशी असल्यास तिचा दाब स्तनावर पडून स्तन पसरट व बसकट होतात व स्तनाग्रें स्तनांत रुतलेलीं दिसतात. अशी स्थिति राहिल्यास मुलास पाजण्याचे वेळीं त्यास फार त्रास होतो. यासाठीं स्तनाग्र मोकळे राहतील अशी खबरदारी घेतली पाहिजे. गर्भारपणाच्या शेवटच्या तीन महिन्यांत स्तन बरेच मोठे होऊन वजनदार होतात. त्यांस सहज स्थितींत लोंबत ठेवूं दिल्यास त्यापासून स्त्रीलाहि त्रास होईल. यासाठीं खांद्यावरून छातीवर सैल पडून स्तनास वर उचलून धरणारें असें वस्त्र वापरल्यास सर्व अडचण दूर होऊं शकेल. स्तनाग्र चपट असल्यास दररोज तर्जनी व आंगठ्यांत धरून थोडें लांब ओढून तसेंच चारपांच मिनिटें ठेवावें व नंतर सोडावें. असें दिवसांतून ४।५ वेळां करावें. यानंतर स्तनाग्र थोडें घट्ट होण्यास तें दररोज पांचसहा मिनिटें साबणानें धुवून कोरडें करावें व नंतर त्यावर थोडेसें स्पिरीट चोळावें. किंवा व्हॅसलीन लावून त्यावर कापूस बसवून बांधून ठेवावे. ही क्रिया गर्भिणीनें शेवटच्या २।३ महिन्यांत करावी.

मनःस्थितिः—गर्भिणीच्या मनाची जशी स्थिति असेल तसा गर्भाच्या मनावर परिणाम होत असतो. गर्भिणीचें मन खिन्न राहिल्यास गर्भावर अनिष्ट परिणाम झाल्यावांचून रहाणार नाहीं. यासाठीं गर्भिणीनें नेहमीं संतुष्ट असावें. आपली सुखानें सुटका होईल असा मनाचा विश्वास बाळगावा. गर्भारपण म्हणजे दुखणें अगर संकट आहे असें मनांत आणूं नये; तसेंच सुटकेविषयीं बिलकूल चिंता बाळगूं नये. मन नेहेमीं आनंदी व मनास उल्हास देणाऱ्या निरनिराळ्या विषयांत मग्न ठेवावें.

याप्रमाणें एकंदर वागणूक ठेवल्यास गर्भिणी व गर्भ या दोघांनाहि तिचे हितावह असे परिणाम होतील.

---

# प्रकरण ५ वें

## गर्भिणीच्या अंतरींद्रियांची अवस्था.

नूतन विवाहीत स्त्रीमध्यें गरोदरपण आल्यानंतर या नवीन स्थितीची तिला कल्पना नसल्यामुळें तिचें मन गांगरून जातें. गरोदरावस्था व बाळंतपण ह्या दोन अवस्था प्रत्येक स्त्रीच्या जीवावरच्या असतात, व त्या ईश्वराच्या कृपेनें पार पडल्या म्हणजे प्रत्येक जण स्वतःला धन्य समजत असतो. आयुर्वेदानें गरोदरपणांत कशा प्रकारची वागणूक ठेवावी, हें सविस्तरपणें सांगितलें आहे, अशा प्रकारची माहिती अगर महत्त्व पाश्चात्त्यांना अद्याप पटलेलें नाहीं. प्रत्येक धर्म मानणाऱ्या हिंदूला मनुष्यजन्म प्राप्त झाल्यानंतर त्याच्या मागें सोळा संस्कार लागलेले आहेत, व हे सोळा संस्कार बारकाइनें पहाणाराला त्याच्या मागें किती उच्च तत्त्व आहे हें समजल्याशिवाय रहाणार नाहीं. धर्माची ग्लानि, आपल्या प्रत्येक रितीभातीवर अश्रद्धा, कोणतीहि गोष्ट समजून घेण्याची निरीच्छा, व आपलें तेवढें वाईट, परक्याचें चांगलें ही दिवसेंदिवस आजकालच्या तरुण पिढींत वाढणारी मनःप्रवृत्ती ह्या सर्व गोष्टी संसारांचा अधःपात करणाऱ्या आहेत हें प्रत्येकानें समजून रहावें. तात्पुरत्या सुखाकडे मनाची प्रवृत्ति वाढत असल्यामुळें आम्हीं आज दुर्बल व नादान झालों आहोंत. शारीरिक व मानसिक उन्नति करून घेण्याचें ध्येय व त्याची जाणीव आजच्या तरूण पिढींत दिसत नाहीं असें दुःखानें, व लाजेनें म्हणावें लागतें. आपल्या मार्गांत आनुवंशिक संस्कारांचें महत्त्व विशेष आहे. ह्या संस्काराचा मनांतून कितीही उच्छेद करण्याचा प्रयत्न केला तरी त्यांची जाणीव न कळत कां होईना प्रत्येकाला होते. जोपर्यंत सद्दीचा जोर असतो, पैसा हातांत असतो, वय तरुण असतें तोंपर्यंत प्रत्येक स्त्री-पुरुषाला कशाचीही जरुरी नसते. परंतु हें कालचक्र सारखें फिरत असल्यामुळें त्यांतून मरेपर्यंत शिरसलामत जो सुटतो त्यानेंच आपल्यावर ईश्वराची कृपा आहे असें समजावें. गरोदरपण म्हणजे मातृपदाची पहिली अवस्था; ही फार जबाबदारीची असते. ह्या कालांत प्रत्येक स्त्रीनें जपून वागलें पाहिजे. गरोदर स्त्री ज्याप्रमाणें वागेल त्याप्रमाणें आंतील गर्भावर परिणाम होत असतात. नैसर्गिकरीत्या स्त्री बाळंत होईपर्यंत गरोदरावस्थेंतील शारीरिक, मानसिक फरक काय

होतात हें नीटपणें समजलें म्हणजे रोगांची उत्पत्तिही समजणें सोपें जातें व या करितांच प्रथम गरोदरपणांमध्यें—कसे कसे फरक होतात याचा विचार करूं.

स्त्री गरोदर राहिली, म्हणजे तिच्या प्रकृतींत, रोजच्या खाण्यापिण्यांत, वागण्यांत व शरीरांत फरक होत असतो. नैसर्गिक स्थितींत स्त्री आजारी पडणें व गरोदरपणांत आजारी पडणें ह्या दोहोंच्या लक्षणांमध्यें फरक असतो.

गर्भाशय व आंतील गर्भ हा जसजसा वाढत जातो तसतसा पोट, ओटीमधील रसवाहिन्या ह्यांच्या नैसर्गिक व्यापारांत प्रतिबंध येत असतो. आंतड्यांवर दाब पडल्यामुळें आंतड्यांच्या हालचालीला प्रतिबंध येतो व आंत मळ राहून विष तयार होतें. ( infection ) मूत्रनलिकेवर दाब पडल्यामुळें लघ्वी मूत्रपिंडांच्या pelvis मध्यें जमते, तसेंच मज्जातंतूवर दाब पडल्यामुळें नैसर्गिक मज्जातंतूच्या गतिमध्यें फरक होतो. कटीच्या अस्थींचे ( Pelvic joints ) सांधे मऊ झाल्यामुळें गरोदरपणांत ते मागेंपुढें होत असल्यामुळें कण्यांवर त्यांचा दाब पडून इतर हाडांच्या नैसर्गिक क्रियेमध्यें प्रत्यवाय येतो.

श्वासोश्वास व रुधिराभिसरणांचीं इंद्रियें:—ह्या इंद्रियांवर गरोदरपणांत काय परिणाम होतो तें पाहूं. हृदयाचा आकार, किंवा फुफ्फुसांच्या पेशी (Tissues) यांमध्यें बाह्य कारणानें रक्त चिकट झालेंच तर फरक होतो. $\frac{१}{५२}$ रक्त वाढतें व त्यामुळें हृदयाचें काम वाढतें, नाडीची गति वाढते व त्यामुळें श्वासोश्वासांमध्यें प्रतिबंध होतो. निरोगी प्रकृति असणाऱ्या गरोदर स्त्रीमध्यें हृदयाचे किंवा फुफ्फुसाचे विकार होत नाहींत. गरोदरपणांत रक्ताचा दाब हृदयसंकोच १००—३० हृदयविकास ६० ते ८५. नाडीचा दाब ३५ ते ५० असतो.

रक्तः—रक्तांत एक प्रकारचा वीष जन्य रक्तदोष ( Toxemia ) उत्पन्न होतो. हें समजण्या पूर्वी गरोदरपणामुळें पहिले कांहीं महिने पांडुरोग होत असावा अशी कल्पना होती परंतु ही कल्पना खोटी होती. निरोगी स्त्रियांमध्यें रक्तांमधील हिमोग्लोबीन व पेशी वाढून रक्ताची शक्ति वाढते असें अनुभवास येतें. जंतुनाशक असे विरुद्ध पदार्थ ( anti-bodies ) यावेळीं तयार होतात. यामुळें गरोदर स्त्रीमध्यें साहजिकच प्रतिबंधक शक्ति उत्पन्न होते. गरोदरपणांत पाळी बंद असणें हें नैसर्गिकच आहे. गर्भाशयाची अंतस्त्वचा ( membrane ) व बीजाची

( ovum ) अंतस्त्वचा याचा मिलाप होतो. त्यावेळीं रजःस्राव अजिबात बंद होतो. गरोदरपणांत पहिल्या सहा महिन्यांत रक्तांमध्यें चुन्याचें प्रमाण वाढतें. Non Protein Nitrogen कमी होतो, व यापैकी युरीयानायट्रोजन ४४$^{0}$ असतो. युरीक ॲसिड, ( Creatin, Chlorides of sugar ) यांमध्यें कांहीं फरक होत नाहीं.

रस वाहिन्याः—( Lymphatics ) रक्तवाहिन्याच्या बरोबर असल्यामुळें दाबामुळें ह्या मोठया होतात. गरोदरपणांत ह्या रसवाहिन्या उत्तेजित होतात व त्यांच्यामध्यें प्रतिबंधक शक्ति उत्पन्न होते.

अन्नपचनेंद्रियें:—( Digestive organs )

गरोदरपणांत या इंद्रियांमध्यें बदल होतो. व त्यामुळें आंतड्यांच्या हालचालीला प्रतिबंध येतो, व यापासून रोगोत्पादक जंतु उत्पन्न होण्याचा संभव असतो. यकृताची संकोचक स्थिती ( Congested liver ) यांवर रक्तामधील विरुद्ध पदार्थांचा ते दोष कमी करण्याकडे उपयोग होतो. निरोगी स्थितीमध्यें गरोदरपणांत भूक वाढते व पचनशक्ति सुधारते.

उत्सर्जन करणारीं इंद्रियें:—( Organs of excretion ) गरोदरपणांत मूत्रपिंडांचें महत्त्व फार आहे. मूत्रपिंडाचा संकोच होतो व याच्या पूर्वी मूत्रपिंडाचा विकार असेल तर तो वाढतो. शरिरामध्यें विषजन्य रक्तदोष (Toxmia) वाढतो व आंचके सुरू ( Eclampsia ) होतात. मूत्रपिंडापेक्षां आंतड्यांमधून घाण बाहेर जाणें महत्त्वाचें आहे. मलावरोध गरोदरपणांत नाहीं अशी स्त्री सांपडणें कठिण. आंतड्यांमधून घाण बाहेर न गेल्यामुळें अन्य रक्तदोष (Toxmia) तयार होतो, व या विषांचा रक्तांमध्यें प्रादुर्भाव होऊन पांडुरोग व इतर विकार होतात. गरोदरपणांत मलावरोधाचा विकार असणें धोक्याचें समजलें पाहिजे.

मज्जातंतु:—( Nervous system ) या अवस्थेंत मज्जातंतूवर परिणाम झाल्यामुळें, भूक नसणें, वेड, स्वभाव चिडखोर बनणें, राग येणें, कांहीं सहन न होणें, भूक लागणें–न लागणें अशा प्रकारची स्थिती होते, परंतु हें थोडक्या प्रमाणांत असेल तर काळजी बाळगण्याचें कारण नाहीं.

चयापचयक्रिया ( Metabolism of Pregnancy ):—तहान, भूक,

व प्राणवायु शरिरात जाण्याचें प्रमाण वाढतें. परंतु हें पचन करण्याचें कमी झालें तर चयापचय क्रियेनें प्रकृति बिघडते.

स्नायु व मज्जातंतुः—स्नायु व मज्जातंतूंची शक्ति गरोदरपणांत वाढते.

उष्णतामानः—शरिरांतील उष्णतामान वाढतें. हें प्रमाण प्रत्येक स्त्रीच्या स्वभाव व प्रकृतिमानावर अवलंबून असतें. अशा स्थितींत ताप आला असतां या गोष्टी विचारांत घेतल्या पाहिजेत.

क्षुल्लक गोष्टीः—त्वचा, केंस, नखें, हीं चांगलीं वाढत असतात. त्वचेमध्यें रुधिराभिसरण होत असल्यामुळें घामही चांगला जात असतो. परंतु कांहीं बायकांमध्यें दांत सडलेले असतात, व त्यांना अशावेळीं त्रास होण्याचा संभव असतो. त्वचेमुळें नखेंही वाढतात. ज्यांचीं नखें चांगलीं नाहींत त्यांच्या प्रकृति-मध्यें विकृती आहे असें समजावें.

नैसर्गिक गरोदरपणाची स्थिति कशी असते व असली पाहिजे ह्यांचें वर्णन थोडक्यांत वर दिलेलें आहे. यावरून अलिकडील प्रथमच गरोदर असणाऱ्या स्त्रिया पहिलें बाळंतपण सुरक्षितपणें कां निभावूं शकत नाहींत याची साधारण कल्पना येईल.

---

# प्रकरण ६ वें.

## गरोदरपणांतील इतर विकार.

गरोदरावस्थेमध्यें साध्या अवस्थेप्रमाणेंच सर्व प्रकारच्या व कित्येक विशिष्ट अशा प्रकारच्या विकृती होत असतात. इतर अवस्था व गरोदरावस्था यांत बरेंच अंतर असतें. गरोदरावस्थेंत दोन जीवांचा संबंध असतो. शिवाय त्या अवस्थेमध्यें स्त्रीची तब्येत अत्यंत नाजुक असते. यामुळें गरोदरावस्थेंतील कोणत्याहि विकृती-कडे ती किरकोळ वाटली तरी डोळेझांक अगर हेळसांड करणें योग्य होणार नाहीं.

गरोदरावस्थेमध्यें जे चालचलाऊ विकार होत असतात त्याबद्दल प्रथमारंभीं विचार करूं.

प्रातर्वमनः—उलट्या होणें. पुष्कळ स्त्रियांना गर्भ राहिल्यानंतर थोड्याच अवधींत उलट्या होत असतात. पोटांत कांहीं घेतलें तरी टिकत नाहीं. पाण्याची सुद्धां उलटी होते. अशावेळीं पहांटेस उठून दहींभात खावा. सुतशेखर १ ते २ गुंजा मुराबळा अगर डाळिंबाच्या अवलेहांमधून देणें. आईस्क्रीम देणें. दूध व बर्फ द्यावें. मोहरीचा लेप पोटावर करावा.

जळजळणें—गरोदरपणीं कित्येक स्त्रियांचे पोटांत जळजळत असतें याचें कारण पोटांत आम्लता ज्यास्त होते व ती तोंडांतहि येते. अशा स्थितींत रात्रीं झोंपते-वेळीं चार चमचे एरंडेल किंवा सोडाबाय कॉर्ब पाण्यांत मिळवून घेणें किंवा चार चमचे चुन्याची निवळी घेणें.

अतिसार हगवण—गरोदरावस्थेंत जेवढा मलावरोधाचा विकार आढळतो तेवढा अतिसार—हगवणीचा क्वचित्च दिसून येतो. तथापि त्याकडे दुर्लक्ष करून भागणार नाहीं. दुर्लक्ष झाल्यास हा विकार गर्भपातास कारण होत असतो.

या विकारांत आहार अत्यंत सौम्य हलका ठेवावा. शक्य तों थोडथोडें दूध निरनिराळ्या स्वरूपानें पोटांत जाईल अशी हलक्या आहाराची व्यवस्था ठेवावी. पोटांतील खळबळ थांबली, म्हणजे ज्यांना चालेल त्यांना अंडें थोडें उकडून द्यावें, पोट फार भरल्यानें जर रेच होत असतील तर निराळी योजना झाली पाहिजे. एकदम हगवण बंद करणें केव्हांही योग्य नाहीं. प्रथमतः हलकेंसें रेचक देऊन कोठा साफ करावा. म्हणजे हगवण आपोआप बंद होईल. मादक व सुस्तिकारक पदार्थ देऊं नये. मांसाहाऱ्यांना सुप आणि पाणी याचें मिश्रण द्यावें. तसेंच १५।२० थेंब अफूच्या अर्काचे एरंडेलांतून द्यावे. पोटांतील बिघाड जिभे-वरून समजतो. हगवण लागली असतां उबेची फार आवश्यकता असते. यांकरितां सर्वांग-पोट-पाय गरम कपड्यांनीं झांकावें. क्वचित् प्रसंगीं प्रसूतीकाल

नजीक आला म्हणजे अतिसार होतो. पण तो विकारयुक्त दिसल्यास म्हणजे मंदाग्नि, थकवा, मळाला दुर्गंधी अगर गांवांत पटकीचा आजार चालू असल्यास ताबडतोब उपाय योजना व्हावी.

पोटशूळ—विरुद्ध आहाराच्या वगैरे कारणांनीं जेव्हां पोटशूळ होतो तेव्हां तो बेंबीच्या वरच्या भागांत होत असतो. तो दीपन पाचन औषधांनीं शमतो. परंतु गरोदर स्थितींत बहुधा ओटी पोटामध्यें प्रसूतिकालच्या वेदनांप्रमाणें सुया टोंचल्याप्रमाणें सळका मारतात व त्या भयंकर असतात. त्यांनीं प्रसंगीं गर्भपातहि होण्याचा संभव असतो. तरी डॉक्टर वैद्याच्या सल्ल्यानें जरूर ते उपचार करावे.

उरांत धडधडणें—हा विकार बहुतेक गरोदर स्त्रियांना होत असतो व ज्या भित्र्या स्वभावाच्या किंवा ज्यांना अपस्माराची खोड आहे अशा स्त्रियांना यापासून फार त्रास होतो. या विकारांत सर्वांगास कंप सुटतो, स्त्री झोंपेंतून दचकून उठते—भयभीत होते. या बाबतींतील योग्य कारणें दूर करावीं.

मूर्च्छा—उरांत धडधडणें व मूर्च्छा हे विकार मेंदूच्या अशक्तपणामुळें होतात. या विकारांत फाजील निद्रा, जल प्रवास वर्ज करावे. मलशुद्धी ठीक ठेवून मेंदूला तरतरी आणणारीं **लोह, प्रवाळ, मंडूर, सुवर्णमाक्षिक** अशीं औषधें सुरू ठेवावीं.

मस्तक शूल—पोट व आंतडीं यांच्या विकाराकडे दुर्लक्ष केलें असतां पुढें मस्तकशूल उद्भवतो. या विकारांत जीभ जड, ओशट व क्षारयुक्त वाटते. जीभ स्वच्छ होईपर्यंत कांहीं तरी हलकें रेचक घ्यावें. पोट व आंतडीं स्वच्छ झालीं म्हणजे मस्तकशूल बंद होतो. **किनाइन व लोह** द्यावें. मस्तकास सुंठ, कापूर, जायफळ, सुपारी, बदाम दुधांत उगाळून लेप द्यावा.

निद्राभंग—गर्भिणीला कधीं कधीं झोंप लागत नाहींशी होते आणि असा क्रम फार दिवस चालू राहिला असतां अनिष्ट परिणाम होतो तरी निद्राभंगाचें कारण शोधून योग्य तो उपाय करावा. दिवसा झोंपूं नये. झोंपण्यापूर्वीं तीन तास अगोदर जेवावें. घरांत कामधंदा करावा. **माक्षिक भस्म** आवळ्याच्या मुरंब्यांतून दोन गुंजा घेणें, अगर ब्रोमाईड किंवा मेडिनॉल घ्यावें. शौचशुद्धी ठेवावी.

हात, पाय, तोंड यावरील सूज—गर्भाशयाचा दाब पोटांतील शिरांवर पडल्यामुळें रुधिराभिसरणाला व्यत्यय येतो व शिरांत रक्त सांचून राहतें. त्यामुळें पायांवरील शिरा फुगतात. कधीं कधीं त्या फुटून त्यांतून रक्तस्रावहि होतो. कधीं कधीं त्यामुळें पायांवर इसब होतो. पायांवर अशा शिरा वाढल्या म्हणजे चालतां येत

नाहीं. त्या ठणकतात, दुखतात. पोटांतील खालून येणाऱ्या शिरांवर वाढलेल्या गर्भाशयाचा दाब पडल्यामुळें त्यांत रक्त सांचून राहतें व त्यांतील पाणी बाहेर पडून पायांत सांचतें त्यामुळें पाय सुजतात, ही सूज कधीं पायाच्या घोट्यावर, पावलावर रात्रीं थोडी चढते व सकाळीं उतरते. कधीं पावलें फार सुजतात. याच कारणानें कधीं हातांवर तर कधीं तोंडावर सूज येते. पण वास्तविक तोंडावर व हातांवर सूज मूत्रपिंड व हृदय विकृत झाल्यानें येते. प्रथम पायांवर सूज आल्यास पोटांतील खालच्या मोठ्या शिरा कीं, ज्या यकृतांत जातात त्यांवर दाब पडल्यानें यकृतांतील रुधिराभिसरणास व्यत्यय येतो. त्यामुळें पायांवर सूज येते, व ती वाढत जाऊन पुढें हातांवरहि येते. पोटांत पाणी सांचून जलोदरहि होतें. जर प्रथम हातांवर सूज आली तर ती हृदय विकृतीमुळें आली असें समजावें. हृदय विकृतींत सूज हातांकडून पायाकडे धावते व यकृत् विकृत झाल्यास प्रथम पाय सुजतात व नंतर जलोदर होतें व पायांकडून सूज हाताकडे धांवते. जर प्रथम पापण्या व चेहऱ्यावर सूज आली तर मूत्रपिंडांतील शिरांवर दाब पडून ते विकृत झाल्यामुळें आली असें समजावें. चेहऱ्यावरची व हातावरची सूज पायांवरच्या सुजेपेक्षां विशेष भयंकर व घातुक असते. चेहऱ्यावरच्या सुजेंत जर मूत्र कमी होऊं लागलें तर मूत्रपरीक्षा करून घ्यावी. म्हणजे त्यांत शरिरांतील पोषणपणाहि ओजस द्रव्य ( आल्ब्युमेन ) सांपडतें व मूत्रांत तें असलें म्हणजे प्रसूतिसमयीं आंचके येतात. हा विकार गरोदरपणाच्या उत्तरावस्थेंत गर्भ जसजसा वाढत जाऊन शिरांवर जसजसा दाब पडत जातो तसतसा होतो. या आजारांत जेव्हां भगोष्ठ फार सुजतात तेव्हां प्रसूति कष्टकारक होते, तसेंच फुटलेल्या शिरांतून जर रक्तस्राव होऊं लागला व त्यावर वेळींच उपाय न केला तर प्राणावर ही बेततें. पायांवरील शिरा फुगल्यास गर्भिणीनें चाल फीर करूं नये. फार वेळ उभें राहणें—उभ्यानें काम करणें वर्ज करावें. पायांस बॅण्डेज बांधावी, पाठीवर झोंपावें, मात्र ह्यावेळीं डोक्यापेक्षां पाय उंच राहतील असें झोंपावें. डोक्याखालीं उशी न घेतां पायाखालीं ठेवावी. डॉक्टर वैद्यांचे सल्ल्यानें योग्य ते उपाय करावे.

कुशींत दुखणें—शिरा फुगल्यामुळें हा विकार उद्भवतो. काळजावर गर्भाचा जो जोर होतो त्यापासून दुखण्याचा उगम होतो. गर्भारपणाच्या उत्तर मासांत या विकाराचा उद्भव होण्याचा संभव असतो. हें दुखणें तिसरे चौथे दिवशीं सुरू होतें. त्यामुळें गर्भिणीच्या अंगाची आग होऊन जाते. निद्रावर्धक उटणें अंगास लावल्यानें हा विकार कमी होतो.

मूळव्याध—हा विकार गरोदर स्थितींत गर्भाशयाच्या दाबामुळें किंवा आंतड्यांच्या क्रिया मंद झाल्यामुळें होतो. बहुधा पांचव्या किंवा सहाव्या महिन्यांत गुदद्वाराशीं या मोडाचे अंकुर वाढूं लागतात व पूर्ण मास होण्याचे सुमारास त्यांची संख्या वाढते. अनेक वेळां प्रसूत झाल्यामुळें अशक्तपणा आला असल्यास यापासून गरोदर स्त्रीस फार त्रास होत असतो. या मोडांतून रक्त वाहूं लागल्यास थोडासा आराम वाटतो. शौचास साधारण नरम व पातळ होईल अशी औषधीयोजना करणें. नागकेशर लोणी साखरेंतून २।३ टीस्पुन देणें.

रक्ताची वांति—रुधिराभिसरणाची स्थिती बिघडल्यानें हा विकार होतो व प्रसूतिकाळीं रक्तस्राव विशेष होण्याची भीति असते. कदाचित् एकादेवेळीं रक्त पडलें तर भीतिचें कारण नाहीं. परंतु वारंवार अशी रक्ताची वांति झाल्यास त्यापासून क्षयादि अनेक रोग जडण्याचा संभव असतो.

खोंकला—सहज स्थितीचा खोंकला असल्यास विशेष विचार करण्याचें कारण नाहीं, परंतु तो जास्त दिवस राहिल्यास किंवा रक्ताचे उलटी बरोबर खोंकला असल्यास त्याजवर लवकर उपचार करावे; खोंकल्यामुळें गर्भाला धक्का बसतो व अनेक वेळां असे धक्के बसल्यानें गर्भपात होण्याची पाळी येते, हा खोंकला कोरडा असतो व घशांत सुळसुळ करते.

दंतशूळ—हा विकार अगदीं साधारण दिसतो, परंतु मोठा दुःखदायक आहे. मज्जातंतूचे विकारानें, दांत कुजल्यानें हिरडया सुजून ठणकूं लागतात. कुजलेले दांत उपटून काढले तरी दुसरे ठिकाणीं शूळ चालू होतो, यांत मुख्य लाळ पडणारीं औषधें दिल्यानें शमन होतें.

पक्षघात—( अर्धांगवायु ) शरिराचे कोणते तरी बाजूचा एक भाग लुला होणें याजवर विशेष उपचार प्रसूतीनंतर करावे. तोंपर्यंत मलशुद्धी व तैलमर्दन सुरू ठेवावें. तसेंच पौष्टीक आहार व शक्तिवर्धक प्रयोग चालू ठेवावा.

कावीळ—हा विकार उष्णता वाढल्यानें उत्पन्न होतो. उष्णतेच्या अंगभूत यकृत् विकार व त्यामुळें अग्निमांद्याची उत्पत्ति होते. त्यापैकींच कावीळ हा विकार पित्त दूषित झाल्याचें दर्शक चिन्ह आहे. विशेषेंकरून या विकारांत डोळे नखें, लघवी यांना पिंवळा रंग येतो. यांवर पित्तशोधक चिकित्सा करावी. गाईच्या दुधांत सुंठ खडीसाखर मिळवून देणें, माक्याचा रस तूप घालून देणें.

तोंडास लाळ सुटणें—कांहीं कांहीं स्त्रियांच्या तोंडांस लाळ फार उत्पन्न होते. लाळस्रावाचे पिंड फार सुजलेले नसतात, परंतु दुखत असतात. हिरडया सुजत

नाहींत परंतु लाळ फार उत्पन्न होते; हा विकार आपोआप कमी होतो. बाभूळ, जांभूळ, आंबा यांचे काढयांत कात, फटकी घालून गुळण्या कराव्या.

छातींत जळजळणें—कित्येक स्त्रियांना तगमगूं लागतें व हा प्रकार बहुधा जेवणानंतर होतो. वांती होत नाहीं, मळमळणें, जळजळणें वगैरे होत नाहीं पण जिवास बरें वाटत नाहीं व त्यामुळें बेचैन वाटतें. पोट थोडेसें फुगल्यासारखें वाटतें याचें कारण चर्वण न करतां घाईघाईनें जेवण हें होय. यासाठीं सावकाश चर्वण करून जेवणें व एकाच वेळीं फार न खातां चार चार तासांनीं थोडथोडें खाणें.

पोटफुगी—गर्भिणीचे पोटांत अपचनानें अगर मलावरोधानें शरिरांत दोष उत्पन्न होऊन वात वाढतो व त्यामुळें आतडी फुगून त्याचा दाब पोटांत पडतो व त्यामुळें त्रास होतो, पोटास तडस लागते व त्यामुळें स्वस्थ बसवत नाहीं. या विकारापासून दूर राहणेंसाठीं वातुळ व तळलेले पदार्थ खाऊं नयेत. कोठा साफ ठेवावा. त्रिफळा व ज्येष्ठमधाचें चूर्ण अगर सोनामुखीचा काढा घ्यावा. वाल, पावटे, वांगीं, भजीं, कच्चे कांदे, वडे वगैरे वातुळ पदार्थ वर्ज करावे.

शिरा फुगणें—उदरांत गर्भ वाढत असतां, स्त्रीचे पोटांतील खालच्या बाजूवरील शिरांवर दाब पडून कंबरेखालच्या शिरांत रक्त सांठतें व त्यामुळें योनीवरील व मांड्या व पायांवरील शिरा फुगतात. गर्भाचा दाब कमी अधिक असेल त्याप्रमाणें उजव्या अगर डाव्या बाजूवरील पाय व मांड्यावरील शिरा फुगतात. बहुधा दोन्हीं बाजूंवरील पायांतल्या शिरा सारख्याच फुगत असतात. असें झाल्यास गर्भिणीनें सारखें उभें राहून काम न करतां मधून मधून पडून राहावें. किंवा पाय खुर्चीवर अगर पलंगावर ठेवून आपण खालीं जमिनीवर उताणें पडावें. असें प्रत्येक वेळीं १५-२० मिनिटें दिवसांतून पांच सहा वेळ करावें.

पायांतील पेटके—या वातवाहिन्यावर गर्भाचा दाब बसून पायांस मुंग्या येणें, पाय लुला पडल्यासारखा वाटणें, पायांतील स्नायूंचें आकुंचन होऊन पेटके येणें असे विकार होतात. यासाठीं स्वस्थ पडून राहावें. कमरेचा भाग उंच करून सपाट निजावें, पाय दाबावे अगर शेकावे.

श्वास-दमा—गरोदरावस्थेंत शेवटच्या महिन्यांत गर्भाशय मोठा झाल्यानें त्याचा फुप्फुसांवर दाब पडतो. श्वासोच्छ्वास शांतपणें न चालतां नेहमीपेक्षां ज्यास्त चालतो. अशावेळीं तक्क्या अथवा लोडास टेंकून बिछान्यावर स्वस्थ पडून राहणें.

योनिस्राव—स्त्रियांचे योनींत एक प्रकारचा चिकट पदार्थ स्रवत असतो व तो गरोदरावस्थेंत विशेष प्रमाणांत स्रवतो. यामुळें तिला फार त्रास होतो. या विशेष

स्रावानें तिला योनीचे ठिकाणीं खाज सुटणें अगर आग होणें असे विकार जाणवतात. त्रास फार होत असल्यास सोडाबाय कॉर्ब पाण्यांत विरवून त्यानें अगर ऑलिव्ह ऑईलनें योनीस पुसावें; हा स्राव धुवून काढणें योग्य होणार नाहीं. नारायण तेलाचा पिचू ठेवावा.

कंडू—गर्भाचे व गर्भिणीचे शरिरांत उत्पन्न होणारे त्याज्य पदार्थ गर्भिणीचे रक्तांतून वाहत असतात, ते घामावाटे तिच्या शरिरांतून बाहेर पडतात. घाम जिथल्या तिथें वाळल्यास ते पदार्थ त्वचेवर जमून स्त्रीच्या त्वचेला खाज येते. कित्येक प्रसंगीं ही खाज फारच भयंकर येऊन तिला झोंपहि येत नाहीं. ही खाज कमी होण्यासाठीं पाणी ज्यास्त पिणें, व सोडाबॉय कॉर्बच्या मिश्रणानें अंग पुसावें. बऱ्याच स्त्रियांच्या पोटावरील त्वचेस खाज फार सुटते, कित्येकांना जांघेंत, काखेंत खाज होते. या सर्व जागीं वरील मिश्रणाचा उपयोग करणें.

धुपणी—गरोदरावस्थेंत पुष्कळ बायकांना हा त्रासदायक स्राव होत असतो. या विकाराचें अस्तित्व गरोदरावस्थेचे पूर्वीं किंवा गरोदरपणांच्या पहिल्या कांहीं महिन्यांत होत असतें; परंतु पुढील महिन्यांत याचा फार त्रास होतो. गर्भाच्या दाबामुळें शिरांचा गोळा होऊन जसे इतर विकार उद्भवतात त्याचप्रमाणें त्याच-कारणानें हा विकार उद्भवतो. नाजुक स्त्रिया किंवा ज्यांना मुलें फार झालीं आहेत अशा स्त्रियांना हा विकार फार त्रास देतो. स्राव थोडा असेल तर दुर्लक्ष केल्यास चालेल. पण बराच स्राव होत असून त्याचा प्रतिकार केला नाहीं तर त्याच्या स्वाभाविक दाहामुळें बाह्य अवयवांच्या त्वचेला फार त्रास होतो. स्राव जोराचा नसेल तर तुरटीच्या लोशननें योनि पिचकारीनें स्वच्छ करावी. या विकारांत स्वच्छता फार ठेवणें जरुरीचें आहे. स्राव कोणत्याच उपायांनीं न थांबल्यास डॉक्टर वैद्यांच्या सल्ल्यानें योग्य ते उपाय करावे. स्राव अप्रतिबंध चालू राहिल्यास गर्भपात होण्याचा संभव असतो. आहार हलका, पौष्टीक असावा, शौचशुद्धी ठेवावी, मादक पेयें वर्ज करावीं. भरपूर विश्रांती घ्यावी. सफेत धुपणीबरोबरच बाहेरच्या अंगीं अतिशय दुःखप्रद अशी आग होत असते. ही आग या सफेत स्रावाशिवायहि केव्हां केव्हां होते आणि तिच्या बरोबर कंडू सुटतो व त्यामुळें फार त्रास होतो. कधीं कधीं हें दुखणें शिरांच्या दुःखापासून उद्भवतें व कधीं कधीं पोटाच्या खालच्या भागांत जंतु होऊन त्यापासून ती उत्पन्न होते. या विकारावर दारुहळद, किराईत, नागरमोथा, रसांजन, बेल, बिब्बा, अडूळसा यांचा काढा मध घालून द्यावा म्हणजे चांगला फायदा होतो.

# प्रकरण ७ वें.

## गर्भपात

गर्भपात अगर दुवेतणें होण्याची संवय बऱ्याच बायकांत आढळून येते. या विषयाची माहिती स्त्रियांना अवश्य पाहिजे. गर्भपातानें स्त्रियांना निरनिराळ्या प्रकारचे व्याधी होतात यासाठीं गर्भपात न होईल अशी प्रत्येक गर्भवतीनें काळजी घेतली पाहिजे. एकदोन वेळ गर्भपात झाला म्हणजे तीच पुढें संवय होऊन जाते. दुवेतल्यानंतर बाळंतपणाप्रमाणें अगदीं शांतपणें पथ्यानें राहिलें पाहिजे. अमुकच महिन्यांत गर्भपात होईल हें कोणास सांगतां येणार नाहीं. परंतु पुष्कळ प्रसंगीं गर्भधारणेपासून आठवा–पंधरावा आठवडा याच्या दरम्यान हा प्रकार घडतो. इतर वेळेपेक्षां विशिष्ट प्रसंगीं गर्भपात होण्याचा फार संभव असतो. गरोदर नसल्या प्रसंगीं ज्यावेळीं स्त्री विटाळशी बसली असती त्या सुमारास गर्भपात होण्याची फार भीति असते, म्हणून या सुमारास गर्भिणीनें जपून राहिलें पाहिजे. तिचें मन उद्विग्न संतप्त व त्रासांत असूं नये. गरोदरावस्थेंत मैथुन झाल्यास गर्भपात होण्याचा फार संभव असतो म्हणून गर्भिणीनें व तिच्या पतीनें त्या सुमारास आत्मसयमन करणें अत्यंत जरूर आहे. गर्भपाताला विशेषतः पुढील गोष्टी कारणीभूत होतात—भय, मैथुन, चिंता, मनास धक्का बसणें, जड ओझें उचलणें, पायानें अगर घोड्यावरून गाडींतून धकाधकीचा प्रवास करणें, शक्ति-क्षय करणारे ज्वरादि विकार, आत्यंतिक व्यायाम, पाय घसरून पडणें, बुक्यांचा मार, इत्यादि.

एकदम ज्या गोष्टीनें मनांत चलबिचल होते ती गोष्ट करूं नये. तसेंच चैनींत व निसर्गाविरुद्ध आचरण ठेवूं नये. गर्भाशयांच्या पूर्व मासांत दुवेतण्याचें फार भय असल्यामुळें ह्यावेळीं रात्रौ जाग्रण, दुपारीं झोंपणें, मनसोक्त फिरणें वगैरे अव्यवस्थित वर्तन सोडावें. ताप, देवी, वगैरे रोगांनीं गर्भपात होण्याचा फार संभव असतो. तसेंच कडक रेचक घेतल्यानेंहि दुवेतण्याची भीति असते. गर्भारपणीं उलटी होणारीं औषधें देऊं नयेत. पोटांत जंताची फार वाढ झाल्यानें कष्टप्रद मलावरोधानें, दंतदुखीनें व अशाच इतर कारणांनीं मनाला त्रास होऊन गर्भपात होण्याचा संभव असतो तर या गोष्टींकडेहि लक्ष पुरवावें. शिवाय गर्भपात होण्याला खालील कारणें घडत असतात.

स्त्रीच्या जननेंद्रियामध्यें व्यंग असेल तर गरोदरावस्थेंत तिला नाना प्रकारचे उपद्रव होतात. तिच्या गर्भाशयाची वाढ अपूर्ण असेल व त्या स्थितींत गरोदरपणा झाला असेल तर गर्भाशय वाढीला लागत नाहीं व गर्भपात वारंवार होण्याचा फार संभव असतो.

पाळीच्या वेळीं पोटांत दुखण्यानें मज्जातंतुवर परिणाम होऊन विटाळ साफ जात नाहीं. अशावेळीं योनि परीक्षा केली असतां गर्भाशयाची स्थिति कळून येते. अशा स्थितीमध्यें, कपडे सैल करावेत, तिचें मन चांगल्या स्थितींत राहील अशी व्यवस्था ठेवावी व तिला स्वस्थ पडून रहाण्यास सांगावें. एवढयानें कमी झालें नाहीं व गर्भपात झाला तर दुसऱ्या खेपेला तज्ज्ञ डॉक्टरला दाखवून गर्भाशयाची स्थिति सुधारण्याची व्यवस्था करावी. याप्रमाणें वेळींच काळजी बाळगली तर गरोदरपणाच्या वेळीं त्रास होत नाहीं. व बाळंतपणानंतर गर्भाशयामध्यें सुधारणा होते. फलवाहिका ( Fallopion Tubes ) स्त्रीअंड ( ovary ) व ब्रॉड लीगॅमेटस् यांमध्यें शारीरिक व्यंग असेल तर गरोदरपणामध्यें व्यत्यय येतो. गरोदरावस्थेंत योनी व ओटी यांची वाढ बरोबर नसेल तर गरोदरपणांत सुधारणें कठीण जातें. हें प्रसूतीच्या वेळेला बाळंतपणाच्या वेळेवर ठरवितां येतें.

गर्भपाताचे तीन प्रकार असतात. गर्भस्राव, अकालीं प्रसूति व गर्भभ्रंश पहिल्या तीन महिन्यांत होणारा त्याला गर्भस्राव ( mis-carriage ) म्हणतात.

तीन महिन्यानंतर व ७ महिन्यापूर्वी झाल्यास गर्भपात म्हणतात व ७ महिन्यानंतर व २८० दिवस होण्यापूर्वी झाल्यास अकालीं प्रसूति ( Premature labour ) असें म्हणतात.

गर्भाशय, व गर्भपिंड यांचा पहिल्या महिन्यांत विशेष फारसा संबंध नसल्यामुळें याच काळांत गर्भपात होतो. तिसऱ्या महिन्यांत गर्भपात झाला तर गर्भमूलक अंडें सर्वच बाहेर पडतें. याच्यानंतर वार तयार होत असल्यामुळें गर्भाचा गर्भाशयांशीं निकट संबंध येतो. ५।६ महिने झाले असतां गर्भोदक कोश फुटून प्रथम गर्भ व नंतर वार बाहेर पडते. वार गर्भाशयाला चिकटली असल्यामुळें ती गर्भाशयांचें संकोचन होऊन बाहेर पडण्यास वेळ लागतो, व अशावेळीं रक्तस्राव फार जातो. वारेचा अगर गर्भाचा अवशिष्ट भाग आंत राहील तर रक्तस्राव बंद न होतां चालू रहातो व स्त्रीला ताप, ओटीचा दाह हीं लक्षणें सुरू

होतात. कित्येक वेळां वारेचा अवशिष्ट भाग आंत राहून तो कुजतो व स्रावाला त्यामुळें घाण येऊं लागते.

कारणें:—गर्भाशयाच्या अंतरावरणांचा दाह ( Endometritis ) रक्तवाहिन्यांचा विकार, गर्भाशय स्थानच्यूत होणें, पोटावर मार लागणें, मनावर परिणाम होण्यासारखी गोष्ट होणें, सांसर्गिक ज्वर, उपदंशजन्य विष, गर्भाशयांचे विकार, गर्भकोश, गर्भोदक कोश, वार यांचे रोग, गाडींतून जातांना धक्का लागणें, संभोग, अतिशय शारीरिक श्रम, वांती, जोरानें खोकणें, शौचाच्या वेळीं कुंथणें, गरोदरपणांत पूर्वीच्या मुलाला स्तनपान करणें, योनिमार्गास दाहक औषधें लावणें-पोटांत घेणें—या कारणांनीं गर्भपात होतो.

कांहीं स्त्रियांना कांहीं कारण नसतांना एकाएकीं गर्भपात होतो. कित्येक वेळीं दरतीन महिन्यांनीं—किंवा मागें ज्यावेळेला झालेला असेल त्यावेळींच गर्भपात होतो. व अशा प्रकारचे गर्भपात टाळणें हें सर्व तिच्या पतीच्या हातांत असतें असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. ह्या स्त्रियांमध्यें गर्भपात झाल्यानंतर विश्रांती, पडून रहाणें. ब्रह्मचर्य वगैरे गोष्टी पाळावयाच्या असतात त्या पाळल्या जात नाहींत व वारंवार अशा प्रकारचे कटु प्रसंग भोगण्याची पाळी येते. गर्भाशयांचे पूर्ण संकोचन होत नाहीं त्याप्रमाणें गर्भाशयाची अंतरत्वचा (Endometrium) नवीन तयार होत नाहीं. वारंवार गर्भपात झाल्यामुळें शारीरिक व मानसिक हानी होते, इंद्रियें मूळस्थितीवर येत नाहींत व एखादेवेळीं वंध्यत्व येण्याची पाळी येते.

चिकित्सा:—शारीरिक व मानसिक विश्रांती निदान ६ महिने ते १ वर्ष पर्यंत पाहिजे. रोगी घरांत राहील तर तिच्या दिनचर्येकडे सुज्ञ माणसांनीं लक्ष दिलें पाहिजे. लघ्वीला किंवा शौचाला जातांना व उठतांना बेडपॅनचा उपयोग केला पाहिजे. कित्येकांना बेडपॅनमध्यें लघ्वी झाडा होत नाहीं, परंतु हळुहळु संवईनें तें त्रासदायक होत नाहीं. बेडपॅनमध्यें करण्याचा हेतु इतकाच कीं स्त्रीला कुंथावें लागून त्याचा दाब गर्भाशयांवर पडूं नये हाच होय. अन्न हलकें पेय-पातळ घ्यावें. दुधाचा उपयोग ज्यांना संवई नसते त्यांना तो आहार पचत नाहीं, यांकरितां तांदुळाची पेज आरंभीं घ्यावी. लघ्वीचा त्रास होत असेल तर कॅथेटरनें लघ्वी काढावी. अशा

स्त्रियांच्या मनांवर परिणाम होत असतो, तरी समजुतीच्या गोष्टी सांगून मन प्रसन्न राहील अशा प्रकारें तिच्याशीं वर्तन ठेवलें पाहिजे. बाळंतपणापेक्षां अपूर्ण बाळंतपण हें फार वाईट असतें, यांपासून क्षय, बाळंतरोग, दमा, ज्वर वगैरे होत असतात, तेव्हां आरंभापासून दुर्लक्ष करूं नये. गरोदरपणांत पुष्कळ स्त्रियांना कुंथण्याची संवय असते व त्यामुळें गर्भाशयावर दाब पडून रक्तस्राव सुरू होतो. गर्भपात झाल्यानंतर, योनीद्वारें–पडणारें–सर्व द्रव्य डॉक्टरला दाखवलें पाहिजे, व त्यांवरून गर्भबीज-गर्भाशयाच्या अंतरावरणाचे पडदे, गर्भाशयामध्यें कांहीं शिल्लक आहे किंवा काय तें कळून येतें. थोडासा भाग जरी शिल्लक राहिला तरी तो जाचक होतो व स्त्रियांच्या प्राणांवर बेततें. गरोदरपणांत योनीमध्यें नानाप्रकारचे जंतु असल्यामुळें गर्भपात झाल्यास ते जंतु गर्भाशयांत जातात. व दोषी ताप येण्याची धास्ती असते. प्रॅक्टिसमध्यें असे कांहीं लोक आढळतात, कीं गर्भपात झाला तरी स्त्रीला विश्रांति न देतां तिला घरगुती कामें करण्यास लावतात. व एखादें बाळंतकाढ्यांसारखें औषध चालू ठेवतात व यानें गुण येईल अशी त्यांची कल्पना असते. परंतु औषधांबरोबर रोगी स्त्रीनें बिछान्यांत पडून राहिलें पाहिजे व त्यांचे महत्त्व काय आहे याची जाणिव त्यांच्या गांवींहीं नसते. यामुळें रक्तस्राव महिना महिना कमी होत नाहीं, गर्भाशय शिथिल झाल्यामुळें त्यांचें तोंड वगैरे वांकडें होतें व निरनिराळ्या विकारांचे प्रादुर्भाव होतात. अशा स्थितींत संबंध करणारे महापुरुषही आढळतात; व त्या स्थितींत पुनः गर्भस्थापना होते, व ठराविक वेळ आली म्हणजे गर्भपात होतो व शेवटीं या स्त्रिया क्षय, बाळंतरोग–वगैरे विकार होऊन अकालीं मृत्युमुखीं पडतात.

औषधानें अगर यंत्रानें गर्भपात करणें–(Criminal Abortion) लग्न न झालेल्या कुमारिका-विधवा, त्याचप्रमाणें, गरोदरावस्था टाळणाऱ्या स्त्रिया, गर्भधारण झाल्याबरोबर-अगर पाळी चुकल्याबरोबर गर्भपात करणारीं निरनिराळीं कडक औषधें पोटांत घेऊन, बाहेरच्या भागांला लावून, व आंत ठेऊन, गर्भपात करण्याचे प्रयत्न करीत असतात. गर्भाशयांमधील गर्भबीज–या औषधांनीं बाहेर पडलें नाहीं व रक्तस्राव सुरू झाला, तोंपर्यंत गर्भपात झाला असें म्हणतां येणार नाहीं. कित्येक वेळां हा गर्भपिंड मरुन आंतल्याआंत राहतो. गर्भपात करण्याकरितां कोणी पोटांवर लाथा, बुक्की मारतात, कोणी उड्या मारणें, नाचणें अशासारखे चाळे करीत असतात तर

कोणी उकिडवें बसून गुडघे पोटावर दाबत असतात. खरें पाहिलें असतां हीं औषधें, व क्रिया जननेंद्रियांच्या भागाचा दाह उत्पन्न करीत असतात. या उपायांनीं गर्भपात न होतां अतिसार, पोटदुखी, लघ्वीची आग, कमर, पाठ दुखणें, उन्हाळे, उलट्या–व थकवा अशीं लक्षणें मात्र होतात; एखादे वेळीं या उपायांनीं मृत्युहि येतो. आंतल्या बाजूला एखादी तार गर्भाशयांच्या ग्रीवेमध्यें घालून अगर औषध घालून तेणेंकरून गर्भाशयांचा संकोच होईल अशा-प्रकारचा कित्येकांकडून प्रयत्न करण्यात येतो. ह्या गोष्टी अंधारांत होत असल्यामुळें एखादे वेळीं हीं यंत्रें गर्भाशयांत न जातां मूत्रमार्गांत अगर गर्भाशयाच्या बाजूला जाऊन तो भाग फाडतात व त्यापासून ओटीचा दाह, वगैरे विकार होऊन हें दुखणें अत्यावस्थेला पोंचून शेवटीं चांगल्या तज्ज्ञ अशा डॉक्टरला दाखवणें भाग पडतें. हीं औषधें अगर हे उपाय माहित नसतां वापरणें फार धोक्याचें आहे. ह्यांपासून जीव व अब्रु वांचविण्याचा प्रयत्न केला तरी या दोन्ही गोष्टी बाजूला राहून एकादे प्रसंगीं तुरुंगांत जाण्याची पाळी येते ! तेव्हां अशा मार्गांत सुज्ञानें न पडणे बरें. मातापित्यांनीं गाजावाजा न करतां अशा बाईचें त्या इसमाशीं लग्न करून देणें अगर अनाथाश्रमांत सोय करणें ह्या गोष्टी उत्तम. पुष्कळवेळां अनिवार्य प्रसंगीं डॉक्टरला गर्भपात करण्याची पाळी येते–परंतु त्याला सुद्धां ह्या गोष्टी सिद्ध करून दुसरे मदतनीस घेऊनच हे उपाय करावे लागतात.

गर्भपात व वंध्यत्वः— कित्येक वेळां असें आढळून येतें कीं, एकदां गर्भपात अशा प्रकारें झालेला असला म्हणजे पुढें गरोदरपणा येत नाहीं, व त्यामुळें मनांवर परिणाम होतो, अशा वेळीं आरंभापासूनचा इतिहास पाहिल्यास गर्भपात झाला त्यावेळीं योग्य ती काळजी घेण्यांत आली नाहीं असें आढळून येतें.

गर्भाशयाची अपूर्ण वाढ, गर्भोत्पत्तीसंबंधीचें अज्ञान, अशा स्त्रीला विवाह केल्यानंतर गरोदरपण आलें व त्यावेळीं योग्य ती शारीरिक काळजी न बाळगली तर त्यामुळें गर्भपात होतो. अशामध्यें स्त्रीअंड-ओटीमध्यें शूळ वगैरे विकार होतात व वंध्यत्व येतें.

योनीमार्गाला क्षत पडणें, व अगोदर गर्भपात झाल्यामुळें स्नायु शिथिल होणें, यामुळें गरोदरपणांत इंद्रियांची जागा बदलते ( Dislocation ).

यापैकीं गरोदरपणांत गर्भाशय मागें पडणें ( Retroversion ) हें महत्त्वाचें कारण असतें. क्षत, पेशीमध्यें शिथिलता, कपड्यांचा दाब, लघ्वीला

जाण्याची टाळाटाळ करणें, खालीं वर वांकणें, अगर कांहीं उचलण्याचा प्रयत्न करणें, अगर पाय घसरून पडणें ह्या गोष्टी बेंबीच्या खालीं गर्भाशय असतो तोंपर्यंत होण्याचा संभव असतो.

गर्भाशय मागें पडलेला आहे हें खालील वर्णनावरून समजून येतें. नेहमींपेक्षां लघ्वीला वारंवार जाण्याची इच्छा होणें, दुखावा, कमर दुखणें, व शौचाच्यावेळीं त्रास होणें. हीच स्थिती बरेच दिवस चालली तर लघ्वीचा रंग बदलतो व त्यांमध्यें फरक होतो. लघ्वी आंत कोंडून राहिली म्हणजे आंतल्या बाजूला मूत्र येतें, बाजूच्या भागांतून जंतूचा प्रादुर्भाव होतो, व मूत्राशयाचा दाह होतो. ( Cystitis ) वेळींच काळजी घेतली नाहीं, तर आंतील गर्भपिंड मरतो अगर गर्भपात होतो. गर्भाशयाच्या भिंतींवर ( walls ) वारंवार दाब पडल्यास रुधिराभिसरणामध्यें व्यत्यय येतो व गर्भपात होतो.

अशा स्थितीमध्यें डॉक्टरांचा सल्ला घ्यावा. येथें औषधांचा उपयोग होत नाहीं व हॉस्पिटलशिवाय घरीं व्यवस्था होणें कठीण असतें.

गर्भाशय भ्रंश ( Prolapse ) व योनीच्या भींती शिथिल होणें असें गरोदरपणांत निरनिराळे उपद्रव होतात.

आतां गर्भपाताचीं चिन्हें कशीं असतात तें पाहूं. डोकें दुखून फार वेदना होणें, डोळयांपुढें अंधेरी येणें, एकाएकी स्वच्छ न दिसणें, घोटयांमागें पायावर व डोळ्यावर सूज येणें, श्वासोच्छ्वासाला अडथळा वाटणें, लघवी कमी व लाल होऊन त्यांत आग–जळजळ होणें व योनी मार्गांत रक्तस्राव सुरू होणें अशीं लक्षणें होतात. प्रथमारंभीं गर्भिणीस अगदीं थकल्याप्रमाणें होऊन मग विशेषें-करून पाठींत फुटाफूट होते व त्यामुळें तिची स्थिति अगदीं बेचैन होते. इतक्यांत प्रसूतीचीं चिन्हें दिसूं लागतात, प्रसव वेदना सुरू होतात व त्या पाठीच्या भागांत उत्पन्न होऊन कमरेंतून पोटांत येतात. स्राव सुरू होतो व राहून राहून वेदनांचा जोर जास्त होतो, वांतीसुद्धां होते. या त्रासानें साधारण ज्वराप्रमाणें अंग तप्त होऊन गर्भ बाहेर पडतो. सर्वच स्त्रियांना अशीं लक्षणें होतात असें नाहीं. ज्या स्त्रियांस गर्भपाताची संवय असते, त्यांस मात्र वरप्रमाणें स्राव न होतां साधारण वेदना होतात न होतात इतक्यांत गर्भ पडून जातो व अशांची प्रकृतीहि लौकरच सुधारते. या विकारांत प्रत्येक स्त्रीच्या प्रकृतीनुरूप चिन्हें व त्रासमुद्धां कमजास्त

होतो. कित्येकांस रक्तस्राव आणि वेदना थोडयाफार होऊन गर्भ पडतो व मागा-हून गर्भ असलेली पिशवी पडते. ही पिशवी आंत असेपर्यंत रक्तस्रावाची फार भीति असते. ही पिशवी ( गर्भाचीं वेष्टनें ) पडून गेल्यावर कित्येकांना ताप भरतो आणि कित्येकांना धनुर्वातहि पण होतो. कित्येकांच्या गर्भपाताबरोबर त्याचीं वेष्टणें सुद्धां बाहेर येतात; कित्येकांचें पोट फुगून मलमूत्र कोंडतें व छातींत आंवळून धरल्यासारखें वाटतें. असे अनेक प्रकार होऊन गर्भपात होतो. साधारणपणें गर्भ-पातामध्यें रक्तस्राव ज्यास्त होणें हें धोक्याचें चिन्ह आहे.

गर्भपाताचीं चिन्हें दिसूं लागतांच त्याच्या प्रतिकाराची शक्य तों तज-वीज वैद्य डॉक्टरच्या सल्ल्यानें करण्यास क्षणाचाही विलंब लावूं नये. प्रथमतः गर्भिणीनें अंथरुणावर स्वस्थ पडून राहावें. ताठ उभ्या स्थितींत कोणतेहि इलाज करूं नयेत. डोकें अंगापेक्षां खालीं असावें, सौम्य खाणें द्यावें. मादक पदार्थ देऊं नयेत. सर्व उपाय थकून जर गर्भपात झाला तर बेफिकीर न राहतां योग्य प्रसूतीनंतर जेवढी शुश्रूषा व काळजी घेण्यांत येते तेवढी घेणें. योग्य प्रसूतीपेक्षां दुवेतण्याची स्थिती फार भयंकर असते. अशा स्थितींत भरपूर विश्रांती, व पुनः असा प्रकार न होण्यासाठीं हवाबदल करणें, शक्तिवर्धक, पौष्टिक औषधें **क्विनाईन** व **लोहयुक्त कल्प** अगर **प्रवाळ** व **सुवर्णमाक्षिक** अशीं औषधें सुरूं ठेवावीं. प्रकृतीस मानवेल इतका नियमीत व्यायाम घ्यावा. हलका, पौष्टीक व पाचक असा आहार चालू ठेवावा. अशा वागणुकीनें पुन्हां गर्भपाताचा प्रसंग उद्भवणार नाहीं. ज्या स्त्रीच्या पोटीं गर्भ ठरतच नाहीं तिनें पतीपासून—विषय सुखापासून अलिप्त राहावें. अशा स्त्रियांनीं गर्भपात झाल्यानंतर अगर वारंवार होणारा गर्भपात टाळण्याकरितां निदान एक वर्ष ब्रह्मचर्य पाळावें.

पुष्कळ गरोदर स्त्रियांना—विशेषेंकरून पहिलटकरीणीस खोटया वेदना सुरू होतात. या खोटया पोटदुखीच्या वेदना प्रसूतीच्या वेळच्या वेदनाप्रमाणें होतात. परंतु त्यांच्यामुळें प्रसूति होत नाहीं. प्रसूतीपूर्वी कित्येक दिवस व कित्येक वेळां या वेदना होत असतात. परंतु प्रसूती काळच्या वेदना व या वेदना यांत अंतर एव-ढेंच असतें कीं, या मिथ्या वेदना नियमित स्थळींच होत नाहींत. कधीं पोटावर तर कधीं पाठींत व केव्हां कुशींत अशा होत असतात. तथापि या वेदनांनीं गर्भपात सहसा होत नाहीं. पण या वेदनांकडे दुर्लक्ष करून भागणार नाहीं. एकादे

वेळीं क्वचित् प्रसंगीं त्याच्यापासून गर्भपात होण्याचा संभव असतो. गर्भारपणाच्या अखेर अखेर जर हा विकार होऊं लागला तर पोट व आंतडी यांकडे लक्ष दिलें पाहिजे. पोट साफ नसेल तर एरंडेल घेऊन कोष्ठशुद्धी करावी व हलका आहार घ्यावा. इतकेंहि करून पोट दुखणें थांबलें नाहीं व रात्रीं झोंप नाहींशी झाली तर वैद्य-डॉक्टरला बोलवावें; कारण या दुखण्यानें गर्भिणीची शक्ति कमी होऊन तेवढयांतच खऱ्या प्रसूति वेदना होऊं लागतात व प्रसूति सुखानें होणें अशक्य होतें.

ज्यांना अपथ्यानें व विरुद्ध आहार-विहारानें गर्भपात झाला असेल त्यांनीं यांत सांगितल्याप्रमाणें काळजी घ्यावी व पुढें तसा प्रकार न होण्यासाठीं दक्षता ठेवावी. ज्यांना नियमित मुदतींत गर्भपाताची संवय असते त्यांनीं आयुर्वेदांत सांगितलेले खालीलप्रमाणें उपाय चालू करावे. म्हणजे दुसऱ्या पाळीस गर्भपाताची भीति राहणार नाहीं.

( १ ) पहिल्या महिन्यांत गर्भ स्रवत असला तर ज्येष्ठमध, सागाचें बीं, भुई कोहाळा, देवदार यांचें समभाग चूर्ण पाण्याशीं द्यावें. ( २ ) दुसऱ्या महिन्यांत गर्भपात होत असल्यास आपटयाची साल, काळे तीळ, मंजिष्ठ, शतावरी यांचें समभाग चूर्ण गाईचे दुधांतून द्यावें. ( ३ ) तिसऱ्या महिन्यांत गर्भस्राव होत असला तर गुळवेल, विदारीकंद ( भुई कोहाळा ) गहुला व उपळसरी यांचें समभाग चूर्ण दुधांतून द्यावें. ( ४ ) चवथ्या महिन्यांत गर्भस्राव होत असला तर धमासा, उपळसरी, रास्ना, पद्मकाष्ठ, ज्येष्ठमध यांचें समभाग चूर्ण दुधांत द्यावें. ( ५ ) पांचव्या महिन्यांत गर्भस्राव झाला असतां डोरलीमूळ, रिंगणमूळ, वड-पिंपळ-उंबर वृक्षांच्या पारंब्या, साली, मूळ हीं समभाग घेऊन त्यांचा काढा अगर चूर्ण दुधांत द्यावें वर दूध पीत जावें. ( ६ ) सहाव्या महिन्यांत गर्भपात होत असल्यास पिठवण, चिकण्याचें मूळ, शेवग्याची साल, गोखरू, ज्येष्ठमध यांचें चूर्ण दुधांत द्यावें किंवा काढा करून देऊन वर दूध द्यावें. ( ७ ) सातव्या महिन्यांत गर्भस्राव होत असल्यास शिंगाडे, कमळाचे देंठांतील पांढरे तंतू, मनुका, तळयांतील कचरा, ज्येष्ठमध यांचें चूर्ण करून दूध व खडीसाखर घालून त्याची लापशी करून द्यावी. ( ८ ) आठव्या महिन्यांत गर्भस्राव होत असल्यास कवठ, बेल काचरी, डोरली मूळ, कडू पडवळ, ऊंस, भारंग मूळ, यांचा काढा करून त्याच्या चतुर्थांश दूध घालावें, नंतर

पुन्हा काढा करून फक्त दूध शेष राहिलें म्हणजे द्यावें. (९) नवव्या महिन्यांत गर्भस्राव होत असल्यास उपळसरी, धमासा, भुई कोहाळा, ज्येष्ठमध, यांचा काढा दूध व पाणी समप्रमाण घालून करावा व फक्त दूध अवशेष राहिल्यावर द्यावा. **अशाप्रकारची ही दरमहिन्याची सूक्ष्म चिकित्सा पाश्चात्य वैद्यकांत कोठंच सांगितली नसून आयुर्वेदानें सूक्ष्म विचार करून सांगितली आहे** व लेखकानें तिचा अनुभव घेतलेला आहे.

प्रत्येक महिन्यांची औषध तयार करून घेण्याची ही दगदग ज्यांना शक्य होणार नाहीं त्यांनीं स्त्री गरोदर राहिल्या वेळेपासून प्रसूतीचा समय येईपर्यंत ( नऊ महिने पूर्ण होईपर्यंत ) गर्भिणी गर्भरक्षक रस—गर्भपाल रस ( गोळ्या ) हीं पेटण्ट औषधें गरोदरपणापासून चालू ठेवल्यास गर्भपात-स्राव न होतां गर्भ व गर्भिणी यांची प्रकृति चांगली राहून प्रसूतावस्था सुद्धां सुखकर होते असा अनुभव आहे.

गर्भपात त्याचप्रमाणें जननेंद्रियांसंबंधींचे शारिर-इंद्रिय-विषयक ज्ञान वयांत आलेल्या स्त्रीपुरुषांना मिळालें पाहिजे. तारुण्यामध्यें हें ज्ञान न मिळाल्यामुळें—मुष्टिमैथून, उपदंश, पुप्रमेह वगैरे विकार जडतात व विवाहितावस्थेमध्यें हे विकार चालू असतील तर गर्भधारणा न होतां परस्परांना शारीरिक परिणाम भोगावे लागतात.

निसर्ग आपलें काम करतो, व त्यामुळें अब्रू जाण्याची पाळी येते—व पुष्कळसे नवमतवादी तरुण गर्भपात वगैरे करण्याच्या नादांत असतात. एखादा ढोंगी इसम पैसे खाऊन वाटेल तीं औषधें देऊन प्राणांतिक संकट आणतो—कारण अशा प्रकारचीं औषधें इष्ट हेतु साध्य न करतां अपाय करीत असतात. तेव्हां तरुणांनीं, पाऊल वांकड्या मार्गावर पडलें तरी या फंदांत पडूं नये.

आतां गरोदरावस्थेंत गंभीर स्वरूपाचे व सांसर्गिक वगैरे कारणांनीं जे कष्टप्रद विकार होतात त्याबद्दल विचार करूं.

---

# प्रकरण ८ वें

## कित्येक घातुक व्याधि

गरोदरपणांत योनीमध्यें निरनिराळ्या प्रकारचे जंतु ( Bacteria ) असतात. योनीमधील स्राव ॲसीड असल्यामुळें या रोगोत्पादक जंतूंचें कांहीं चालत नाहीं. या स्रावामधील आम्लयुक्त धर्म कमी झाला म्हणजे या रोगोत्पादक जंतूंचा संभव होतो. गरोदर स्त्रीची प्रकृति निरोगी असेल तर ग्रीवा चिकट अशा स्रावांमुळें ( Plug of mucus of alkaline reaction ) बंद असतें व त्यामुळें साध्या जंतुचा प्रवेश आंत होऊं शकत नाहीं. बाह्य भाग स्वच्छ ठेवले नाहींत तर आंतील स्राव कुजतात, व आंतडी व त्वचा यांमधील जंतूची गति सुरू होते. योनीमधल्या ग्रंथी ( Bartholin Glands ) दूषित होतात व त्यामध्यें पू उत्पन्न होतो. बाळंतपणापूर्वी या गोष्टींची काळजी बाळगली नाहीं तर सूतिका-ज्वर होण्याला वेळ लागत नाहीं. हे भाग त्रिफळ्याच्या, कडुनिंबाच्या अगर दारुहळदीच्या काढ्यांनीं किंवा पोटेश परमॅंगनेट सारख्या जंतुनाशक औषधांनीं धुतले पाहिजेत व हे भाग धुण्यापूर्वी हात व बोटें स्वच्छ केलीं पाहिजेत.

पू प्रमेह:—नवऱ्याला पू-प्रमेहाचा विकार असला तरी स्त्रियांमध्यें गरोदरपणा येतो, परंतु त्यांपासून स्त्रीला नानाप्रकारचे विकार होतात व शिवाय गर्भ पूर्णावस्थेस न पोंचल्यामुळें गर्भस्राव, गर्भपात नेहमीं होत असतात. इतक्यांतूनहि बाळंतपण आलें तर मुलाला ह्या विकारांची बाधा होते ती निराळीच. स्त्रीला पू-प्रमेहाचा विकार आहे किंवा नाहीं हें तिला विचारणें कठिण जातें. फार काय पुष्कळ स्त्रियांना आपल्या पतीला हा विकार असावा याची जाणिव अगर शंका नसते व असें असणें साहजिकच आहे. लघ्वीच्या ठिकाणीं आग, पीडा, व लघ्वी होतांना तिडीक लागणें-पुवासारखा स्राव होणें यांवरून हा संसर्गजन्य विकार आहे असें समजून स्त्रीला विश्वासांत घेऊन, तिचें मन न दुखवतां पती-पत्नीनीं आपली प्रकृति डॉक्टरला दाखवून औषधोपचार करावा.

Salpingitis and pelvic Abscess:—फलवाहक नलिकेमध्यें सूज येऊन ओटीमध्यें दुखूं लागतें, गर्भाशय स्थिर होतो, व रोगी स्त्रीला फार त्रास होतो. तज्ज्ञ डॉक्टरला दाखवून इलाज करावा.

Tuberculous infection:—फलवाहक नलिका, गर्भाशय, स्त्रीअंड व बाजूचे भाग यांमध्यें क्षयांच्या विषामुळें गरोदरपणांत निरनिराळे उपद्रव होतात. आरंभीं हें समजणें कठिण जातें. प्रथम स्त्रियांच्या ग्रंथी जाड झालेल्या आहेत किंवा नाहींत हें पाहून फलवाहक बीजांमधील द्रव तपासून पाहिल्यास क्षयाचे जंतु सांपडतात व चिकित्सा करणें सोपें जातें.

उपदंशाच्या विषाची वरीलप्रमाणेंच स्थिति असते. योनीच्या बाजूला व्रण आढळतात, तरी वॉसरमन टेस्ट करून उपचार करावा. गरोदरपणांत उपदंशजन्य विषावर उपचार करूं लागलें म्हणजे पांडुरोगाचीं चिन्हें होतात. अशा वेळीं रक्त तपासून पहावें. पचनेंद्रिय न बिघडेल अशा प्रकारची काळजी बाळगावी. रोगी स्त्रीची प्रकृती चांगली आहे, गर्भाशयाचा आकार वाढत आहे यांवरून गर्भ जिवंत असून आपली चिकित्सा योग्य तऱ्हेनें चालली आहे असें समजण्यास हरकत नाहीं; याच्या उलट प्रकृतींत फरक होईल तर आंतील गर्भपिंड मेला आहे असें समजावें.

७–८ महिन्यानंतर गर्भाची हालचाल व हृदयाचे ठोके ऐकूं येणें गर्भ जिवंत असल्याचें लक्षण होय. ५ ते ७ महिन्यापर्यंत कांहीं स्त्रियांना गर्भाची हालचाल वाटत नाहीं अशा तक्रारी करणाऱ्या आढळतात, व त्यांना गर्भ मेला असावा असें वाटतें, परंतु ७ व्या महिन्यानंतर गर्भाचे हृदयाचे ठोके ऐकूं येत असल्या-मुळें तिची खात्री करून तिला निराश न करतां, तिची मनोवृत्ती उल्हासित होईल अशा तऱ्हेची काळजी डॉक्टरनें बाळगिली पाहिजे.

गरोदरपणांत निरनिराळ्या प्रकारच्या विकृती होत असतात, त्यांपैकीं कित्येक विकारांचें वर्णन सामान्य जनतेला कळणें कठिण असल्यामुळें कोणते विकार होतात एवढी माहिती समजावी व शिवाय हे विकार हॉस्पिटल अगर तज्ज्ञ डॉक्टर यांच्या सल्ल्याखेरीज बरे होणारे नसल्यामुळें त्याचें वर्णन खालील प्रमाणें थोडक्यांत केलेलें आहे.

Ovarion Tumour:—स्त्रीअंडामध्यें गांठ झाली म्हणजे बाळंतपणा व गरोदरपणा यांमध्यें व्यत्यय येतो. ह्या विकाराची परिक्षा ती लहान असेल तेव्हांच झाली पाहिजे. गरोदरपणांत गर्भाबरोबर तिची वाढ होत नाहीं. ही ग्रंथी आहे किंवा नाहीं हें समजण्याकरितां मूत्राशयांतील लघ्वी बाहेर काढून व योनीपरीक्षा

करून ठरविलें पाहिजे, व त्यानंतर शस्त्रवैद्यांच्या सल्ल्यानें योग्य तो उपचार केला पाहिजे.

( Fabromyomata of the uterus:—ह्या ग्रंथी गर्भाप्रमाणें वाढत असतात. ज्यांना ह्या ग्रंथी असतात त्यांना गरोदरपणा येत नाहीं. ह्या ग्रंथीचे तीन भाग कल्पलेले आहेत. सबपेरीटोनीअल, इंटरस्टीशीअल ( फटीमध्यें ) व सबम्युकस. Subperitoneal:—ह्या ग्रंथी बाहेरून तपासतां येतात.

ह्या ग्रंथी ॲबडॉमीनला चिकटत नसल्यामुळें, ती ग्रंथी वरून सरू शकते. ह्या ग्रंथी गर्भाशयाच्या एका भागावर होतात व गर्भाशयाच्या स्नायूला स्पर्श करतात. गर्भाशयाच्या स्नायूला कोठपर्यंत संबंध आलेला आहे यावरून या ग्रंथीचें महत्त्व कळून येतें. ह्या ग्रंथी उदराच्या पडद्यावर असतील तर बाळंतपणाच्या वेळेला त्रास होत नाहीं.

Interstitial myomata:—ह्या ग्रंथी गर्भाशयाच्या भिंतींत ( wall ) असतात, त्यांच्यामुळें गरोदरपणांत प्रतिबंध होत नाहीं.

Submucous—Fibromyomata:—ह्या ग्रंथी गर्भाशयाच्या अस्थायी गर्भकोशा ( decidua ) खालीं असतात

गर्भाशयाला दुष्ट व्रण होणें, ( cancer of the uterus )

ह्यांत तीन प्रकार आहेत:—१ ग्रीवेला व्रण होऊन योनीपर्यंत जाणें ( २ ) ग्रीवेला व्रण होऊन गर्भाशयापर्यंत जाणें ( ३ ) सर्व गर्भाशय व्रणानें व्यापणें.

स्तनांत दुष्ट व्रण होणें:-(Cancer of the breast) गरोदरपणांत स्तनांच्या बोंडीजवळ जाड गांठ उत्पन्न होते, परंतु ह्याची वाढ जोराची नसते. शरीरप्रकृति आजारी असेल, बाळंतपणें बरीच झालीं असतील, अशक्तता असेल तरच हा विकार होण्याचा संभव असतो. अनिवार्य प्रसंगीं शस्त्रक्रियेनें स्तन कापून टाकावे लागतात. स्तन कापले तरी त्याचा गर्भाशयावर परिणाम न होतां प्रसुति सुखरूप होते.

बाह्य इजा:—कौमार्यावस्थेंत जर शारीरिक इजा झाली असेल तर लग्न झाल्यानंतर बाळंतपणांत त्रास होण्याचा संभव असतो. उदाहरणार्थ एकाद्या मुलीला कांहीं शारीरिक जखम होऊन तिला बरेच दिवस अंथरूणांत पडून रहावें लागलें व त्यामुळें हालचाल बंद झाली तर त्यामुळें कटिरास्थि वाढण्यामध्यें प्रतिबंध येतो. बाळंतपण होणें कठीण जातें. तारुण्यावस्थेंत सांध्याला सूज

येत असेल, व त्यांमध्यें क्षयांचे जंतू असतील, तरी सुद्धां वरीलप्रमाणेंच त्रास होण्याचा संभव असतो.

पाठीच्या मणक्यांची वक्रता असणें, गर्भाशयाची किंवा आंतड्यांची गरोदरपणापूर्वी कांहीं रोगांमुळें शस्त्रक्रिया करण्याची पाळी येणें, अंतर्गळ ( Femoral Hernia ) वगैरे गोष्टींचा बाळंतपणापूर्वी विचार करून त्याप्रमाणें वागलें पाहिजे. ह्या गोष्टीचा विचार न केल्यास आयत्यावेळीं फजिती होण्याचा संभव असतो. मधून मधून रक्तस्राव होणें, ह्यांचाहि विचार करून ताबडतोब तें बंद करण्याची व्यवस्था केली पाहिजे.

पोटावर मार बसल्यानें, पडल्यानें, गोळी मारून घेतल्यानें, आत्महत्या करण्याचा प्रयत्न केल्यानें, विषारी औषधें पोटांत गेल्यामुळें गरोदर स्थितीवर परिणाम होतो.

बंदुक स्वतः मारून घेणें अगर दुसऱ्यानें मारणें हें पोटामधील होणाऱ्या इंद्रियांच्या जखमांवर अवलंबून आहे व हें शस्त्रवैद्यांचें काम आहे. पोटावर मार बसला अगर नवऱ्यानें अगर दुसऱ्या कोणी रागानें ठोंसा मारला तर गर्भ मरून जातो, व ताबडतोब स्त्रीचा जीव वांचवण्याकरितां शस्त्रक्रिया करावी लागते. अफूसारखीं औषधें घेणें गर्भिणीच्या मृत्यूला कारण होतें, व त्यावेळीं शस्त्रक्रिया केली तर मूल जिवंत राहूं शकतें. अविवाहित कुमारिकांना गरोदरावस्था प्राप्त झाली तर अब्रूकरितां नानाप्रकारचीं औषधें घेऊन गर्भपात करण्याचा प्रयत्न करतात, व त्यासंबंधींच्या औषधांचा त्रास होतो तो होतोच परंतु गर्भपात न होतां निराळे विषरक्तजन्य विकार मात्र होतात. ह्या औषधांचा गर्भावर परिणाम न होतां मूत्रपिंड, आंतडीं व मूत्रमार्ग ह्यांवर परिणाम होतो. अशा प्रकारांत लक्षणांवरून मूत्रल व उत्तेजक औषधें घेतलीं असतां बरें वाटतें.

या औषधांचा गर्भावर परिणाम झाला आहे किंवा नाहीं हें दर आठवड्याला गर्भाशयाची वाढ कशी आहे, यांवरून तपासून पाहिल्यास आढळून येतें. घरांमध्यें काम करीत असतां पाय घसरून पडल्यामुळें गर्भाला धक्का बसतो. आंतडीं फाटून रक्तस्राव होतो अशावेळीं शस्त्र वैद्याला ताबडतोब दाखवून स्त्रीला हॉस्पिटलमध्यें ठेवावी. शरीर भाजणें—हें भाजलेल्या स्थितीवरून कळून येतें. गुदद्वार व पेरीनीयम हा भाग भाजला असतां गर्भाशयावर परिणाम होऊन गर्भपात होतो.

# आजच्या स्त्रियांचें आरोग्य

गिरण्यांत काम करणाऱ्या गरोदर स्त्रिया यांना खुली हवा, व काम करतांना बसण्याला उत्तम जागा मिळाली तर त्याचा फायदा होऊं शकतो, व त्यावेळीं इतर अल्पशीं दुखणीं असलीं तर त्यांचा वाईट परिणाम होत नाहीं. भिती, दुःख वगैरे मनावर परिणाम होणाऱ्या गोष्टींचा गर्भावर वाईट परिणाम होतो. गिरणींत काम करणाऱ्या स्त्रियांमध्यें रक्तजन्य विषारी परिणाम (Toxemia) होण्याचा जास्त संभव असतो हें लक्षांत ठेवावें. गरोदरपणांत स्वस्थ बसून रहाणें केव्हांही चांगलें नाहीं. शारीरिक व मानसिक त्रास न होईल, पोटाला ताण न पडेल अशा प्रकारचें काम करावें. कामामुळें आंतड्यांचे—गर्भाशयाचे स्नायूंना जोर मिळतो. ते शिथिल होत नाहींत व त्यामुळें बाळंतपणाच्या वेळेला त्रास होत नाहीं.

गरोदरपणांत दूषित–मुदतीच्या तापाची भिती असते. साधारणतः जे ताप नेहमीं येण्याचा संभव असतो त्यांचेंच वर्णन खालीं दिलेलें आहे.

इन्फ्लूएंझाः—( Influenza ) घसा खवखवणें, गलग्रंथीची वाढ, नाक व घसा चोंदणें, गुदद्वारांत उष्णतामान १०१ ते १०२ असणें, नाडी १०० ते १२०, श्वासोश्वास ३० सर्वांग दुखणें, अतिसार अगर मलावरोध, थोडा खोकला, तहान, भूक नसणें व डोकें दुखणें–हीं मुख्य चिन्हें असतात. नाक व घसा लाल झालेला असतो, व जिभेवर पांढरा थर असतो. या तापाचा जोर २ ते ४ दिवस असतो. ताप गेल्यानंतर थोडा खोकला रहातो, अशक्तता फार येते, कान दुखतात, व कपाळ मधून मधून दुखत असतें. तापाचा जोर जास्त असेल तर ब्रँकोन्युमोनियाचीं चिन्हें होऊं लागतात, लघ्वीमध्यें ग्लोब्युलीन, व कास्ट नांवाचा पदार्थ सांपडतो, व टॉक्सीमीयाचीं लक्षणें होऊं लागतात, गर्भपात होतो व रोगी मरतो. स्त्रीचें जीवित हें टॉक्सीमीयाच्या कमीजास्तीपणावर अवलंबून असतें. ह्या तापाची सांथ असते व ही सांथ सुरू झाली तर गरोदर स्त्रीनें खालीलप्रमाणें काळजी बाळगली पाहिजे. गर्दीच्या ठिकाणीं जाऊं नये. नाक, घसा हीं मिठाच्या पाण्यानें रोज स्वच्छ धुवावींत. घरामध्यें कोणाला हा ताप आला तर गर्भिणीला दुसरीकडे नेऊन ठेवलें पाहिजे. हा विकार रोग्यांच्या श्लेष्म–कफ यांच्याद्वारां पसरत असतो. हा ताप आला तर ताबडतोब तज्ञ अशा डॉक्टराच्या देखरेखीखालीं ठेवावें. मलावरोध दूर करावा, अलकालइन वॉटर्स घ्यावींत. फळांचे रस प्यावेत. मुगांचें पाणी,

पेज, अशा प्रकारचें हलकें अन्न असावें. मानसिक त्रास न होईल अशी काळजी बाळगावी. ताक पिण्यास द्यावें. एनिमा रोज घ्यावा. स्पंजिंग करावें. टॉक्सीमीया होण्याचा जास्त संभव असल्यामुळें डॉक्टरनें प्रथमपासून तो न होऊं देण्याबद्दल काळजी बाळगावी. गर्भपात करण्याचा प्रयत्न करूं नये.

फुप्फुसांमधील लघु श्वासनलिकेचा दाहः—( Brancho Pneumonia ) गरोदरावस्थेंत फुप्फुसांचा संकोच व फुप्फुसांची खालची बाजू बिघडण्याचा पुष्कळ संभव असतो. गर्भाशयाचा दाब उरोदर पटलाच्या गतीला व फुप्फुसांमधील रुधिराभिसरणाला विरोध करीत असतो. सर्दी, थंड हवा लागणें, व इन्फ्लुएंझाचीं सर्व लक्षणें होत असतात. ह्या तापांमध्यें दुसऱ्या विषारी जंतुचा प्रादुर्भाव होतो; त्यावेळीं कफ होऊन थोडा थोडा पडूं लागतो, नाडी व उष्णतामान कमी जास्ती होतें, श्वासोश्वास वाढतात व टॉक्सीमीया होऊं लागतो. हृदय, व फुप्फुस यांच्या बिघडण्यावर रोगी स्त्रीचें जीवित अवलंबून असतें. नाडी व श्वास जलद चालणें हें जोराचें व धोक्याचें लक्षण समजावें. कफ पुवासारखा पडत असतो. गर्भावरही परिणाम होतो. बाळंत झाल्यास मूल जगूं शकतें परंतु मातेला धोका असतो.

रोग प्रतिबंधक उपायः—नाक व घसा मिठाच्या पाण्यानें स्वच्छ धुवावेत, गुळण्या कराव्यात. गरोदरपणांत नाका गळ्याच्या अंतस्त्वचेंत संकोच ( Conjestion ) झाल्यामुळें वारंवार त्रास होत असतो. नाक न चोंदेल अशा प्रकारची व्यवस्था ठेवावी.

चिकित्साः—रक्ताचा दाब व हृदयाची क्रिया तपासून घ्यावी. वाटेल तेथें थुंकूं नये. पुष्कळ वेळां कफ कमी होतो व हा दूषित कफ पोटांत आंतड्यांमध्यें जातो. व तेथें टॉक्सीमीया उत्पन्न करतो. फळांचे रस, एनिमा घ्यावा व हवा पालट करावी. ह्या लोकांना फुप्फुसांचा क्षय होण्याची धास्ती असते, या करितां मधून मधून थुंकी व कफ तपासावा.

भविष्यः—( Prognosis ) सांगणें फार कठिण असतें. श्वासोच्छ्वास, उष्णतामान, नाडी व आंतड्यांची स्थिति योग्य प्रमाणांत असेल, टॉक्सीमीया कमी प्रमाणांत, ताकद, व पचन करण्याची शक्ति चांगली असेल तर रोगी त्यांतून वांचू शकतो.

टायफॉइड फीव्हरः—आंत्रिक सन्निपात.

टायफॉइडाचा जंतु वारेच्याद्वारें गर्भपिंडांत जाऊन हा विकार होतो. उष्णता-

मानावर परस्परांचें जीवित अवलंबून असतें. ह्या तापांत बाई जगूं शकते व मूलहि जिवंत असतें, परंतु त्यांच्या शरिरांमध्यें कोणत्यांना कोणत्या प्रकारचें व्यंग होण्याचा संभव असतो.

निदानः—आंतडी वायुमुळें फुगणें, पोटावर गुलाबी डाग दिसणें, जिभेवर थर, ताप कमी प्रमाणांत, अतिसार किंवा मलावरोध, डोकें दुखणें, व नाकांतून रक्त येणें. आंतड्यांमध्यें क्षयांच्या जंतूंचा प्रादुर्भाव अगोदर असल्यास हा ताप जोराचा असतो. टॉयफॉइडच्या तापाची मुदत नेहमींप्रमाणें असते. गर्भपात होणें वगैरे गोष्टी ह्या तापांच्या तीव्र लक्षणांवर अवलंबून असतात. १०४ च्या वर सारखा ताप राहील तर गरोदरपणांत व्यत्यय येणार हें उघड दिसतें. ताप वाढत नाहीं, पोषक अन्न पोटांत नियमीत जात आहे तर हा ताप १४ ते २१ दिवशीं नेहमींप्रमाणें कमी होतो. मधून मधून, लघ्वी-तपासणें, widal-reactions करून घ्यावी. ताप जोराचा असेल तर गर्भावर परिणाम होऊन मूल मेलेलें बाहेर पडतें.

चिकित्साः—ह्या प्रकारच्या तापांचें निदान निश्चित केलें पाहिजे. शारीरिक व मानसिक विश्रांती घ्यावी, गरम पाण्याचें स्पंजिंग करावें, गरम पाण्याचा एनिमा द्यावा व पाणी पिण्यास मुबलक सांगावें. उष्णतामान वाढूं न देण्याकरितां थंड व गरम पाण्याचा उपयोग करावा. स्पंजिंग करतांना पाण्यांत अल्कोल अगर एप्सम सॉल्ट घालून स्पंजिंग केलें असतां फायदा होतो. उष्णतामान सारखें १०४ रहाणें धोक्याचें आहे. रोग्याची स्थिती चमत्कारिक दिसल्यास रोगी स्त्रीला उत्तेजन देत रहावें. या तापांत प्रसुति होऊन जन्माला येणारें मूल जिवंत राहतें. अशावेळीं त्याची योग्य ती काळजी बाळगावी.

विस्फोटीक ज्वर ( Eruptive fever )

गरोदरपणांत देवी, गोवर, कांजण्याचे विकार होतात, बाजूला सांथ असेल तर टोंचून घ्यावें. हा विकार झाल्यास गर्भ वांचणें कठिण जातें व गर्भपात झाल्यास टॉक्सीमीयांचीं चिन्हें होण्याचा जास्त संभव असतो. घरांमध्यें स्वच्छता ठेवावी. खुली हवा असावी. गांवामध्यें ही साथ असल्यास गरोदर स्त्रीला तेथें न ठेवतां दुसऱ्या गांवाला पाठवून द्यावें. जखम वगैरे झाल्यास धनुर्वातासारखे विकार होतात, तेव्हां त्याची लस टोंचल्यास हरकत नाहीं. मुलांना विकार झाल्यास त्यांनीं आईच्या जवळ जाऊं नये व त्यांची स्वतंत्र व्यवस्था करावी. हे विकार सांसर्गिक

हवेच्याद्वारें होत असून यांचें विष पसरत असल्यामुळें केव्हां याची बाधा होईल हें सांगतां येत नाहीं. ह्या विकारांत टॉक्सीमीया व अपूर्ण प्रसूति होण्याचा संभव जास्त असतो. आंतड्यांच्या स्थितिकडे लक्ष देऊन अन्नाची योजना झाली पाहिजे. आईच्यामुळें मुलाला ह्या विकाराची बाधा होते.

क्षयाची बाधा:—क्षयाच्या जंतूचा संबंध, गरोदरपणांत ओंटीमधील इंद्रियें, आंतडयांचा पडदा, फुप्फुसें, यकृत्, मुत्रपिंड, सांधे, मेंदू यांच्याशीं असतो. गरोदर स्त्रियांना क्षय असणें–व क्षयी स्त्रियांना गरोदरपणा येणें ह्या दोन्ही गोष्टींचा विचार केला पाहिजे. पहिल्या गरोदरपणांत प्रकृति चांगली असतां क्षयाचा विकार झाला तर बाळंतपण सुखरूप होतें व औषधोपचार केले असतां बरें होण्याचा संभव असतो, परंतु त्याच्या उलट स्त्री क्षयी असतांना गरोदरपणा असल्यास आयुष्य क्षीण होऊन बाळंतपण व्यवास्थित होणें कठिण जातें.

निदान:—ओंटीच्या सांध्या (Pelvic Tuberculosis) मध्यें साधारणतः पोटाच्या आवरणांचा दाह व अंडवाहक नलिकेच्या दाहांचीं दोन्हीं चिन्हें आढळतात. पोटाच्या पडद्याचा (abdominal) संबंध असतो, त्यावेळीं पोटाचा भाग पसरून त्यांमध्यें पाणी सांचू लागतें. फुप्फुसाचा क्षय असल्यास कफांमध्यें जंतु सांपडतात. मेंदूच्या आवरणांचा दाह असला व त्यांमध्यें क्षयाचे जंतु असल्यास रोगांचा जोर जास्त असतो. सांध्याचा क्षय असल्यास दुखावा, लाली असते, व पाणी काढलें असतां जंतु सांपडतात.

रोग प्रतिबंधक उपाय:—खुली स्वच्छ हवा, गर्दी असेल तेथें न जाणें, सूर्यप्रकाश, व पौष्टीक अन्न.

मुलें बरींच झालेलीं आहेत अशा बाईला क्षयाचीं चिन्हें दिसूं लागल्यास गर्भधारणा बंद केली पाहिजे. स्टर्लायझेशन केलें असतां (Sterlisation) बाईचें आयुष्य वाढतें.

अंत्रपुच्छ दाह:—(Appendicitis) गरोदरपणांत हा विकार होतो. आरंभीं सांगितलेले जंतूच ह्या रोगाला कारण असतात. अपेंडेक्सच्या जागेवर कळा, उलटया व पोटाचे स्नायु ताठ होणें, दुखाव्याचे डाव्या बाजूला परिवर्तन होणें, (Reflexion) आंतडयांची गति (Peristalsis) मंद होणें, थंडी, मूत्राशय व गुदद्वार यांचा दाह, डोकें दुखणें व बेचैन होणें–हीं लक्षणें होत असतात.

हा विकार गरोदरपणीं पहिले १–२ महिन्यांत आढळून आला तर शस्त्रक्रिया करून सुधारतां येतो.

पित्ताशयाचा दाहः—Cholecystitis:—( gall-bladder ) हा मोठ्या आंतड्यांमधील जंतूमुळें होतो. हा विकार ॲपेंडीसाइटीज बरोबरही असतो, अगर ॲपेंडीसाइटीज कमी झाल्यानंतर होतो. हा विकार मलावरोध असणाऱ्या स्त्रियांमध्यें गरोदरपणाच्यापूर्वीपासून हळुहळु होत असतो.

चिन्हें:—यकृताच्या ठिकाणीं दुखावा, चेपलें असतां मऊपणा ( Tenderness) व थोड्या प्रमाणांत काविळीचीं चिन्हें असतात. ताप, नाडी जलद वहाणें, उलटी, मळमळ, बेचैन व भूक मंद होणें, निद्रानाश हीं लक्षणें होतात.

ह्या विकारांत आरंभापासून मलावरोध, आंतड्यांना सूज हीं असूं शकतात. गरोदरपणांत हा विकार झाल्यानंतर गर्भाचें पोषण होत नाहीं.

ह्या विकाराचा जोर झाला तर उष्णतामान वाढतें. बडबड, कावीळ व टॉक्सीमीयाचीं चिन्हें होऊं लागतात. तज्ज्ञांकडून शस्त्रक्रिया करून घेणें चांगलें.

Enteritis:—पोटशूळाचा विकार असला व त्यांत गरोदरपणा आला तर हा विकार होतो. गर्भाशयाचा आकार वाढतो, त्याप्रमाणें लक्षणें जास्त होऊं लागतात. ह्यांमध्यें सर्व आंतड्यांचा दाह झालेला असतो.

निदानः—आंतड्यांची गति मंद होणें, पोटामध्यें वायु व पाणी होणें, पोटांत जोराच्या कळा येणें—बारीक ताप, उलटया, अन्नावर मन नसणें, मलावरोध हीं चिन्हें असतात.

चिकित्साः—सोडावॉटर घ्यावें, सोडा घालून कोमट पाणी प्यावें.

आमांशयाचा दाहः—Gastritis:—आंतड्यांचा दाह, त्याचप्रमाणें पोटाचा दाह होतो. उलटया, अन्नावर मन नसणें व टॉक्सीमीयाचीं चिन्हें असतात. आमांशयांत दुखणें, अन्न न पचणें, पाचक रस बदलणें, हायड्रोक्लोरीक ॲसीड कमी किंवा जास्ती होणें.

चिकीत्साः—अलकालइन वॉटर्स, पेपसीन वगैरे घ्यावींत.

संधिवाताचा विकार असल्यास बाळंतपणानंतर सुधारणा होऊं लागते.

आमांशयाला व्रण–असणें:—पाळी न येणें, अशक्तता, रक्त कमी होणें, अशा स्त्रियांमध्यें हा गरोदरपणांत विकार होतो.

चिकीत्साः—तज्ज्ञ अशा डॉक्टरकडून करावी.

# प्रकरण ९ वें

## गरोदरपणांतील मूत्रपिंडाचे विकार

या विकारांची माहिती देण्यापूर्वी, मूत्रपिंड-मूत्राशय, मूत्रमार्ग यांचें स्थान व त्यांचीं कार्यें आरंभीं देण्यांत आल्यास हे विकार समजणें सोपें जाईल.

बेंबीच्या खालच्या भागास ओंटी किंवा बस्ती असें म्हणतात. पोट व बस्ती यांमध्यें छाती व पोट याप्रमाणें पडदा ( Diaphragm ) नाहीं. मागच्या बाजूला त्रिकास्थी ( sacrum ) व गुदास्थी ( Coccyx ) व पुढें आणि बाजूस ढुंगण्याच्या अस्थि—हीं सर्व मिळून ओंटीची पोकळी बनलेली आहे. ( mus-celes ) व बंधनें यांच्या योगानें बस्तीच्या भिंती भरल्या जातात. यांमध्यें खरा बस्ती व खोटा बस्ती असे दोन भाग आहेत ( True pelvis & False pelvis ) खालच्या भागांस खरा बस्ति, व कुल्याच्या अस्थीच्या वरच्या भागाला खोटा बस्ति असें म्हणतात.

यामध्यें मूत्राशय ( Bladder ) गुद, प्रोस्टेटग्रंथी, गर्भाशय, त्यांचीं उपांगें व योनि हीं असतात.

मूत्रपिंडः—( Kidney ) हे दोन आहेत. व दोन्ही बाजूस एक एक असे कमरेच्या भागांत उदराच्या मागल्या बाजूला आहेत. यांची लांबी ४ पासून ५ इंच व रुंदी २ इंच असते. हे रसत्वचेच्या मागें गढून गेलेले असतात. उजवा मूत्रपिंड यकृतांच्या दाबानें कांहींसा खालीं असतो. त्याच्याच बाजूला मूत्रपिंडाचा उर्ध्वपिंड व यकृत् हीं आहेत. डाव्या मूत्रपिंडावर प्लीहा व उर्ध्वपिंड हीं आहेत.

मूत्रपिंड रसत्वचेच्या मागें आहेत, त्याचा पुढला भाग बाहेरील कोर बाह्यगोल आहे, व मागील पृष्ठभाग चापट आहे. आंतील कोर अंतर्गोल असून तींत खळगा आहे. त्यांतून मूत्रपिंडाची रोहिणी आंत प्रवेश करते व तिच्या शिरा (Veins) व मूत्र-मळ हीं बाहेर पडतात. मूत्रनलिकेचें तोंड मूत्रपिंडाच्या संयो-गस्थानी रुंद असतें त्यासच मूत्रपिंडाची बस्ती ( Pelvis of kidney ) म्हणतात.

मूत्रनलिकाः—मूत्रपिंडांतून मूत्र ज्या मार्गानें मूत्राशयांत जातें त्या मार्गाला मूत्रनलिका म्हणतात. त्याची लांबी १८ इंच असते. मूत्रपिंडाच्या बस्तींतून निघून

रसत्वचेच्या मागें बस्तींत उतरून तो मूत्राशयाला मिळतो. याला आवरणें ३ असतात. बाह्य श्वेततंतुमय, मधील स्नायूमय, व आंतील आवरण श्लेष्म त्वचेचें असतें. मूत्रनलिका आंतड्यांच्या मागील बाजूस असते.

मूत्राशयः—( Bladder ) स्त्रियांमध्यें गर्भाशय व गुद यांमध्यें गर्भस्थान व योनी हीं असतात. त्यांच्यावर आंतडीं असतात. यामध्यें मूत्रपिंडांतून मूत्र-नलिकेच्याद्वारें लघ्वी येते व ती सांठते.

मूत्रमार्गः—( Urethra ) मूत्राशयापासून योनिमुखापर्यंतचा मार्ग त्यास मूत्रमार्ग म्हणतात.

गरोदरपणांत मूत्राशयाचा दाह ( Cystitis ) हा जंतुजन्य विषामुळें होतो. विषारी औषधें घेऊन गर्भपात करणें, इन्फ्लुएंझा, संधिवात यामुळें हा होतो. वारंवार लघ्वीला जावेंसें वाटणें, लघवीला होतांना त्रास वाटणें—आंतल्या बाजूला आग, कळा, भूक नसणें, ताप, झोंप न येणें हीं लक्षणें या विकारांत असतात.

रोगप्रतिबंधक उपायः—फॅशनच्या नादीं न लागतां, लुगडें सैल नेसावें. घट्ट नेसल्यास गर्भाशयावर व मूत्राशयावर दाब पडतो. वेळचे वेळींच लघवीला गेलें पाहिजे. पहिल्या ४ महिन्यांत निदान ६ तासानें लघवीला गेलें पाहिजे. बाह्य भाग धुतांना अंगाला शिरशिरी येईल अशा थंड पाण्यानें धुऊं नये. पाणी पुष्कळ प्यावें. मलावरोध, कडक चहा, कॉफी, घशाशीं जळजळणारे तिखट पदार्थ, वर्ज्य करावेत. हा विकार झाला असें वाटतांच ताबडतोब बिछा-न्यांत पडून रहावें व तज्ज्ञांचा सल्ला घ्यावा.

मूत्रनलिकेचा दाहः—( Ureteritis )

याचा दाह झाल्यास मूत्रनलिकेच्या मार्गाच्या ठिकाणीं दुखत असतें. लघ-वीच्या मार्गांत असल्यास दाबामुळें दुखूं लागतें. याप्रसंगीं स्त्रीला छातीजवळ गुडघे आणण्यास सांगावें. ( Knee-chest posture ) असें केल्यास लघवीला ताबडतोब होतें. याप्रमाणें १।२ दिवस केल्यास आपोआप दुखणें कमी होतें. मूत्र-नलिकेच्या विकाराशीं मूत्राशयाचा संबंध असतो. हीं एकमेकांवर अवलंबून आहेत. उजव्या बाजूला दुखत असेल तर त्याला डाव्या बाजूला निजण्यास सांगावें व त्याचप्रमाणें डाव्या बाजूला दुखत असेल तर उजव्या बाजूला निजण्यास सांगावें.

वृक्कविवरदाहः—(Pyelitis) हा विकार बी–कॉली जंतुमुळें होतो. गरोदरपणांत इतर जंतु मलद्वारें बाहेर पडून जातात पण हे जात नाहींत. संधिवात, कमर दुखणें, पाठ दुखणें, मूत्र पिंडेपासून आग होणें, उलट्या, अन्नावर इच्छा नसणें, लघवींतून पु जाणें हीं लक्षणें होतात.

मूत्रपिंडाचा दाहः—( Nephritis ).

गरोदरपणांत मूत्रपिंडाचा दाह झाल्यास लघ्वीमधून अलब्युमीन जाऊं लागतो. हा विकार साधारणतः बरींच बाळंतपणें झाल्यानंतर होतो. लहानपणांत दोषी ताप येऊन त्यावेळीं मूत्रपिंडांना विकार झाला असल्यास तो विकार पुनः गरोदरपणांत उद्भवतो. पहिल्यांदा थंडी वाजते, व हवा थंड असल्यास मूत्रपिंडावर परिणाम होतो. मसालेदार पदार्थ, जड पदार्थ खाणें, इन्फ्लुएंझाचा ताप, हीं या विकारास कारणें होतात.

निदानः—भूक नसणें, नाडीच्या गतींत बदल होणें, पोटाच्या जवळ दाबलें असतां मउपणा, उलट्या व बेचैन, पायांना सूज, कधींकधीं तोंडास सूज येणें, श्वासाला लघ्वीचा वास येणें, रक्ताचा दाब वाढणें, डोळ्यांपुढें अंधारी आल्यासारखें वाटणें अशीं चिन्हें होतात.

रक्ताचा दाब १३० ते २०० पर्यंत वाढतो व त्याचप्रमाणांत नाडीचा दाब वाढतो. लघ्वीमध्यें अलब्युमीन व ग्लोब्युलीन हीं जास्त प्रमाणांत आढळतात. लघ्वी कमी होते, स्पेसीफीक ग्रॅव्हीटी वाढते, लघ्वीचा रंग काळा व लघ्वीमध्यें रक्तही सांपडतें.

अन्न पोटांत टिकत नाहीं, भ्रमिष्टासारखी स्थिती होते व आंचके येऊं लागतात. हृदयाची क्रिया बंद पडून मृत्यु येतो.

चिकीत्साः—गरोदरपणांत दूषितपणा, संधिवात वगैरे विकार झाला होता किंवा आनुवंशिक विकार आहे कीं काय याचा तपास केला पाहिजे. टॉक्सिमीया न होईल याचा बंदोबस्त केला पाहिजे. या विकारांत औषधें वगैरे डॉक्टरच्या सल्ल्यानें घ्यावींत.

---

# प्रकरण १० वें

## गरोदरावस्थेंतील मज्जातंतूचे विकार

( Diseases of the Nervous System )

गरोदरावस्थेंत ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें यांच्या कार्यांत कमीजास्तीपणा होतो. कित्येक स्त्रियांचे अंगांत उष्णता वाढली म्हणजे थंड अशा खोलींत बसण्याची इच्छा होते व अशा प्रकारें प्रत्येक ज्ञानेंद्रियांच्या ठिकाणीं ही क्रिया नेहमींपेक्षां वाढलेली आढळून येते. त्वचा क्षोभक होते. जरा हात लावला तर सहन होत नाहीं. ठिकठिकाणीं सूज व घाम फार येणें यामुळें त्रास होत असतो. मनाच्या दुबळया असलेल्या स्त्रियांना हृदयांच्या विकारासारखीं लक्षणें जाणवत असतात. डोक्याच्या केंसांमध्यें गरोदरपणापूर्वी, आग अगर खाज येत असेल तर ती गरोदरपणांत वाढते. शरिराच्या सर्व भागांवर एक प्रकारें पिंवळ्या रंगाची दाट छटा भासते. त्यांतल्या त्यांत ती स्तन व बोंडी, पोट व जननेंद्रियाचा भाग या ठिकाणीं विशेष असते.

गरोदरपणांत त्वचेचें आरोग्य राखणें महत्त्वाचें आहे. त्वचेमधील सहनशक्ती कमी झाल्यामुळें, वारा अगर थंडी लागून टॉक्सीमीया किंवा मूत्रपिंडाचा विकार होतो. विश्रांती व झोंप मिळत नाहीं व यामुळें ताकद कमी होते.

रोज वनस्पतिजन्य साबण अगर रिंग्याचें पाणी लावून अंग नेहमीं स्वच्छ ठेवलें पाहिजे. पाण्यामध्यें सुवासिक गुलाबपाणी घालावें. अलकोहोल किंवा अमोनिया पाण्यांत घातला असतां घाम फार येऊन बरें वाटतें. अंगाला पावडर लावणें ती फार सुवासिक नसावी. केंस विंचरून साफ ठेवावेत. गरोदरपणांत कांहीं स्त्रियांचे केंस गळूं लागतात अशावेळीं **भृंगराज**तेलासारख्यांनीं मसाज केलें असतां अगर इलेक्ट्रीक व्हायब्रेटरनें मसाज केलें असतां केंस गळणें थांबून कीड मरून जाते. खोबरेल तेल ज्यामध्यें आहे अशा प्रकारचीं तेलें वापरावींत. सुगंधी उग्रट तेल लावूं नये. केंस जाऊं लागले म्हणजे कांहीं स्त्रियांच्या मनावर परिणाम होतो. त्यांना बाळंतपणानंतर केंस येतील अशा तऱ्हेचें आश्वासन द्यावें.

डोळे:—गरोदरपणापूर्वी चष्मा लावणाऱ्या स्त्रियांना आपल्याला नेहमीच्या चष्म्यानें दिसत नाहीं असें वाटूं लागतें. डोळ्यांना त्रास होऊन डोकें दुखणें,

चक्कर अशा प्रकारचीं लक्षणें होत असतील तर चष्मा बदलावा. गरोदरपणांत भावी बालकाचे कपडे तयार करण्यांत कित्येक माता, शिवण कलाकुसरीचें काम करीत असतात व त्याचा डोळ्यांवर परिणाम होतो, तेव्हां हें वर्ज्य करावें. डोळ्यांपुढें आगीचे कण दिसणें हें टॉक्सीमीया होण्याचें चिन्ह आहे. हीं लक्षणें होतांच डॉक्टरला दाखवावें, नाहींतर डोळ्यांवर परिणाम होण्याचा संभव असतो. डोकें दुखत असेल तर लघवी ताबडतोब तपासावी. आपला डोळ्याचा विकार मुलांना होईल किंवा काय याची काळजी त्यांना वाटत असते. परंतु ह्या गोष्टी आईबापांवर अवलंबून असतात.

कानः—कानांच्या मधल्या भागांत विकार असेल तर गरोदरपणांत तो वाढतो, कान व नाक ह्यांची स्वच्छता गरोदरपणांत अवश्य बाळगली पाहिजे. यांमध्यें कांहीं विकार असल्यास ते जास्त जोर करतात. कानांमधील पडदा, नलिका, मळ असणें यांमुळें गंभिरपणा येतो, तर कित्येकींना कानांमध्यें आवाज होतो असें वाटतें. मुलांचे कान आपल्यासारखे असावेत अशी प्रत्येक मातेची इच्छा असते व साधारणतः कान हें आनुवंशिक वळणावर असतात.

नाकः—( Olfactory organs ) गरोदरपणांत नाकांला एक प्रकारचा बाह्य वास येत असतो व त्यापासून त्रास होत असतो. कांहीं वेळीं गरोदरपणापूर्वी जो वास आवडत असे त्याचा कंटाळा गरोदरपणांत येऊन ते डोळ्यांपुढें येऊं न देण्याबद्दल त्या दक्ष असतात. नाकाच्या आंतल्या बाजूचा दाह होऊन झोंप नाहीशी होते. दुर्बल स्त्रियांच्या नाकामध्यें अंतस्त्वचेला सूज येणें व आग होणें, हें गरोदरपणाचे चिन्हापैकीं एक चिन्ह आहे असें समजावें. स्त्री दुर्बल असली तर हीं लक्षणें तिला सोसवत नाहींत. हा विकार बाळंतपणानंतर कमी होतो. वारंवार शिंकल्यामुळें गर्भाशयावर दाब पडून गर्भपात होण्याचा संभव असतो, तेव्हां ह्याकडे दुर्लक्ष करूं नये.

चव (Taste) तोंडाला अरुचि येते व ती रक्तामधील टॉक्सीमीयांवर अवलंबून असते. कित्येक वेळां ज्याची आवड नसते अशा मसालेदार पदार्थावर इच्छा जाते. लाळ फार सुटून एकसारखें थुकावें लागतें. घशांत आग, तोंड आंबट होणें हीं लक्षणें मधून मधून होत असतात. अन्न पचन होतें किंवा नाहीं इकडे लक्ष दिलें पाहिजे. त्याचप्रमाणें जिभेवर पांढरा थर आहे किंवा काय, ती

लाल आहे किंवा काय हेंही पाहिलें पाहिजे. जिभ पिवळसर व रुक्ष असणें हें टॉक्सीमीया झाल्याचें लक्षण आहे.

मेंदू व कणा यांना विकार:—यांमध्यें शारीरिक व मानसिक ह्या दोहोंचीं मिळून हीं लक्षणें होत असतात. भूक फार लागते व वाटेल तें खाण्याची इच्छा होते. अन्नाच्या वासावरून भूक नसली तरी जिभेला पाणी सुटतें व तें खाण्याची इच्छा होते. पहिल्या गरोदरपणांत उलटया व मनाची दुर्बलता असल्यामुळें तिला खाण्याची भिती वाटत असते. ३—४ महिने गेल्यानंतर भूक वाढते व अवेळीं खाण्याची वारंवार इच्छा होते. आंबट, क्षारयुक्त पदार्थ खाण्याची इच्छा होणें, हें आंतल्या गर्भाची मागणी आहे असें समजून तिची इच्छा पुरवावी. पहिल्या प्रथम अल्प प्रमाणांत हे पदार्थ घ्यावेत. अन्नपचनामध्यें बिघाड झाला असल्यास अशा प्रकारेंसुद्धां इच्छा होते. मनाला काळजी, राग येऊं न देतां अन्न सेवन करावें व त्याप्रमाणें घरांतील मंडळींनीं तिच्याशीं वर्तन ठेवावें. कित्येक स्त्रियांना दूध नकोसें असतें, त्यावेळीं दुधांचे गुण, त्यांमधील असणाऱ्या चुन्याचा गर्भाच्या हाडांवर होणारा परिणाम व महत्त्व तिला समजून दिलें असतां त्या स्त्रिया दूध घेऊं लागतात. आरोग्याला विघातक अशा भलत्याच अन्नाची इच्छा झाल्यास तिला गोडीगुलाबीनें सांगून मन वळवावें. आपल्यामध्यें ह्याला डोहाळे म्हणतात व मातेच्या खाण्यावरून भावी बालक कोणत्या प्रकारचें होणार याचें अनुमान बारकाईनें पाहणारास कळून येतें असें म्हणतात.

सर्वांगांत दुखणें:—( Neuralgia ) मज्जातंतूचें पोषण होत नसेल किंवा विषाची बाधा झाली असेल तर त्यामुळें कळा येत असतात. या मज्जातंतूच्या विकारांत एखाद्या भागाचा दाह झाला असेल तर कळा जास्त येत असतात. गरोदर स्त्रीच्या छातीमध्यें बाजूला दुखत असतें. कधीं कधीं एका बाजूला कपाळदुखी सुरू असते. कळा कोणत्याही औषधानें कमी होत नाहींत तेव्हां पांडुरोग अगर टॉक्सीमीया आहे किंवा काय हें लघ्वी व रक्त तपासून पहावें. पांडुरोगापासून असेल तर **लोह-मंडुर,** संधिवातापासून असेल तर **गुग्गुळ युक्त औषधें** सोडावॉटर, बार्लीवॉटर भरपूर प्रमाणांत पिण्यास द्यावींत. अस्वच्छ रहाणी, गरिबी, बरींच बाळंतपणें झालेलीं, पांडुरोग, अशा स्त्रियांमध्यें मधून

मधून गर्भाशयांत दुखत असतें. त्याचप्रमाणें फॅशनेबल, उच्च रहाणी असणाऱ्या स्त्रियांमध्यें ही तक्रार आढळते. बाळंतपणाच्याच या वेणा आहेत अशी त्यांची भ्रामक समजूत असते. योनिपरीक्षा करून या खऱ्या किंवा खोटया वेणा आहेत हें गर्भाशयाच्या ग्रीवेवरून समजून येतें. ज्ञानतंतुशामक औषधें दिलीं असतां हें दुखणें कमी होतें. मूत्राशय लघ्वीनें भरलेला असला तर त्यांच्या दाबानें कळा येतात. व लघ्वी झाल्यानंतर कमी होतात. हृदयामध्यें, छातीमध्यें दुखत असतें, परंतु नेहमीं मज्जातंतुजन्य बाह्य विकारावर वातहारक तेल, सारक–औषध वगैरे घेतलें असतां विकार कमी होतो व त्या विशिष्ट इंद्रिय विषयकच असतील तर ह्या तेलानें कमी न होतां उलट त्रासदायक होतात.

धनुर्वातः—( Tetany ) धनुर्वाताप्रमाणें सर्व स्नायू एकसारखे खेंचले जातात. व धनुर्वाताचीं चिन्हें कमी होतात. गरोदर नसणाऱ्या स्त्रिया रक्तहीन, फाजील काम करून थकलेल्या व कंटाळलेल्या अशा स्त्रियांना हीं लक्षणें होतात. गरोदर स्त्रिया एकाद्या फॅक्टरींत व दूषित हवा असलेल्या खोल्या ह्यांमध्यें रहातात त्यांना हीं चिन्हें जाणवतात. धनुर्वातासारखे आंचके तीव्र नसून अगदीं कमी असून त्या भागांत दुखत असतें. नाडी, ताप यांमध्यें कांहीं फरक नसतो. पोषण बरोबर नसणें व मानसिक दुर्बलता हीं या स्त्रियांमध्यें साधारणतः आढळतात.

औदासिन्यः—( Melancholia: ) गरोदरपणांतील औदासिन्य हें दोन कारणांनीं होतें. ज्या स्त्रिया मनाच्या निर्बल असतात त्यांना असें वाटतें कीं, आपलें मूल मरणार. जन्मल्यास तें व्यंग होणार, अशा तऱ्हेचे कुविचार डोक्यांत घोळत असतात व त्याचा परिणाम वेडांत होतो. टॉक्सीमीया व सांसर्गिक विष ( Septic infection ) याला कारण असतें. टॉक्सीमीया आहे किंवा नाहीं हें लघ्वी तपासून ठरवतां येतें. यांमध्यें मन हें मुख्य असतें. मनाची स्थिती चांगली सुधारेल इकडे लक्ष दिलें पाहिजे. तिची वागणूक, रहाणी, आहार, विहार पाहून त्यामध्यें सुधारणा केली पाहिजे. गरोदरपणांत उत्सर्जन क्रिया इंद्रियांकडून ज्याप्रमाणें झाल्या पाहिजेत त्याप्रमाणें होतात किंवा नाहीं याकडे लक्ष द्यावें. त्यांत व्यत्यय आल्यामुळें त्यामुळें उत्पन्न होणारें वीष इतर रक्तांत भिनून त्याचा मेंदूवर परिणाम होतो. वेड लागलें असें समजल्यानंतर, नातलगांच्या अगर मित्रांच्या फार काय स्वतः रोग्यांच्या सांगण्यांवर अवलंबून राहूं नये. तिचा स्वभाव काय

आहे हें पाहिलें पाहिजे. मानसिक त्रास व नैसर्गिक तिरसट स्वभाव असला म्हणजे वेड लागण्यास वेळ लागत नाहीं. वेड असलें तर स्त्रीच्या स्वभावाची परीक्षा करणें. व जीवाभावाची मैत्रीण असेल तिच्याकडूनच माहिती काढून घेतली पाहिजे. घरांमध्यें जाच असेल, अगर मनाविरुद्ध गोष्टी घडत असतील तर एक-प्रकारचें वेडही लागण्याचा संभव असतो. कोणाशीं वांकडें आलेलें असेल, अगर आपल्यावर प्रेम करणारी बाई विरुद्ध वागत असेल, तर मनाला खिन्नता येते. किंवा आपल्या हातून मोठी चूक झालेली आहे, एखादें मोठें संकट आपल्यावर, कुटुंबावर येणार आहे अशा प्रकारचे नानातऱ्हेचे मनोविकार एकांत मिळाल्यास डोकें बिघडवून सैरभैर करीत असतात. तिला काय वाटतें, काय पाहिजे हें विचारून तिच्या कलाप्रमाणें वागण्याचा प्रयत्न केला पाहिजे. आनुवंशिक विकार आहे किंवा काय याचा तपास केला पाहिजे.

चिकित्सा—शारीरिक व मानसिक दोन्ही गोष्टी एकाच वेळी अमलांत आणल्या पाहिजेत. नातलग, मित्र, त्याचप्रमाणें घरांतील मंडळी यांजपासून तिला दूर ठेवलें पाहिजे. गोडीगुलाबीनें मनावर ताबा मिळवणारी अशी व्यक्ति, अशा स्त्रीचा विश्वास संपादन करूं शकते. रहाण्याची जागा बदलावी. मन रमेल अशा प्रकारच्या गोष्टी—गाणें, चित्रें–सिनेरी–तिच्यापुढें आणावींत. पुष्कळ वेळां तिचें मन एखाद्या कुत्र्यासारख्या प्राण्यावर, अगर स्वतःला मूल न झाल्यामुळें दुसऱ्या मुलांवर रमेल, वगैरे ज्या रीतीनें तिचें मन प्रसन्न राहील तसें वागलें पाहिजे. तिला पहातांना निराशा–दुःखीवृत्ती दाखवूं नये. तिला प्रश्न विचारूं नयेत. अन्नपचन क्रिया पाहून अन्नाची योजना केली पाहिजे.

इलेक्ट्रीकचे उपचार, मसाज, बाहेर फिरावयास जाणें ह्या गोष्टीही तेवढयाच महत्त्वाच्या आहेत.

निदानः—आनुवंशिक विकार असल्यास हा विकार बरा होणें धोक्याचें असतें. अशा स्त्रिया आत्महत्या करण्याचा प्रयत्न करतात.

बाळंतपण सुखरूप झालें तर मुलाला मारण्याचा प्रयत्न करतात व शेवटीं स्वतः मृत्युमुखीं पडतात.

अशा प्रकारच्या औदासिन्याचा परिणाम लहान मुलावर होण्याचा संभव असतो. एका बाळंतपणात हा विकार असला व तो कमी झाला तर पुढील बाळंतपणांत सुद्धां पुन्हा होण्याचा संभव असल्यामुळें अगोदरपासून काळजी घ्यावी.

वेडः—( Mania ) गरोदरपणांत वेड लागतें. वेड हें थोडका वेळही येतें किंवा जोराचें असतें व कांहीं दिवसांनीं कमी होतें. एखादे वेळीं या वेडामध्यें आईचा व मुलाचा मृत्युही होतो.

क्षणिक वेड हें टॉक्सीमीयापासून होतें. व त्यांत आंचके येऊं लागतात. २४ ते ४८ तासांत गर्भ पडून जातो व स्त्रीला वेडाचीं चिन्हें होऊं लागतात. तिला अतिशय भीति वाटत असते. आपलीं मुलें, नातलग, पति हीं आगींत सांपडलीं आहेत व आपण हॉस्पिटलमध्यें पडलों आहोंत असें मनाला वाटतें, तर नवऱ्यानें आपल्याला सोडून दिलें आहे, अशा तऱ्हेचे भलते सलते विचार डोक्यांत येऊन, ती रडूं लागते व ओरडत सुटते. आपण पडलों आहोंत व आपल्या डोक्यावर कांहीं पडलें आहे आतां वांचत नाहीं, असा भ्रम होतो. हॉस्पिटलमध्यें ठेवल्यास बाहेर पळण्याचा प्रयत्न करते. अशा स्त्रियांच्या हातांत स्वतःचें मूल देणें धोक्याचें आहे. एखादे वेळीं ती स्वतःच प्राण घेते. अशा प्रकारच्या स्थितींत रोग्याला कपड्यानें बांधून ठेवावें. त्याचे हात पाय मोकळे ठेवावेत, परंतु त्याला उठून जाऊं येऊं नये एवढी खबरदारी घ्यावी. मॉर्फियाची पिचकारी द्यावी. कित्येक वेळां औषध देऊं केलें असतां आपल्याला वीष घालीत आहेत अशी तिची भावना होते. त्यांना स्वतःच्या शरिराची कदर नसते. लघवी कोंडली असतां कॅथेटरनें काढून घ्यावी व ती तपासावी. १ आठवड्याच्या आंत हें वेड कमी होतें. चाळे कमी होतात व हळुहळु दूध, पाणी घेऊं लागून स्मृतिहि जागृत होते.

अशा प्रसंगीं प्रसूति करण्याची घाई करूं नये. टॉक्सीमीया कमी होईल इकडे लक्ष ठेवावें. कानाच्या मधल्या भागाला विकार असतो त्यांचा संसर्ग मेंदूला होऊन मेंदूच्या आवरणाचा दाह (Menengitis) होऊन रोगी हातचा जातो. याकरितां कानाला विकार आहे किंवा काय तें पहावें. बाळंतपणाच्या वेणा सुरू असल्या तरी त्या कळत नाहींत व या वेळेला गडबड करून बाळंतपण करणें डॉक्टरला त्रासदायक होतें. या विकारांचा पगडा गर्भावर झाल्याशिवाय रहात नाहीं.

Hystero Mania:—यामध्यें हिस्टेरीया व वेडांचीं चिन्हें दोन्ही आढळतात. ह्या विकारांच्या स्त्रिया मानसिक व्यथेनें पिडलेल्या असतात. त्यांच्या बोलण्यावर व स्वरूपावर विश्वास ठेऊन चालत नाहीं. पोटामध्यें गर्भाची हालचाल झाली किंवा बाळंतपणाची वेळ आली तर हीं लक्षणें जागृत होतात. आंचके येऊं लागतात.

आंचके येणें व हिस्टेरिया या दोहोंचीं लक्षणें जाणणें फार कठीण असतें. पहिल्या प्रथमच आंचके सुरू झाले तर त्यांमध्यें फरक आढळून येतो. ती आपली जीभ चावत नाहीं व थुंकीही न अडतांना टाकू शकते. गर्दी जमली तरच या दुखण्यांना जोर येतो व एकांतांत खोलींत कोंडून ठेवलें तर हीं लक्षणें आपोआप कमी होतात. तिला औषध अगर इंजेक्शन द्यावयास काढलें तर लक्षणें वाढतात. आंकडी कमी झाली म्हणजे आजूबाजूला पहाते. आपल्याकडे कोणी पहात नाहीं असें पाहून, दूध, पाणी वाटेल तेवढें पिते. आंचके चालू असतां भरमसाट अशक्य अशा नाना प्रकारच्या गोष्टी ती बोलत असते. मुलाला फार जपत असते. ह्या विकारांत गर्भाशयावर परिणाम होत नाहीं परंतु वारेवर होतो.

प्रतिबंधः—अशा स्त्रियांमध्यें संततिनियमन अवश्य केलें पाहिजे.

गरोदरावस्था प्राप्त झालीच तर हॉस्पिटलमध्यें बाळंत होईपर्यंत ठेवलें पाहिजे. तिच्याशीं चांगल्या तऱ्हेचें वर्तन ठेवावें. तुझें मूल सुदृढ आहे, गोरेंपान आहे अशा तऱ्हेचें आश्वासन देऊन तिचें मन प्रसन्न राहील असे प्रयत्न करावे. यामुळें तिला मातृभावनेची जाणिव व जबाबदारी यांची जाणीव होऊन उल्हास वाटेल. क्लोरोफार्म देऊन अशा प्रसंगीं प्रसूति करावी. ज्यांना हा विकार जडला त्या सुधारणें फार कठीण जातें. आंचके सुरू झाले तर तावडतोब लक्ष देणें जरूर असतें तसें या विकारांत लक्षणें जवळजवळ वाटत असलीं तरी विशेष लक्ष देण्याची जरुरी नसते.

Epilepsy:—( अपस्मार, फेंफरें )

हा विकार व Eclampsia चीं चिन्हें जवळजवळ सारखीं असतात व टॉक्सीमीया हेंच त्याला कारण असतें. हा विकार आनुवंशिक असतो. शरिरामधील उत्सर्जन व पचनक्रिया बरोबर न चालल्यामुळें वीष सांचूं लागतें व आंचके येऊं लागतात. म्हातारपणांत हा विकार सहसा होत नाहीं.

निदानः—इकलॅमशीया व इपीलप्सी ह्या दोघांची तुलना केली असतां फेंफऱ्यामध्यें आंचक्याचा जोर कमी असतो, शुद्धी लवकर येते व कांहीं वेळ सुस्तींत गर्भिणी, अर्धवट झोंपेंत रहाते. व इपीलप्सीमध्यें तसा प्रकार नसतो. गरोदरपणापूर्वी हा विकार असेल तर फेंफरेंच आहे असें समजावें. Eclampsia हा सहसा एकाच गरोदरपणांत होतो. टॉक्सीमीयाचीं लक्षणें कमी असतात व अल्ब्युमीन सुद्धां थोडा जातो. आंचक्यामुळें अकालीं प्रसूति होण्याचा संभव असतो. अजीर्ण व मलावरोध—पोटांत वायु हीं लक्षणें असतात. फेंफरें कमी झालें कीं स्त्री आपला नेहमीचा व्यवसाय सुरू करूं

लागते. हा विकार Eclampsia सारखा धोक्याचा असतो. कांहीं जणांचा समज असा आहे कीं, मज्जातंतुशिथिलता असतां फेफरें हा विकार गरोदरपणा आला असतां कमी होतो, परंतु अनुभवानें उलट गरोदरपणामुळें हा विकार जास्त बळावतो.

पहिल्या १-२ महिन्यांत हा विकार वाढला तर गर्भपात होतो व पुनः हा विकार कमी होतो. ७–८ महिने झाले असतां हा विकार झाला असेल, तर आंकडी वारंवार येते, कांहीं वेळां हा विकार बळावून ताप जास्त वाढतो, स्त्रीला बेशुद्धी येते. व ती मृत्युमुखीं पडते. मेंदूमध्यें रक्तस्राव झाला तरच ही स्थिती होते.

चिकित्साः—मांस, उत्तेजक, मसालेदार पदार्थ वर्ज्य करावेत. बाहेर उघड्या हवेंत व्यायाम करावा. मलावरोध दूर करावा व झोंप भरपूर प्रमाणांत घ्यावी. ब्रोमाइड सारखीं औषधें बरेच दिवस चालू ठेवलीं तरी आराम होतो. बाळंतपणाच्या वेळीं हा विकार होतो, आनुवंशिक असल्यास मुलाला आईच्या अंगावर पाजूं नये. दूध, फळफळावळ, चपाती हीं द्यावीत. ब्रोमाइड गुदद्वारें पिचकारीनें घालावें. बाळंतपणांत वेळ न लावतां गुंगीचें औषध देऊन लवकर सुटका करावी. डॉक्टरकडून Sterlization करून घ्यावें. या विकारामुळें मुलामध्यें शारीरिक व्यंग आढळतें. दारुबाज बापाच्या मुलाला हा विकार होतो.

Chorea:—स्नायु विक्षेप.

ह्या विकारांत स्नायूंचें संकोचन होत असतें. अशा विकाराच्या स्त्रियांमध्यें गरोदरपणा त्रासदायक असतो. त्यांच्यामध्यें मानसिक दुर्बलता व शारीरिक व्यंग आढळतें. तरूणपणांत हा विकार असेल तर गरोदरपणांत पुनः होतो. टॉक्सीमीया, गर्भाशयाची वाढ हीं हा विकार दिवसेंदिवस बळावत नेतात. त्यांत गर्भाची हालचाल आंतून होत असल्यामुळें विकार पुनः पुनः उलटतो. भीति वाटणें, मनाला धक्का वाटणारी गोष्ट घडणें, थंडीची बाधा, हीं या विकाराला कारणें होत, कित्येक वेळां हा स्नायुविक्षेप स्थायिक असतो तर कित्येकवेळां सर्व स्नायुंमध्यें आढळतो.

निदान करणें सोपें असतें. स्नायु आपोआप हालत असतात. अशा प्रसंगीं सोमलाचे कल्प दिल्यास फायदा होतो. रक्त कमी असेल तर हा विकार वाढतो म्हणून रक्त वृद्धीचीं औषधें घ्यावींत. **लोह, मंडुर** यांचे कल्प, भाज्या, पालेभाज्या, दूध अशा प्रकारचा आहारांत समावेश असावा. मानसिक व शारीरिक विश्रांति घ्यावी. त्रास देऊं नये. गरम पाण्यानें स्नान घालावें. या विकारांत उष्णतामान एखादेवेळीं वाढून रोगी मरतो.

# प्रकरण ११ वें.

( Haemorrhage during Pregnancy )

## गरोदरपणांत रक्तस्राव होणें

पुष्कळ स्त्रियांमध्यें गरोदरपणांत दर महिन्याला पाळी येऊन रजःस्राव होत असतो व हा स्राव १-२ दिवस थोड्या प्रमाणांत असतो. कित्येक स्त्रियांमध्यें तर ९ महिनेपर्यंत सुद्धां होत असतो. तेव्हां ही गोष्ट नैसर्गिक आहे किंवा काय व त्याचा गर्भावर व प्रकृतीवर परिणाम होतो किंवा काय ही विचार करण्यासारखी गोष्ट आहे.

शारीरिकदृष्ट्या गर्भाशयाचा व अस्थायी गर्भकोशाचा (Decidua) एके ठिकाणीं संयोग झाला नाहीं ( Unite) तोंपर्यंत ( ४ महिनेपर्यंत ) अशाप्रकारचा स्राव होण्याचा बहुतांशीं संभव असतो. गरोदरपणांत फलवाहक क्रिया (Ovulation) चालू असेल तर पाळी येणें स्वाभाविक असतें. ४ महिन्यांनंतर अशाच प्रकारें पाळी येऊं लागेल तर त्याचा बंदोबस्त केला पाहिजे. वार जर खालच्या बाजूला लागली ( low attachment of placenta ) असेल तर मधून मधून रक्तस्राव होतो अशावेळीं ही गोष्ट नजरेस येतांच डॉक्टरच्या नजरेला ताबडतोब आणली पाहिजे. ग्रीवेच्या ( cervix ) अंतस्त्वचेला सूज आली असेल तर रजःस्राव होतो. गरोदरपणांत रजःस्राव होणें हें नैसर्गिक आढळलें तरी तिकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं.

पायांमधील शिरांच्या रक्तांमधील गांठी होऊन त्या तुटणें.

Rupture of varicose veins of lower extremitis:—

गर्भाशय वाढत जातो तसा त्याचा दाब शिरांवर पडतो व त्यामुळें पायांच्या शिरा मोठ्या होतात. बरींच बाळंतपणें झालेल्या स्त्रियांमधील पेशी ( cells ) कमजोर झाल्यामुळें शिरा मोठ्या होऊन त्यांची गांठ बनून फुटतेः— तसेंच हृदय व रक्तवाहिन्यांवर दाब पडल्यामुळें रुधिराभिसरणाची गति मंद होते व शिरा ताठरतात, फुगतात, व त्वचेची आग होते. एकाएकीं ह्या शिरांना धक्का लागून रक्तस्राव सुरू होतो व प्राणांतिक प्रसंग प्राप्त होतो. अशावेळीं घरगुती इलाज म्हणजे रोग्यानें पडून राहाणें, व ज्या शिरांतून रक्त वहात आहे तो पाय वर करून ती शिर दाबून ठेवून नंतर डॉक्टरकडून उपचार करविणें.

योनीच्या भागांमधील, शिरा तुटून कधीं कधीं रक्तस्राव होतो. हा स्राव पुष्कळ प्रमाणांत सुरू होतो.

रुंद बंधनाच्या ( Broad ligaments ) शिरा तुटल्यामुळें रक्तस्राव होतो. ह्या शिरा बोटाएवढया फुगतात व आंतल्या बाजूला रक्तस्राव होतो, पोटावर मार बसला असतां अशा प्रकारचा स्राव होतो. हा स्राव झाल्यास स्त्री बेशुद्ध पडते, रक्तस्राव आंतल्या बाजूला सांचल्यामुळें त्या रक्ताच्या स्रावाचा गोळा ( Haematoma ) तयार होतो. अशावेळीं शस्त्रक्रिया करावी लागते.

गर्भाशयाच्या भिंती ( walls ) पासून वार निराळी झाली तर आंतल्या आंत रक्तस्राव होतो. याचें कारण टॉक्सीमीया असणें हें होय.

कारणें:—टॉक्सीमीयामुळें अस्थायी गर्भकोश ( decidua ) व वारेच्या (Placenta)च्या रक्तवाहिन्यांमध्यें फरक होतो. दुसरें कारण, गर्भाशयाच्या भिंतीचा दाह होऊन वारंवार गर्भाशयाचा संकोच होतो; किंवा एखाद्या बाह्य कारणामुळें अशा स्थितींत, गर्भाशयाच्या स्नायूंचा संकोच होतो. बाळंतपणाची वेळ जवळ आलेली आहे अशावेळीं एखादी वस्तु वांकून घेण्याचा प्रयत्न केल्यास गर्भाशयाच्या स्नायूंचा संकोच होतो व वार निराळी होऊन रक्तस्राव होतो. उडी मारणें किंवा तोल जात असतां आपलें शरीर सांवरण्याचा प्रयत्न करणें, अगर पोटावर पडणें, पुष्कळ वेळां पडल्यामुळें त्यावेळीं दृश्य चिन्हें समजत नाहींत, परंतु अदृश्यपणें हळुहळु आंतल्या आंत होत असतात, व शेवटीं जिवावर बेततें. वार निराळी होते, त्यावेळीं सर्वच रक्ताचा स्राव होत नाहीं. गर्भाशयांतून पिंड बाहेर पडेपर्यंत थोडा थोडा स्राव होत असतो. गर्भाशयाला हात लावला असतां त्रास होतो, व मधून मधून कळा येत असतात. स्त्रीला धास्ती वाटते, श्वासोश्वास वाढतात, ताप वाढतो, व आंतून गर्भ बाहेर पडण्याची जोराची हालचाल सुरू होते.

स्त्रीची शरीरप्रकृति चांगली आहे, टॉक्सीमीया झालेला नाहीं, अशा स्थितींत ग्रीवेच्या जवळील वारेचा भाग थोडासा निराळा झाला असेल, तर रक्तस्राव होऊन तो लवकर बंद होतो, व बाळंतपण सुखाचें होतें. योनीमधून स्राव झाला असेल तरी तोहि बंद होतो.

वारेच्या वरचा भाग सुटला असेल, तर रक्त बाहेर न पडतां आंतल्या आंत रहातें व वार मऊ होऊन निराळी होते. याप्रसंगीं स्त्री गुदमरूं लागते, गर्भाची

हालचाल वाढते, व गर्भ गुदमरून जातो. सुज्ञ स्त्रीला हें आंतून कळत असतें. कित्येक वेळां वेणा वाढतात व थोडासा रक्तस्राव होतो. ग्रीवा मऊ झालेली असेल, तर गर्भ व रक्तांच्या गांठी त्याच्या बरोबर बाहेर येतात. ही स्थिती झाल्यानंतर मनाला धक्का बसून या प्रसंगीं मृत्युहि येतो.

प्रतिबंधक उपायः—टॉक्सीमीया होऊं न देणें. गर्भाशयावर दाब पडेल व ताण पडेल अशी कोणतीही वस्तू उचलण्याचा प्रयत्न न करणें. प्रकृतीला जपणें, मनावर परिणाम होणार नाहीं अशा प्रकारच्या वस्तू, गोष्टी टाळणें, अशक्तपणा, गळल्यासारखें वाटणें, याबद्दल शक्य ते उपाय करणें. योनीमधून रक्तस्राव होत असेल, तर दुर्लक्ष न करतां डॉक्टरला दाखवावें. कित्येकवेळां थोडासा स्राव होतो, कळा येतात व पडून राहिलें असतां कमी होतात व त्याचा पुढें भयंकर परिणाम होईल याची जाणीव स्त्रीला नसते. वारेच्या कमी जास्ती सुटण्यावर सर्व गोष्टी अवलंबून असतात तेव्हां याची ताबडतोब काळजी घेतली पाहिजे.

Placenta-Praevia:—प्लॅसेंटा प्रीव्हीयाचे शारीरिकदृष्ट्या ४ प्रकार आहेत. मध्य, (central) पूर्ण, complete, Partial, Marginal and lateral. चिकित्सेच्या दृष्टीनें २ प्रकार असतात. पूर्ण व अपूर्ण.

पहिल्या गर्भारपणांत हा विकार क्वचित्च आढळतो. एकापेक्षां जास्त मुलें झालेल्या स्त्रीला एकामागून एक अशी बरेच वेळां अकालीं प्रसूति झाली तर अशा स्त्रीला तो होण्याचा जास्त संभव असतो. वारंवार होणाऱ्या बाळंतपणामुळें गर्भाशय मोकळा, सैल, रिकामा झाल्यामुळें गर्भमूलक अंडें (ovum) गर्भाशयाच्या बुडाशीं पोकळ त्वचेच्या घड्यांमध्यें चिकटावयाचें तें न चिकटतां गर्भाशयाच्या खालच्या भागांत चिकटतें व तेथेंच वार तयार होते. अशा रीतीनें वार चिकटल्यामुळें अकालिक प्रसूति अगर गर्भपात होण्याचा जास्त संभव असतो. व या स्थितीला Placenta-Previa म्हणतात. हा प्रकार अंडजनलिके (Tubal) मधील गर्भधारणेपेक्षां धोक्याचा असतो. वारेचा प्रत्यक्ष संबंध योनीशीं असतो. या विकारांत रक्तस्राव एकाएकीं होतो. कित्येक वेळीं झोंपेमध्यें स्राव झाल्याचें नजरेस येतें. रक्तस्राव जास्त झाल्यास बेशुद्धि येते. या स्रावाच्या वेळीं गर्भाशयावर परिणाम झालेला दिसत नाहीं. या विकारांचे जे इतर

प्रकार आहेत त्यांचीं लक्षणें वरीलप्रमाणेंच आढळतात. स्थानपरत्वें त्याला निर-निराळीं नांवें पडलेलीं आहेत.

मुळव्याध—गुदद्वारांतील शिरावर गर्भाशयाचा दाब पडल्यामुळें रुधिराभिस-रणाला व्यत्यय येतो व त्यामुळें रक्तस्राव होतो.

अन्ननलिकेच्या शिरेमधून रक्तस्राव होणें—( Bleeding from distended veins of the aesophagus. तोंडांतून एकाएकीं रक्ताची उलटी होते. जडान्न जेवणें, थकवा, अशा वेळीं घशाशीं कांहीं जळजळल्यासारखें वाटतें, तोंड खारट होतें. रक्ताचा रंग काळसर असतो. बाहेरून बर्फ लावला असतां कमी होतें.

दाढा व इतर अंतस्त्वचेमधून रक्तस्राव होणें:—टॉक्सीमीया, बरेच दिवसांपासून असणें, मलेरियामुळें पांडुरोग होणें, अगर रक्त बिघडलेलें असणें, अशा कारणांनीं निरनिराळ्या भागांतून रक्त येणें सुरू असतें—ताप येऊं लागतो. अशा वेळीं रक्ताची परीक्षा करून ठरवावें लागतें.

पांडुरोगः—( anaemia ) गरोदरपणांत रक्ताची वाढ होते. तांबडे रक्तकण, व हिमोग्लोबीन हें शारीरिक स्थितींवर अवलंबून असतात. रक्तांतील पांढरे कण वाढतात, हें बाळंतपणांत रक्त ताबडतोब गोठतें यांवरून समजून येतें. कॅल्सीयम, फॉस्फेरस क्षार वाढतात. परंतु सोडीयम क्लोराइड तेंवढेंच असतें. लोह कमी असतो. शरिरांमध्यें ज्वलनक्रिया चालते म्हणून चरबीचें प्रमाण व कोलेस्ट्रीन वाढतें.

रक्तक्षय (Pernacious-anaemia):—गरोदरपणापेक्षां हा विकार बाळंत-पणानंतर जास्त होतो. चेहरा फिक्कट, सूज, चालतांना दमा लागतो व थकवा येतो.

चिकित्साः—लोह, लीव्हर एक्सट्रेक्ट—टोमॅटो—फळें-ताज्या पालेभाज्या, विश्रांती व शुद्ध हवा.

लुकेमिया ( Lukaemia):—गरोदरपणांत पांढरे रक्तकण जोराचे वाढत असतात. प्लीहा वाढलेली असते, व तिच्याबद्दल योग्य तो उपचार केला असतां विकार कमी होतो अशी समजूत आहे. साधारणतः हा विकार झाल्यास रोगी जगणें कठीण असतें.

रक्ताची स्थितीः—गरोदरपणांत रक्ताची स्थिती उत्तम असणें महत्त्वाचें आहे. टॉक्सीमीया होतो किंवा काय तें रक्त तपासून पाहिलें पाहिजे. एनिमा देऊन शौचास केलें पाहिजे. एनिमाच्या पाण्यामध्यें सोडा घालावा. पाय पोटाजवळ आणून, ३ फुट उंचीवर ( स्त्रीच्या ) एनिमा ठेवावा. १०५° डिग्री इतकें पाण्याचें उष्णतामान असावें.

बरेच दिवसांचा मलावरोध असल्यास आरंभीं ऑलीव्ह ऑइलची पिचकारी देऊन नंतर एनिमा घ्यावा.

---

# प्रकरण १२ वें.

## विषजन्य रक्तदोष ( Toxemia of Preganancy )

गरोदरपणांत स्त्रियांच्या रक्तामध्यें विषारी पदार्थ उत्पन्न होऊन विषजन्य रक्तदोष होण्याचा संभव असतो. गर्भपिंड ( ovum ) चिकटतो तेथें कांहीं द्रव्यें ( Substances ) तयार होतात व नंतर वारेच्या ( Placenta ) ठिकाणीं कांहीं दिवसांनीं द्रव्यें तयार होतात अशा वेळेला हा विकार होतो. ह्या द्रव्या- ( Substances ) मुळें गर्भिणीच्या रक्तांत फरक होतो. लघ्वीची परीक्षा केली असतां हें आढळून येतें. हीं विषें गर्भिणीच्या रक्तांत भिनून निरंनिराळ्या इंद्रियांत अडकतात व त्या त्या इंद्रियांच्या कार्याप्रमाणें चिन्हें होत असतात. उ. यकृत, मूत्रपिंड वगैरे.

लक्षणें:—गरोदर स्त्री आजारी पडणें हें होय. गरोदरावस्था प्राप्त झाली म्हणजे आजारीपणा येणें असें समजणें चुकीचें आहे, तर उलट आरोग्याला पोषक आहे असें समजलें पाहिजे. मज्जातंतूवर परिणाम झाला म्हणजे उलटी झाल्यासारखी वाटणें, उलट्या होणें, स्तनांच्या खालीं पीडा, आंतड्यामध्यें बिघाड, व प्रत्येक वस्तूची शिसारी येणें, हीं लक्षणें जाणवूं लागतात. अशक्त स्त्रियांना हीं लक्षणें जास्त जाणवतात. मनावर एवढा परिणाम होतो कीं एखादे- वेळीं वेडही लागतें.

वार ( Placenta ) तयार झाल्यानंतर गर्भामध्यें होणारीं द्रव्यें व गर्भिणीच्या रक्तांमधील रोगप्रतिबंधक द्रव्यें निसर्ग सम प्रमाणांत ठेवण्याचा प्रयत्न करतो. व यामुळें उलटी वगैरे होणारीं चिन्हें कमी होतात व प्रकृती सुधारूं लागते. हीं जर कमी झालीं नाहींत तर आंकडी सुरू होते व त्याचे आंचक्यांमध्यें रुपांतर होतें. अनुभवांतीं गरोदरपणांत आंचके सुरू झाले असतां टॉक्सिमीया कमी झाल्यानें प्रकृति सुधारते, परंतु मूत्रपिंड, यकृत् याचे विकार यामध्यें टॉक्सीमीया होऊन आंचके येण्याचा जास्त संभव असतो.

इक्लमशियामध्यें गर्भिणी व मुलाचा जीव बचावतो किंवा कधीं कधीं मुलांच्या प्राणावर येतें. या विकारामध्यें स्राव व घाम येतो व बेशुद्धिहि असते. आंचके येऊं लागले म्हणजे गर्भपात झाल्याशिवाय कमी होत नाहींत. व

गर्भपात झाल्यानंतरसुद्धां स्त्रीला अशक्तपणामुळें १–२ आठवड्यांत मृत्यु येण्याचा संभव असतो. **आरंभीं योनीच्याद्वारें रक्तस्राव होणें हें** Toxemia **होण्याचें पूर्व चिन्ह समजलें पाहिजे.** हा विकार झाला असें कळल्यानंतर डॉक्टरनें धांदल न करतां गरोदर बाईला मूत्रपिंडाचा विकार झाला होता किंवा मलावरोध आहे याची चौकशी केली पाहिजे. त्याचप्रमाणें दात, तोंड वगैरे सर्व भाग तपासले पाहिजेत.

आरंभीं निरोगी अवस्थेंत रक्ताचा दाब व नाडीची गति दिली आहे त्यामध्यें फरक आढळल्यास टॉक्सीमीया होतो आहे असें समजून त्याच्या प्रतिकाराचे उपाय सुरू करावे. पुष्कळ स्त्रिया भित्र्या असल्यामुळें त्यांच्या रक्ताचा दाब व नाडी यांमध्यें फरक होत असतो, याकरितां मधून मधून ब्लड प्रेशर तपासून घ्यावें.

नेहमीं सायस्टोलीक प्रेशर १४० आढळल्यास खाणें–फिरणें ह्या मध्यें नियमितपणा आणावा. १६० असल्यास अशा नर्सच्या नजरेखालीं व्यवस्था व औषध सुरू ठेवणें चांगलें. रक्ताचा दाब १८० असल्यास ताबडतोब हॉस्पिटलमध्यें ठेवणें.

छातीमध्यें स्तनांच्या खालीं आग होते किंवा काय तें विचारावें. पोटांत वायु भरलेला असतो व पोट फुगलेलें असतें ( Distended ) २४ तासाची लघ्वी घेऊन युरीया किती आहे हें तपासून घ्यावें. सीरम अलब्युमीनपेक्षां लघ्वीमध्यें ग्लोब्युलीन ( Globulin ) जास्त सांपडणें हें टॉक्सीमीयाचें लक्षण आहे. असीटोन, डायासेटीक असीड हीं यकृतांचा बिघाड दाखवतात. साखर असणें हे पचनेंद्रियांमध्यें बिघाड दाखवितें.

निरोगीपणांत ५० ते ५६ औंस लघ्वी झाली पाहिजे. हें प्रमाण प्रत्येकांमध्यें निरनिराळें आढळतें.

चिकित्सा:—वागणूक बेताची व नियमित ठेवावी. दूध, फळें, चपाती हीं खावींत. भूक लागली म्हणून अजीर्ण होईपर्यंत खाऊं नये. पहिल्या चार महिन्यांत मनाला जेणेकरून त्रास होईल, अशा प्रकारच्या गोष्टी टाळाव्यात. विश्रांति घ्यावी. त्याचप्रमाणें झोंप किती लागते, शौचाला कितीवेळां झालें, अन्न कितीवेळां घेतलें, व लघ्वीला कितीवेळां झालें हें लिहून ठेवावें. ह्या विकारांत

गर्भिणीला दुधावर ठेवल्यास चांगला फायदा होतो. टॉक्सीमीयाचा विकार झालेल्या स्त्रीनें निदान १ वर्षपर्यंत डॉक्टरला आपली प्रकृति दाखवावी.

**टॉक्सीमियांचीं कारणें, लक्षणें व परिणाम** ( Prognosis )

टॉक्सिमीया किंवा विषज विकार गरोदरपणांत कां होतात यांचीं कारणें ठरवणें अत्यंत कठिण आहे. गरोदरपणाच्या शेवटच्या तीन महिन्यांत आंचके ( Eclampsia ) येतात, व याला निरनिराळीं कारणें म्हणजे लघवी मधून अलब्यूमिन जाणें, लघ्वी कमी होणें, डोळ्यांच्या पापण्या, हात, तोंड यांवर सूज, व लघ्वीचें प्रमाण कमी होणें हीं कारणें असू शकतात, परंतु कित्येक वेळां अल्ब्यूमीन जाऊनहि हा विकार होत नाहीं तेव्हां टॉक्सीमिया होण्याला निराळें कारण असलें पाहिजे. असें म्हणणें भाग होतें. यकृत् मूळपिंड, यांच्या क्रियेमध्यें दोषिक फेरफार होऊन, दूषित द्रव्यें शरिरांत रहातात व त्यामुळें विषम परिणाम होतात. कांहीं फ्रेंच डॉक्टरांचें असें म्हणणें आहे कीं, गरोदरपणांत अशा प्रकारचीं विषें आंतड्यांत असतातच व त्यामुळेंच डोकें दुखणें, अंगाला पुरळ येणें, लाळ गळणें—हीं लक्षणें होत असतात. तर कांहींचें म्हणणें असें आहे कीं, गर्भधारणेमुळें पचन क्रियेच्या व्यापारांत प्रतिबंध होतो व त्यामुळें हा विकार होतो, तेव्हां लक्षणांप्रमाणें चिकित्सा करावी. दुसरा एक डॉक्टर म्हणतो, रक्त, लघ्वी व पेशी यांची स्वतंत्रपणें तपासणी करून ठरवावें. गरोदरपणांतील विषविकारामुळेंच खालील विकार होतात. ( १ ) भयंकर उलटी होणें ( २ ) acute yellow atrophy of liver ( ३ ) मूत्रपिंड ( ४ ) Pre eclamptic toxemia ( ५ ) इक्लमशीया व इतर विकार—

## गरोदरपणांत उलटी होणें

मळमळ व वांती हें गरोदरपणाचें आरंभीचें लक्षण होय. हें पूर्वी सांगितलेंच आहे. १ ल्या महिन्या पासून किंवा अगोदर या विकारास सुरुवात होते व ३ महिन्यापर्यंत तो टिकतो. कित्येक वेळां फक्त मळमळ सुटते परंतु ओकारी होत नाहीं. ओकारीमुळें पोटांत पाणीसुद्धां टिकत नाहीं व उपासमर होण्याची पाळी येते. गर्भाशय स्थानच्यूत झालेला असेल तर उलटी होते, व तो कदाचित जागेवर बसवल्यास उलटी कमी होते. विषजविकार

हें उलटीचें मुख्य कारण असतें. स्त्रीला पूर्ण विश्रांति व काळजी दूर केल्यास यामध्यें सुधारणा होते. वांतीचा रंग काफीसारखा किंवा लालसरहि असतो. अन्नाचा कण पोटांत न गेल्यामुळें उपासमार होऊन अशक्तता येते. जीभ लालसर होते. एखादेवेळीं काविळ होते, नाडी जलद चालते, व रक्ताचा दाब कमी होतो. आमांशय व यकृताच्या ठिकाणीं दाबलें असतां (Tenderness) मऊपणा आढळतो. लघ्वी कमी होते. व त्यांमध्यें अलब्युमीन, असीटोन सांपडतात. क्वचित् मृत्युही येतो.

निदानः—

(Acute yellow atrophy of the liver) यकृताचा क्षयः— पांडुरोग, उलटी, विषदोषजन्य जंतु, आंचके, टायफॉइड फीव्हर, औषधांमुळें उत्पन्न झालेलें वीष, टॉक्सीमीया, व शरीराची झीज वारंवार होणें. बाळंतपणांतसुद्धां हा विकार होतो. मळमळ, उलट्या, कावीळ, जिभेवर थर, डोकें दुखणें, त्वचेची रुक्षता, बडबड, मधूनमधून पायांना आंचके येणें हीं लक्षणें होतात. जंतुजन्य–स्टॅफीलोकोकस, व कोलायजंतु यामुळेंसुद्धां हा विकार होतो.

मुत्रपिंडामुळें होणारा टॉक्सीमीयाः—(Nephritic Toxemia) गरोदरपणांत मुत्रपिंडावर भार पडल्यामुळें, व आरंभींच मुत्रपिंडाला विकार असल्यास टॉक्सीमीया होतो.

चिन्हें—हळुहळू होत असतात, व तीं ६ महिन्यांनंतर होतात. साधारणतः १ ल्या बाळंतपणांतच हा विकार होतो. लघ्वीमध्यें फरक होणें, हातापायांना सूज येणें, बेंबीच्या खालीं पोटाला सूज येणें, डोकें दुखणें, उलटी, अजीर्ण, हीं लक्षणें होतात. पोटावर दाब पडणें, रक्ताचा दाब वाढणें, व स्नायूंचें काम वाढणें हें प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष कारण असतें. लघ्वींतून पाणी व क्षार जाण्याचें कार्य मंद झालेलें असतें, ज्यांना अकालीं वारंवार मुलें होतात त्यांना हा विकार होतो. बाळंतपण होईपर्यंत अलब्युमीन जात असला तरी प्रकृति चांगली असते, परंतु अकालीं झालेलें मूल पाहिलें असतां त्याचें पोषण बरोबर झालेलें नाहीं असें आढळून येतें. ह्यामध्यें वार ही सुद्धां दूषित असल्यामुळें मुलांचें पोषणांचें कार्य बरोबर होत नाहीं.

Pre eclamptic toxemia:—हा प्रकार ७ व्या व ९ व्या महिन्यांत

होतो. डोकें दुखणें, बेचैन, रक्ताचा दाब वाढणें, पायांना सूज असणें. विकाराचा जोर जास्त असेल तर आमांशयांत दुखणें, डोकें फार दुखणें, डोळ्यांपुढें अंधारी येणें, ही लक्षणें असतात. मूत्रपिंडामुळें होणारा टॉक्सीमीया (Nephritic toxemia ) व हा टॉक्सीमीया यांचीं लक्षणें जवळ जवळ सारखीं असलीं तरी यांमध्यें मूत्रपिंड थोडा बिघडलेला असतो. एकाएकीं दिसेनासें होतें. किंवा दृष्टी हळुहळू मंद होऊन नजर कमी होते. मेंदूवर परिणाम झाल्यामुळें वेड्यासारखे चाळे सुरू असतात. कित्येकांना झोंप मुळींच येत नाहीं तर कांहीं स्त्रियांमध्यें सुस्ति व हेकटपणा वाढलेला दिसतो. हीं चिन्हें कमी झालीं नाहींत, तर आंचके येऊन रोगी बेशुद्ध होऊन त्यांत मरण येतें. या विकारांत मुख्य चिन्ह म्हणजे लघ्वी अगदीं कमी होते, साधारण १० ते १५ औंस २४ तासांत होते व त्यांमध्यें अलब्युमीन, रक्त, कास्ट सांपडतात. लघ्वी असीड असून त्यांमध्यें असीटोन, डायरोटीक असीड सांपडतात.

Eclampsia:—आंचके येणें हा विकार गरोदरपणाच्या शेवटल्या तीन महिन्यांत होतो. १–२ आंचके येतात व स्त्री बेशुद्ध होते. कांहीं वेळानें शुद्धी येते व कित्येक वेळां त्यांतच अंत होतो.

गरोदरपणांत हा विकार होणें जीवावरचें असतें. साधारणतः हा विकार पहिल्या बाळंतपणांत होतो. जुवळ असणें व पाणी जास्त असणें हीं याला कारणें होत. क्वचित् पहिल्या चौथ्या महिन्यांतहि हा विकार झालेला आढळतो. गर्भाशयाच्या बाहेर गर्भबिंदु वाढणें ( Extra uterine pregnancy ) व गर्भाशयांत बारीक डांसासारखे लहान प्राण्यांचे गोळे होणें अशा प्रकारच्या विकृति गर्भावस्थेंत होण्याचा जास्त संभव असतो.

हवेमध्यें बदल होणें, थंडी, सर्द हवा, ह्याचाहि परिणाम होतो.

ह्या विकारांत शेंकडा २५ ते ३० गर्भिणी मृत्युमुखीं पडतात.

नेहमीं या विकारांची सुरवात पुढील चिन्हांनीं होते. बेचैन होणें, डोकें दुखणें, मागील अगर पुढील बाजू दुखणें, हात जाड होणें, पायाच्या पंजेला, बेंबीला खालीं सूज असणें, नजर बरोबर नसणें, डोळ्यापुढें काजव्यासारखें डाग दिसणें, आरंभीं आमांशयांतून राहून राहून कळा येण्यास सुरुवात होणें, चैन पडत नाहींसें

होणें, डोळ्यांपुढें अंधारी येणें. लघ्वी कमी होणें, रक्ताचा दाब वाढणें, व लघ्वीमध्यें अल्ब्युलीन सांपडणें.

कांहीं स्त्रियांमध्यें एकाएकी आंकडी येऊन बेशुद्धी येते. हात, चेहरा यांच्या स्नायुंला आंचके येतात व ते रोग्यांला कळतात, रोगी एकाएकीं गादीवर पडतो, दांत चावायला लागतो, आंचके येऊं लागतात व हळु हळु बेशुद्धी येते. अशा वेळीं ज्ञानतंतुशामक औषधें दिलीं असतां विकाराचा जोर कमी होतो. कित्येक वेळां आंकडीचा जोर फार वाढून त्यांतच रोग्याचा अंत होतो. गरोदरपणाच्या शेवटच्या दिवसांत आंचके येऊं लागले तर ताबडतोब प्रसूति होते व गर्भ मेलेला बाहेर पडतो.

In the puerperium:—हा विकार बाळंतपणानंतर कांहीं तासांनीं सुरू होतो किंवा बाळंतपणानंतर कांहीं आठवड्यांनीं सुरू होतो. परंतु ह्यावेळीं आंकडीचें कारण निराळें असूं शकतें. प्रकृति चांगली असते व एकाएकीं बाळंतपणानंतर आंचके येऊं लागतात. जीभ चावली जाते, बेशुद्धी येते व रोगी पुनः शुद्धीवर येतो.

हा विकार कमी झाल्यानंतर एखाद्या भागाचा संज्ञानाश होतो किंवा कळा व आग सुरू होते. मेंदूमध्यें रक्तस्राव झाल्यास दृष्टी मंद होते व ती कायमची होऊन राहते.

रक्ताचा दाब:—टॉक्सीमीयामध्यें रक्ताचा दाब वाढतो. पायांना सूज, अलब्यु-मीन वगैरे आहे किंवा काय हें पाहिलें पाहिजे.

मूत्रपिंड:—लघ्वीला साफ होतें किंवा कमी जास्ती होतें हें पाहिलें पाहिजे. मुत्रपिंडाला विकार असल्यास हा विकार होतो. नाळेला विकार असणें, दांतांमध्यें पू असणें, वगैरे विकार आहेत किंवा काय हें तपासून पाहिलें पाहिजे. शिवाय गर्भिणीच्या रक्तांमध्यें कॅलशिअम सॉल्टस् ( Calcium Salts )कमी असणें, थॉयरॉइड ग्रंथीची वाढ होणें, युरिया, वगैरे कारणांमुळें हा विकार होत असावा अशीं निरनिराळ्या तज्ज्ञांचीं भिन्न भिन्न मतें आहेत.

लाळ फार गळणें ( Increased salivation ) टॉक्सीमीयामुळें लाळ फार गळते व नेहमीं दांतांच्या दाढांना व्रण—दांत किडके असणें, हीं लक्षणें असतात व या

कारणामुळें लाळ फार सुटते. दांतांचें योग्य कारण दूर केलें असतां तो कमी होतो. हा विकार बाळंतपणांनंतर कमी होतो. उलट्या होत असतील तर त्या कमी कराव्यात.

कंपवायु ( Chorea ) ह्यांच्यामध्यें आंकडीचा जोर एवढा असतो कीं स्त्रीला अन्न घेतां येत नाहीं, झोंपहि येऊं देत नाहीं. हीं लक्षणें दबलीं नाहींत तर ताप-अंगावर पुरळ येणें हीं लक्षणें दिसून येतात. ह्या रोग्यावर पूर्ण लक्ष ठेवलें पाहिजे.

मेंदू व हिस्टेरीया यांपासून असणारा फरकः—हिस्टेरियामध्यें आंचके येतात, परंतु त्यांत लघ्वीमध्यें बिघाड नसतो, बेशुद्धि नसते व जीभळि चावली जात नाहीं. बाळंतपणांत होणाऱ्या वेणांवरच तिचें लक्षण असतें. मेंदूमध्यें ग्रंथी असेल तर त्या दाबानें आंचके येतात. Eclampsic चें जें वर्णन दिलेलें आहे, त्यांवरून अनुभवानें तो कां होतो हें ठरवलें पाहिजे.

रक्तजन्य विषदोष होण्याचा संभव ( Presumble Toxemias ):—

गरोदरपणांत विषारीपणामुळें ( Toxemia ) क्षुद्रकुष्ट कक्षावात, गांधी, पुरळ वगैरे अंगावर त्वचेचे विकार होतात. व त्याला कारण पचनक्रिया बरोबर नसणें, मलावरोध असणें हें असतें. हे विकार लवकर कमी होतात. परंतु क्षुद्रकुष्ट (Impetigo) हा मात्र वारंवार उद्भवतो. हा क्षुद्रकुष्ट विकार (Impetigo) पोट, पाय, हात, चेहरा, ओंठ यांवर होतो. स्त्रीला चैन पडत नाहीं. बाळंतपणांत एरंडेल तेल दिल्यानंतर हा विकार कमी होतो. गरोदरपणाच्या पूर्वींसुद्धां हा विकार होतो.

Purpura:—उलटी, आंचके व रक्तासारखा स्राव होऊन डाग पडतात. अशा प्रकारचा विकार होणें धोक्याचें आहे. रक्तपित्ती, व Hemo philia यांपैकीं कोणते डाग आहेत हें पाहिलें पाहिजे. आनुवंशिक आहे कीं काय तेंहि पाहिलें पाहिजे. गरोदरपणांत दाढांतून वारंवार रक्त येतें.

Herpes:—ओंठ व पाय, छातीचा भाग या ठिकाणीं होतात. आग फार त्रासदायक होते. आंतड्यांमध्यें बिघाड असल्यास व तो बिघाड दूर केल्यास विकार कमी होतो.

Pruritus:—टॉक्सीमियामुळें जननेंद्रियांच्या ठिकाणीं वारंवार पुरळ येतो. त्याला खाज इतकी असते, कीं स्त्रीला चैन पडत नाहीं व त्यामुळें

प्रकृतीवर अनिष्ट परिणाम होतो. योनीमधील स्रावामुळें आग होते. लघ्वींतून साखरहि जाण्याचा संभव असतो.

Urticaria—रुधिराभिसरणांचें कार्य वाढल्यामुळें हा विकार होतो.

Angioneurotic Edoema:—पायांच्या त्वचेला सूज येते—हा विकार समजणें कठीण असतें.

गरोदरपणांतील रक्त बीजांचा परिणाम ( Prognosis in Toxemias of Pregnancy:—टॉक्सीमीयांचा परिणाम स्त्रीच्या सर्व शरिरावर होतो, व तें विष प्रकृति, चिकित्सा, रहाणी यांवर व्यक्तिशः अवलंबून असतें.

उलटीः—हें विषारी परिणामांचें लक्षण आहे. असें मानलें व त्यांपासून पोषण क्रियेमध्यें व्यत्यय येत नसेल, वजन कमी होत नसेल, व लघ्वीमध्यें Acidosis नसेल, तर धास्ती करण्याची जरुरी नाहीं. उलटी होतांना गर्भस्राव झाला नाहीं तर बाळंतपण सुखरूप होतें; परंतु उलटी, मळमळ यांबरोबर वजन व ताकद कमी होत असेल, रक्त वगैरे पडत असेल, कावीळचीं लक्षणें दिसत असतील, लघ्वीमध्यें असीटोन असतील, स्पेसीफीकग्रॅव्हीटी वाढली असेल तर गर्भपात करणें भाग होतें. अशा प्रकारची स्थिती असणें हें धोक्याचें चिन्ह मानावें लागतें.

टॉक्सीमीया पुनः होतो किंवा काय ?:—पहिल्या गरोदरपणांत हा विकार झाला असेल तर पुनः शेंकडा १५ ते १८ गरोदर स्त्रियांमध्यें तो होतो असें दिसून आलें आहे.

गर्भासंबंधीं सांगावयाचें म्हणजे आंचक्याच्या विकारांत, गर्भ गुदमरून जातो व अकालीं प्रसूति होते. गर्भ जीवंत असला तरी त्यांच्या शरिरांत व्यंग आढळतें व आंकडी येऊन २४ तासांत तो मृत्यु पावतो. मद्यपान करणाऱ्या स्त्रिया व टॉक्सीमीयाचा विकार झालेल्या स्त्रिया यांना राक्षसासारख्या विद्रूप आकाराचा गर्भ होतो. गर्भाशयाच्या आंतील पडद्याला विकार व वारेचें योग्य कार्य न चालणें—यामुळें गर्भावर परिणाम होऊन गर्भपात किंवा अकालीं प्रसूति होते.

# प्रकरण १३ वें.

## गरोदरपणांत गर्भाला होणारे विकार

गरोदरपणांत गर्भाची वाढ व पोषण हें गर्भिणीच्या वर्तनावर व खाण्यावर अवलंबून असतें. वार ही गर्भिणी व गर्भ यांचें केंद्रस्थान होय. शरिरामधील व त्या दोहोंमधील चयापचय क्रिया (metabolism) समप्रमाणांत राखणें हें वारेचें ( जरायु ) काम आहे. वारेमध्यें संरक्षक-रोगप्रतिबंधक जंतु व गर्भाशयाला उत्तेजक अशीं द्रव्यें उत्पन्न होतात व गर्भाला प्राणवायु पोंचवणें हें वारेचें काम असतें. वारेच्या द्रव्यामध्यें दुग्धोत्पादक धर्म असल्यामुळें मेंदूमध्यें असणारी पिट्युटरी ग्रंथीचें कार्य ती गरोदरपणांत करीत असते. पहिल्या कांहीं महिन्यांत पिट्युटरीचा पुढील लोब कार्य करीत असतो व शेवटच्या महिन्यांत मागील लोब काम करीत असतो. गरोदरपणांत यांचा आकार व कार्य वाढत असतें. ग्रंथीचें कार्य वाढलें तर गर्भाची ही भरमसाट वाढ होते. गरोदरपणांत गर्भिणीच्या शरिरांमधील कॅलशीयमचा गर्भवाढीकडे उपयोग होत असतो व दुसरें तत्त्व नायट्रोजन ह्याचा बाळंतपणाच्या वेळीं स्नायूंना शक्ति व वेणा वाढविण्याकडे उपयोग होतो.

गर्भाचें पोषण व आकार हे साधारणपणें आईबापांप्रमाणें असतात. स्त्रीगर्भ साधारणतः बापाप्रमाणें व पुरुष गर्भ मातेप्रमाणें असतो. व्यक्ति, वैशिष्ट्यपणा आजोबांपासून नातवांपर्यंत प्रत्येक कुटुंबांत आढळून येतो. आईच्या देहाचा परिणाम गर्भावर होत असतो. कांहीं स्त्रियांना गरोदरपणांत वाटेल तें खाण्याचे डोहाळे लागतात. हे पदार्थ जड असल्यामुळें गर्भाची व हाडांची फाजील वाढ होते, व पुष्कळ वेळां बाळंतपणाची मुदत वाढते. पहिल्या बाळंतपणांत साधारणतः दिवस वाढले म्हणजे मुलगा होतो असें दिसून येतें. त्याचप्रमाणें जिला पहिल्या वेळीं मुली झाल्या असतील तिला कांहीं वर्षांनीं नंतर मुलगे होतात. गर्भिणीच्या अन्नामध्यें योग्य तो फेरबदल केला तर गर्भाचा आकार योग्य प्रमाणांत होईल. मांसल पदार्थ, स्निग्ध पदार्थ, गोड, स्टॉर्चयुक्त पदार्थ वर्ज्य केले तर वजन व आकार यांत बदल होईल. दूध, फळफळावळ, चपाती हा गरोदरपणांतील योग्य आहार होय. योग्य आहार न घेतल्यास मुलाचा आकार मोठा होऊन बाळंतपणाच्या वेळीं कष्ट पडतील असें गर्भिणीच्या मनावर ठसविलें पाहिजे. कित्येक अननुभवी स्त्रियांना असें वाटतें कीं, आपण थोडा आहार घेतला तर गर्भाचें

पोषण होणार नाहीं, व तो जगणार नाहीं, परंतु ही समजूत चुकीची आहे. थोडकेंच परंतु हलकें अन्न दिवसांतून निरनिराळ्या वेळीं घेतलें असतां गर्भाला फायदेशीर होतें. बाळंतपणाचे दिवस जवळ येऊं लागले म्हणजे आहार एक वेळच करावा म्हणजे फायदा होतो. रात्रीं भूक लागलीच तर दूध व बिस्कीटें असा हलका आहार घ्यावा. फळफळावळ खाल्ल्यानें गर्भाचें डोकें जड न होतां बाळंतपणाच्या वेळीं त्रास होत नाहीं. गरोदरपणांत मद्यपान केल्यास गर्भावर वाईट परिणाम होतो. मुलें वेडसर होऊन त्यांना आंकडीचा विकार होतो. चहा, कॉफी, वगैरे उत्तेजक पेयें फार घेऊं नयेत. गरोदरपणीं जेवढें शारीरिक आरोग्याचें तेवढेंच मानसिक आरोग्याचें महत्त्व आहे. मन आनंदी ठेवणें, काळजी न करणें, न रागावणें, वगैरे गोष्टींचा गर्भावर हितकर परिणाम होत असतो.

गरोदरपणांत मातेच्या मनावर एखादा भीतिदायक परिणाम झाला, अगर एखादी भयंकर वस्तु दिसण्यांत आली, तर त्याचा गर्भावर अनिष्ट परिणाम होऊन त्या वस्तूचा आकार गर्भाला प्राप्त होतो. याकरितां गरोदर स्त्रीनें प्रकृति चांगली असतां जेणेंकरून मनावर अनिष्ट परिणाम होईल अगर भीति वाटेल अशा गोष्टी पाहण्याच्या वर्ज्य कराव्यात.

सांसर्गिक दोषजन्य तापः—दूषित तापांमध्यें उष्णतामान वाढून गर्भावर परिणाम होऊन गर्भपात होतो. देवीसारखे विकार गर्भाला होतात. देवीच्या सांथीच्या प्रसंगीं गर्भिणीनें टोंचून घेतलेलें बरें. मूल जन्मल्यानंतर त्याला देवी काढण्यांत आल्या तर त्याचा परिणाम त्याच्यावर होत नाहीं. गरोदरपणांत आईला जे विकार होतात, त्या विकाराचा पुढें गर्भाला त्रास होत नाहीं; म्हणजे एकप्रकारें त्याच्या अंगांत रोगप्रतिबंधक शक्ति उत्पन्न होते. पूप्रमेहाच्या विषाची बाधा गर्भाला होते. आईबापांना पूप्रमेहाचा विकार असतां साधारणतः गर्भपात, गर्भस्राव होत असतो, परंतु त्यांतूनही बाळंतपण सुखरूप झालें तर मुलांच्या तोंडांत व्रण पडलेले आढळतात. क्षयाच्या विषाची बाधा गर्भाला होत नाहीं; वारेमुळें त्याचा प्रतिबंध होतो. तंबाखू, त्याचप्रमाणें शिशाच्या कारखान्यांत काम करणाऱ्या स्त्रियांमध्यें शिशाच्या विषाचा गर्भावर परिणाम होतो.

Psychic effect upon the mother transmitted to the offspring:—गर्भिणीला एकाएकीं भिती वाटल्यामुळें गर्भपात होतो. हा गर्भपात एकाएकीं टॉक्सीमीयाचा जोर वाढून किंवा गर्भाशयांचे संकोचनांमुळें वार निराळी होऊन होतो हें अद्याप निश्चित झालेलें नाहीं.

मलेरिया तापांच्या विषाचा गर्भावर परिणाम होतो. गरोदरपणांत मलेरिया ताप आला असतां क्विनाइन देण्यांत आल्यास त्याचा गर्भाशयांवर अनिष्ट परिणाम होऊन अकालीं प्रसूति होते ही समजूत प्रचलीत आहे. कारण वार ही रोगप्रतिबंधक असल्यामुळें ती जंतूचा नाश व प्रतिबंध करिते.

बाह्य धक्यानें गर्भावर होणारा परिणामः—बाह्य बाजूनें मार बसला असतां गर्भावर परिणाम होतो किंवा नाहीं ही गोष्ट विचार करण्यासारखी आहे. गर्भाला प्रत्यक्ष परिणाम झाला नाहीं तरी आंतल्या बाजूला वार गर्भापासून निराळी झाल्याचें पहाण्यांत आलेलें आहे. याकरितां गर्भिणीला तपासतांना गर्भाच्या हृदयाचे आवाज ऐकूं येतात किंवा नाहीं तें पाहिलें पाहिजे. तिच्या प्रकृतीवर लक्ष ठेविलें पाहिजे. वार आंतल्या आंत कुजणें व टॉक्सीमिया होणें हे गर्भाला होणारे उपद्रव होत. मूत्रपिंडामुळें टॉक्सीमिया असेल तर रक्ताचा दाब वाढतो, लघ्वीमध्यें सीरम-अलब्युमीन व ग्लोब्युलीन सांपडतात व वारेचें रूपांतर होऊन गर्भाचा श्वास बंद होऊं लागतो. हालचाल हळूहळू कमी होते, हृदयाचे ठोके बंद होतात व हळुहळू गर्भाचें जीवन नष्ट होतें. टॉक्सीमियांच्या दुसऱ्या प्रकारांत रक्तस्राव होऊन वार गर्भाशयाच्या भिंतीपासून सुटते व गर्भ गुदमरून मरतो. उपदंश विषांमध्यें हीच स्थिति असते. वारेला विकार झाला असतां गर्भाला वांचवण्याकरितां गर्भिणीचा जीव धोक्यांत येईल असा प्रयत्न करूं नये, कारण या स्थितींत गर्भ वांचणेंच कठीण असतें. अशा स्थितींत गर्भ मरणें हा गर्भिणीला वांचवण्याचा निसर्गाचा हेतू दिसतो हें यावरून सिद्ध होतें.

(Blighted ovum) वारेला कांहीं विकार झाल्यास गर्भपिंड (ovum) मरून जातो, याला चुकून झालेला गर्भपात म्हणतात. (missed abortion) ही स्थिती ३–४ महिने गेलेले असतांना होते व निदानाच्या वेळीं ही फायब्राइडची गांठ असावी अशी चुकीची कल्पना होते. हा मेलेला गर्भपिंड वर्षानुवर्षे आंत राहूं शकतो. १०–१२ आठवड्यांतील गर्भपिंड असेल तर

त्यांचें आंतल्या आंत शोषण होतें. हाडें वगैरे तयार होऊन गर्भ मेला असेल तर शोषण न होतां हळुहळु योनीच्याद्वारें तो बाहेर पडून जातो अशा वेळीं स्थानिक दोष असेल तर त्या भागांत सूज येऊन व्रण उत्पन्न होतो.

वार उत्पन्न होण्याच्यावेळीं गर्भपिंड मरतो त्यावेळीं पोषकावरणाचे अंकूर व अस्थायी गर्भकोश हीं वाढत असतात, व त्यावेळीं वार साधारणतः तयार झालेली असते.

वार चिकटलेली असल्यामुळें गर्भाशयांत फार दिवस राहूं शकते. गर्भपिंड मरतो त्यावेळीं मातेला साधारण टॉक्सीमीयाचीं लक्षणें होतात, परंतु त्याची जाणीव तिला होत नाहीं, म्हणून तें खालील चिन्हांवरून समजावें लागतें. अस्वस्थता वाटणें, भूक मंद होणें, तोंडाची रुचि बदलणें, जरा काम केलें असतां घाम येणें, नाडीची गति वाढणें, मलावरोध किंवा अतिसाराचीं लक्षणें वगैरे चिन्हें होतात; यावेळीं तपासलें असतां गर्भाशयाचा आकार वाढलेला असतो.

चिकित्साः—रोगी स्त्रीला हॉस्पिटलमध्यें ठेवण्याची ताबडतोब व्यवस्था व्हावी.

सल होणें—:( mole ) गर्भ वृद्धि न पावल्यामुळें त्याच्या आजूबाजूचा मांसल भाग वाढतो. प्रथम गर्भारपणांचीं चिन्हें भासतात व नंतर बंद होतात. साधारणपणें गर्भ उत्पन्न होऊन त्याची वृद्धी न झाली तर सल म्हणण्याची रीत पडलेली आहे. सल हें तीन प्रकारानें होते.

( १ ) आरंभी गर्भावर कोरीयन पडदा असतो त्याच्या वरील असलेल्या villa चें अयोग्य रितीनें पोषण होऊन तो वाढतो व त्याचे द्राक्षाच्या झुबक्या-सारखे दाणे बनतात व गर्भ सुकून जातो.

( २ ) गर्भ नाहिंसा होऊन त्याचे पडदे वाढून ते जाड्या मांसाच्या लगद्या-सारखे होतात.

( ३ ) त्याच्या पडद्याच्या दुपडीचे दरम्यान रक्तस्राव होऊन गर्भाचा लगदा होऊन जातो. हें असें कां होतें याचें कारण सांगतां येत नाहीं.

गर्भोदकाची फाजील वाढः—( Polyhydraminosis ) गर्भोदकाची फाजील वाढ होते त्यामुळें पोट फार मोठें दिसूं लागतें. ही वाढ वेळींच कमी केली नाहीं, तर गर्भामध्यें व्यंग उत्पन्न होतें. बरींच मुलें झाल्यानंतर अशा प्रकारची स्थिती होते. पोषक अन्न न मिळणें, कष्टांचें काम व गरीबी हीं याला कारणें होत.

निदानः—करणें कठिण असतें. एखादे वेळीं स्त्रीअंड, जलोदर, ह्या विकारामुळें सुद्धां पाणी आढळतें. गरोदरपणा आहे किंवा नाहीं हें बॅलटमेंटच्या खुणेवरून निश्चित ठरवतां येतें.

गर्भोदक कमी असणें:—( Oligo hydramnosis )

गर्भोदक जास्त असतें, तसेंच कमीही असूं शकतें. ह्याचेंहि कारण समाधानकारक सांगतां येत नाहीं. गर्भाशय नेहमींपेक्षां अगदीं लहान असतो, व गर्भाचें चलन वलन होऊं लागतें. हें पाणी कमी असल्यामुळें अकालीं प्रसूति होते किंवा जन्मणाऱ्या बालकामध्यें व्यंग आढळतें.

एकापेक्षां जास्त मुलें होणें:—या बाबतींत जें कारण घडत असेल त्याबद्दल डॉक्टरकडून तपासून घेणें; व योग्य ती तजवीज करणें.

---

# प्रकरण १४ वें.

## हृदय व रुधिराभिसरणाचे विकार.

गरोदरपणांत प्रत्येक स्त्रीला हृदयांचे विकार होतात असें नाहीं, परंतु या विकारांची माहिती असल्यास तावडतोब वैद्यकीय इलाज करणें सोईचें पडतें. गरोदरपणांत रक्त १½ नेहमीपेक्षां वाढतें. टॉक्सीमिया झाला असल्यास रक्तांमध्यें फरक होतो, रक्त बिघडल्यामुळें मज्जातंतूवर परिणाम होतो; व त्यामुळें रक्तवाहिन्यांवर व हृदयावर हळुहळु त्यांच्या गतिमध्यें फरक होत जातो. सूज दिसत असेल तर हृदयांचा विकार आहे हें समजून तावडतोब तपासून घेतलें पाहिजे. हृदयांचा विकार समजण्याकरितां गरोदर स्त्रीच्या बाळंतपणाच्या इतिहासाकडे लक्ष दिलें पाहिजे. तिच्या आईला हा विकार होता किंवा काय, किंवा जन्मल्यानंतर अंग निळसर ( Blue-baby ) झालें होतें किंवा काय, त्याचप्रमाणें एनफ्लुएन्झा सारखा दोषिक ताप आला होतां किंवा काय याची माहिती करून घेतली पाहिजे. वारंवार बाळंतपणामुळें सुद्धां हृदयाचे विकार होतात.

निदानः—इंद्रियविज्ञान दृष्ट्या हृदय व रक्तवाहिन्यांची स्थिती कशा प्रकारची आहे हें पाहिलें पाहिजे. श्वास घेतांना दम लागणें, कांहीं काम केलें असतां तावडतोब थकवा येणें, एखाद्या बाजूला निजलें असतां त्रास होणें, श्वास घेतांना त्रास अगर श्वास जलद चालणें, सर्द हवा झाली म्हणजे घाबरेपणा वाटणें. हृदयाच्या जागेवर दुखणें, कळा येणें, आमांशयाची वाढ, पोटांतील आंतड्यांमध्यें वायू असणें, या कारणांमुळें हृदयांच्या ठिकाणीं दुखतें व रोग्याला आपल्याला हा विकार आहे असें वाटतें. वातामुळें होणारीं हीं लक्षणें वातहारक व पचनीय औषधें घेतलीं असतां कमी होतात. कारडीओग्राफनें हृदयांचा विकार आहे किंवा नाहीं हें समजूं शकतें.

हृदयाला विकार असून गर्भाशयांची स्थिति चांगली असेल तर बाळंतपण सुखरूप होतें. ह्या विकारांत विश्रांती हें मुख्य पथ्य आहे. हृदयाचा विकार असतां दोषी ताप आला तर जीवित धोक्यांचें असतें.

चिकित्साः—स्त्रीची बाळपणापासूनची चौकशी करावी. यांवरून हृदयांचा विकार आहे किंवा काय हें समजून येतें. पाळी चुकल्यानंतर अगर कांहीं महिने

गेल्यानंतर केव्हां पासून दुखूं लागलें व त्यावेळीं औषध घेतलें असतां काय वाटलें हें विचारलें पाहिजे. गरोदरपणांत हृदय बरोबर काम करीत आहे किंवा नाहीं, सूज आहे किंवा काय हें पाहिलें पाहिजे. श्वासोश्वासाच्या वेळीं कफ पडण्यांला त्रास होतो किंवा नाहीं हें फुप्फुसें तपासून ठरवलें पाहिजे. पोटाला सूज असणें, रक्ताचा दाब, नाडी नेहमींपेक्षां कमी असणें, चालतांना, उभें रहातांना, बसतांना हृदयांच्या गतींत फरक होणें, हीं हृदयांच्या विकारांचीं चिन्हें आहेत असें समजावें. मूत्रपिंडांचें कार्य बरोबर चालत नसल्यामुळें लघ्वीमधून अलब्युमीन जातो. चेहरा-ओंठ काळसर होतो, झोपलें असतां त्रास होतो. घरांमध्यें काम करतांना त्रास होत असल्यास पूर्ण विश्रांती घ्यावी. शौचाला अगर लघ्वीला जातांना बेडपॅनचा उपयोग करावा. पेय पदार्थ देऊं नयेत.

एपसमसॉल्ट, सारक चूर्ण, निशोत्तर चूर्ण, कुचला, हार्टिना, डिजिटेलीस, अर्जुनचे कल्प वगैरे हृदयविकारावरील औषधें घ्यावींत.

हृदयांच्या विकारांत आईच्या सुखांकरितां गर्भपात करावा किंवा काय ? ह्याबद्दल द्विधामत आहे. ह्या गोष्टी डॉक्टराच्या व स्त्रीच्या मर्जीवर अवलंबून असतात. बाळंतपणाच्या वेळीं हृदयांला उत्तेजक अशीं औषधें चालू ठेवलीं पाहिजेत. ह्या विकारांत फलवाहक नलिका ( Tubes ) काढून टाकल्यास फायदा होतो.

हृदयाचे विकार साधारण माणसाला समजणें अत्यंत कठीण असल्यामुळें योग्य तेवढेंच विवेचन केलेलें आहे.

---

# प्रकरण १५ वें

## गरोदरावस्थेंतील ग्रंथि विकार

### ( Ductless glands )

शरिराचा जीवन व्यापार चालवणाऱ्या दोन प्रकारच्या ग्रंथी आपल्या शरिरांत असतात. कांहीं ग्रंथीना नलिका ( Tubes ) असतात, व कांहीं ग्रंथींना नलिका नसून त्यांचें स्वतःचें नैसर्गिक असें अदृश्य कार्य चालत असतें. नलिका विरहीत ग्रंथीचें कार्य महत्त्वाचें असतें हें अलिकडेच सिद्ध झालेलें आहे. या ग्रंथीच्या कार्यांची कल्पना अद्यापपर्यंत शास्त्रज्ञांना नव्हती. या शोधांमुळें वैद्यकीय शास्त्रांत क्रांती झालेली आहे.

लहानपणांत शरिराच्या वाढीला थायमस ग्रंथी ( Thymus ) चा ( गळ्याच्या खालीं असलेली ग्रंथी ) उपयोग होतो. ही गांठ वाढल्यास श्वासनालिकेवर दाब पडून मृत्यु येतो. स्त्रियांमध्यें या ग्रंथीचा जननेंद्रियांवर काय परिणाम होतो याचा अद्याप शोध लागलेला नाहीं. कौमार्यावस्थेंत वाढ कमी जास्ती होणें हें गळ्यांतील ग्रंथीवर ( Tonsils ) अवलंबून असतें. गलग्रंथी नैसर्गिक स्थितींत असणें निरोगीपणाचें लक्षण असून ती सांसर्गिक विषांना प्रतिबंध करते व ह्यामुळेंच ही ग्रंथी काढूं नये असें मत प्रचारांत येऊं लागलें आहे. रजःस्रावामुळें गलग्रंथीमध्यें कांहीं फरक होत नाहीं, परंतु एखादेवेळीं सर्दी झाल्यास ती वाढूं शकते व नंतर कमी होते. रसवाहक ग्रंथीचा ( lymphatic gland ) समावेश ह्या ग्रंथींत होत नाहीं. परंतु ह्या ग्रंथीचा त्या ग्रंथींशीं संबंध असतो. गरोदरपणांत रसवाहक ग्रंथीचें कार्य वाढतें. उदरच्छेदन केलें असतां गरोदरपणांत ह्या ग्रंथी वाढलेल्या आढळतात यांवरून हें सिद्ध होतें. अशक्त स्त्रियांमध्यें स्तनांत दूध येण्याच्या पूर्वी कांखेमधील ग्रंथी वाढलेल्या आढळतात, व दूध सुरू झालें म्हणजे त्या कमी होतात. गरोदरपणांत नाक व गळा यांच्या द्वारें स्टेफ्टोकोकॉय जंतु जाण्याचा जास्त संभव असतो. दांतामध्यें पोकळी असेल, पू झालेला असेल व दांत स्वच्छ ठेवले नाहींत, तर बाळंतपणांत हा पू पोटांत जाऊन ( पुवांत हे

जंतु असतात ) दोषी ताप उत्पन्न करतात. ह्या करितांच गरोदरावस्थेमध्यें दांत, तोंड, नाक, वगैरे काळजीपूर्वक स्वच्छ ठेविलीं पाहिजेत.

थॉयरॉइड ग्रंथीः—( Thyroid gland ) गरोदरपणांत ही गांठ वाढत असते. त्यांमधील स्रावांचा उपयोग महत्त्वाचा असतो. गरोदरपणाचा व ह्या ग्रंथीचा निकट संबंध असतो. फलवाहक बीजें, फलवाहकांतून बाहेर पडतात, त्याचा या ग्रंथीशीं संबंध असतो. स्थूल, लठ्ठ-स्त्रिया ज्यांना बरींच वर्षे मुलें झालेलीं नाहींत व ज्यांच्या ओंटीच्या हाडांमध्यें व्यंग असतें अशा स्त्रियांमध्यें या ग्रंथीचें कार्य बंद असल्यामुळें गरोदरपणा येत नाहीं. परंतु ह्या ग्रंथीचा एक्सट्रेक्ट कमी प्रमाणांत देण्यास सुरवात केली तर गरोदरावस्था प्राप्त होते. स्तनांची योग्य वाढ होणें याच ग्रंथीवर अवलंबून असतें. गरोदरपणांत या ग्रंथीच्या कार्यात कमीजास्ती-पणा होतो.

थॉयरॉइडचें फाजील मार्गः—( Hyper thyrodism ) रक्ताच्या दाबाची वाढ होते, व रोग्याची स्थिती नेहमीपेक्षां क्षुब्ध (Excitable) होते. जास्त मुलें झालेलीं आहेत अशा स्त्रीमध्यें, गर्भाशयांच्या वेणा राहून राहून येतात व त्या त्रासदायक असतात. स्तनाची वाढ जलद होत असते. थॉयरॉइड ग्रंथी वाढून गॉयटर विकार होतो.

थॉयरॉइड ग्रंथीचें कार्य कमी प्रमाणांत होणें:—( Hypo thyrodism ) नाडीचा दाब अगदीं कमी असतो, स्तनांची वाढ होत नाहीं व जननेंद्रियें नैस-र्गिक स्थितींतच असतात.

थॉयरॉइड ग्रंथीला इजा असेल, किंवा तिच्या द्रावांमध्यें ( Secretion ) फरक असेल तर बाळंतपणाच्या वेळीं भयंकर स्थिती होते. बाळंतपणाच्या वेळीं ही ग्रंथी एकाएकीं वाढते, त्यामुळें छाती कोंडल्यासारखी होते, श्वास चालण्यास व्यत्यय येतो व रुधिराभिसरण बरोबर चालत नाहीं. अशा वेळीं संज्ञानाशक औषध देऊन प्रसूति करावी लागते.

थॉयरॉइड ग्रंथी मोठी झालेली असेल तर त्याचा प्रसूतीवर वाईट परिणाम होतो. पोटामध्यें थॉइरॉइड एक्सट्रॅक्ट दिला असतां चांगला फायदा होतो. टॉक्सी-मीया असेल तर दूध येणें बंद होतें. अशावेळीं हा एक्सट्रॅक्ट दिला असतां टॉक्सीमीया कमी होऊन दूध येऊं लागतें.

वर दिलेल्या वर्णनावरून थॉयरॉइड ग्रंथीचा गरोदरावस्थेशीं संबंध व महत्त्व किती आहे हें समजून येतें.

Adrenals, Pituitary and Placenta.

ॲडरीनल ग्रंथीः—गरोदरपणांत ह्या ग्रंथीच्या कार्यात कांहीं फेरफार होतो किंवा काय हें निश्चित झालेलें नाहीं. ह्या ग्रंथीच्या स्रावांचा उपयोग रुधिराभिसरण योग्य प्रमाणांत चालण्याकडे होतो व याकरितांच रक्तांच्या अभिसरणांमध्यें बिघाड झाला म्हणजे ह्या औषधाचे थेंब देतात.

गरोदरपणांत रक्तांचा दाब वाढण्याला ह्या ग्रंथीच कारण असाव्यात; परंतु रक्तामध्यें विषारी परिणाम झालेले असतील तरीसुद्धां वरीलप्रमाणेंच दाब वाढतो म्हणून ग्रंथीच्या कार्याबद्दल तज्ज्ञांना अद्याप संशय आहे.

गरोदरपणांत रक्ताचा दाब अगदीं कमी असेल तर त्याचें कारण यकृतांचा बिघाड हें होय. रक्तस्राव किंवा भयंकर धक्का बसल्यामुळें रक्ताचा दाब कमी होतो अशा वेळीं ॲडरनेलिनचें इंजेक्शन दिलें असतां योग्य तो परिणाम होतो. गरोदर स्त्रियांस टॉक्सीमीया झाला असतां ॲडरनेलीन ग्रंथीमध्यें कांहीं फरक होत असावा अशी समजूत आहे.

पिट्युटरी बॉडीः—गरोदरपणांत ह्या ग्रंथीमध्यें फरक होतो, ह्या फरकामुळें शरिरावर काय परिणाम होतो तें निश्चित ठरलेलें नाहीं. गर्भाशयांच्या स्नायूंवर ह्याचा चांगला उपयोग होतो; व ह्या करितांच बाळंतपणाच्या वेळीं वेणा कमी होत असल्यास ह्याचें इंजेक्शन देतात. खऱ्या वेणा सुरू होऊन स्राव सुरू झाला म्हणजेच हें इंजेक्शन द्यावें. त्याच्या अगोदर दिलें असतां, त्यापासून वाईट परिणाम होतो. ही वैद्यकीय बाजू असल्यामुळें त्यांचा ऊहापोह न करतां ह्या ग्रंथीचा गर्भाशयांच्या स्नायूंवर उपयोग होतो एवढेंच लक्षांत ठेवावें.

वारः—( Placenta ) वारेचा उपयोग गरोदर पणांत महत्त्वाचा आहे. वार नेहमीं मुलाचें वजन व आकार या प्रमाणांत असते. त्याचप्रमाणें आईच्या प्रकृतिवरही अवलंबून असते. आईला भरपूर पोषण मिळत नसेल तर मुलालाही त्याचप्रमाणें पोषण मिळत नाहीं. वारेमध्यें असणाऱ्या द्रव्यांचा ( Substances ) गर्भाशयाला उत्तेजन देणें व दूध उत्पन्न करण्याकडे उपयोग होतो. शिवाय रक्तावरही वारेचा ताबा असतो. वारेचा उपयोग दूषित रक्तामधील कॉर्बन डी ऑक्साइड बाहेर काढून प्राणवायु गर्भाला पोचवण्याकडे होत असतो. वारेला

विकार झाल्यास मूल दगावण्याचा जास्त संभव असतो. जंतूची बाधा गर्भाला होऊं नये व जंतु वारेमधून गेले हें प्रयोगानें सिद्ध झालेलें आहे. उपदंश व क्षय यामुळें वारेच्या कार्यांत फरक होतो. वारेचें कार्य नैसर्गिक गरोदर स्थितींत कशा प्रकारचें चालतें याचें निश्चित निदान होईल तर याहिपेक्षां वारेचें कार्य समजून त्यांचा गर्भ व गरोदर स्त्रीला फायदा होईल असें अनुमान आहे. मातेची प्रकृति चांगली असेल, उत्सर्जन क्रिया बरोबर असेल, रक्त चांगलें असेल तर गर्भाची स्थितीही चांगली आहे हें निश्चित होतें. क्ष किरणानें तपासल्यास वारेचा आकार वाढलेला आहे किंवा तिला विकार झालेला आहे हें समजून येतें व त्यामुळें गर्भालाही विकार होतो. ह्या संबंधीं गर्भिणीच्या प्रकृतिची काळजी घेणें ह्या पलीकडे दुसरा उपाय नाहीं.

## स्तन विकार व ग्रंथी (Mammary glands)

स्तनांमधील ग्रंथीला नलिका असल्या तरी त्यांची नलिका विरहीत ग्रंथीच्या कार्यांत मदत होत असते. थॉयरॉइड व पिटयुटरी ग्रंथी ह्यांची वाढ ह्या स्तनामधील ग्रंथींवर अवलंबून असते. या ग्रंथीच्या वाढीमध्यें बिघाड झाला म्हणजे त्याचा परिणाम थॉयरॉइड ग्रंथीवर होतो.

गरिबी, अशक्त, पोषक अन्न बरोबर न मिळणें यामुळें कौमार्यावस्थेमध्यें वाढ पाहिजे तशी होत नाहीं. उपदंश, संधिवात, क्षय, मद्यपान यांचा संततीवर आनुवंशिक परिणाम होतो. हाडें वाढत नाहींत, कटिर ( Pelvis ) लहान असतो व स्तनांची वाढ खुंटते. थॅायराइड ग्रंथीच्या व मज्जातंतूच्या कार्यामध्यें न्यूनता असते. उन्हाळा असणाऱ्या ठिकाणीं यौवनावस्था लवकर प्राप्त होते, स्तन मोठे होतात, व विटाळहि भरपूर जातो. पाळीच्यापूर्वी व नंतर स्तनांमध्यें अत्यंत पीडा होते व एखादेवेळीं ती असह्य होते.

गरोदरावस्था व स्तनग्रंथींची अपूर्ण वाढः—स्त्रियांच्या स्तनांची वाढ बरोबर झालेली नसेल तर गरोदरपणा त्रासदायक होतो. ह्या ग्रंथींची साधारण वाढ होत असते, परंतु त्याना हात लागला असतां कळा लागतात. बाळंतपणांत दूध आल्यानंतर मूल दूध पिऊं लागलें म्हणजे स्तनांला चिरा पडतात, चिरा पडल्यामुळें स्तन दूषित होऊन सुजतात, त्या ठिकाणीं गळूं येऊन ते पिकतात व पू तयार होतो. अशा स्त्रियांमध्यें गरोदरावस्था प्राप्त झाली म्हणजे स्तनांकडे लक्ष दिलें पाहिजे. तेल वगैरे लावून स्तन हळुहळु चोळले पाहिजेत. स्तनांचीं बोंडें जंतु-

नाशक औषधानें धुऊन स्निग्ध द्रव्यांनीं तूप, लोणी, कोकम यांनीं चोळलीं पाहिजेत. अंगामध्यें घट्ट चोळी घालूं नये. घट्टपणांमुळें स्तनांच्या वाढीला प्रतिबंध होतो. आरंभीं कांहीं आठवडे थॉयरॉइड एक्सट्रॅक्ट डॉक्टरच्या सल्ल्यानें घ्यावा. कांहीं स्त्रियांचे स्तन एवढे वाढतात कीं, ते त्यांना त्रासदायक होत असतात. बाळंतपणानंतर हा आकार कमी होतो. व्यायाम केला पाहिजे. स्निग्ध पदार्थ वर्ज्य केले पाहिजेत. मलावरोध दूर केला पाहिजे व घट्ट कपडे वापरणें टाळलें पाहिजे.

स्तनांला सूज येणें:—( Mastitis complicating Pregnancy ) स्तनांला बाह्य इजा झाली तर सूज येते व त्यापासून दोषी ताप येतो. हा ताप कां यावा असा प्रश्न साहजिकच येतो, याला कारण स्टॅफिलो कोकाय जंतु हे गरोदरावस्थेंत स्तनांच्या ग्रंथीच्या स्रावांमध्यें आरंभापासून असतात व ते ही संधी पहात असतात.

निदान:—स्तन घट्ट लागणें, लाल, दुखावा, दाबलें असतां मऊपणा, असें आढळल्यानंतर ताबडतोब इलाज केले पाहिजेत. इकडे दुर्लक्ष केल्यास कांखेंतील ग्रंथींना सूज येते.

चिकित्सा:—मार लागला अगर कांहीं धक्का लागला असें समजतांचा, सूज न वाढेल असा प्रयत्न ताबडतोब केला पाहिजे. बिछान्यावर निजण्यास सांगावें. जंतुनाशक साबणानें स्तन साफ धुवावेत व अफूचा लेप करावा. लाली कमी होईपर्यंत हें चालूं ठेवावें. याप्रमाणें उपचार चालू ठेवल्यास गळूं होत नाहीं. पू झाला असल्यास असपीरेटरनें काढावा. स्तनाला दरवाजा, टेबल किंवा मोटरचा अपघात झाल्यामुळें दुखावा उत्पन्न होतो. अशा वेळीं गर्भपात झाल्यास तो स्तनांच्या जखमेमुळें होत नसून मनावर झालेल्या परिणामामुळें होय.

स्तनांमध्यें घट्टपणा लागणें:—( Adeno mata ) स्तनांची आंतली बाजू घट्ट होऊन स्तनांभोंवती एक पिशवी तयार होते. (cyst) हें अनुवंशिक असतें. ही गांठ गरोदरपणाचे दिवस वाढतात त्याप्रमाणें वाढत जाते; व हा गोळा हलत असतो. तो दुष्टव्रण असावा ( cancer ) असें वाटतें. ह्यांमध्यें शस्त्रक्रिया करणें भाग पडतें.

दुष्टव्रण:—( cancer of the breast ) गरोदरपणांत स्तनाला दुष्टव्रण होतो. हा व्रण होत आहे असें ठरल्यावर वेळ न घालवतां शस्त्रक्रिया करून घेणें चांगलें.

# प्रकरण १६ वें

## प्रसूतीची पूर्व तयारी

कोणतेंहि महत्त्वाचें कार्य करण्याचे पूर्वी त्याबद्दलची सर्व तरतूद आगाऊ करून ठेवावी लागते व तशी ती केल्यानें पुढें करावयाचें अगर व्हावयाचें कार्य, सुकर विनायास पार पडतें.

गरोदर स्त्रीचे नऊ मास पूर्ण झाल्यानंतर योग्यवेळीं ती स्वाभाविकपणें प्रसूत व्हावयाची हें ठरलेलें आहे. यासाठीं प्रसूतीपूर्वीं कोणकोणत्या गोष्टींकडे लक्ष देणें जरूरीचें आहे व कोणत्या प्रकारची तयारी ठेवणें आवश्यक आहे त्याबद्दलचा विचार करूं.

ज्यांची स्थिती पैसा खर्च करण्यासारखी आहे ते घरांतील गरोदर स्त्रीच्या बाळंतपणाची व्यवस्था खासगी हॉस्पिटलमध्यें करीत असतात. तसेंच ज्यांची गरीब स्थिती आहे ते धर्मार्थ अथवा मोफत हॉस्पिटलमध्यें सोय करतात. परंतु या दोन्ही प्रकारच्या सोयी मोठमोठीं शहरें खेरीज करून सर्वच ठिकाणीं मिळत नाहींत. सर्वसाधारणपणें सर्वांना—विशेषतः लहानमोठ्या खेड्यांतील लोकाना आपआपली सोय स्वतंत्रपणेंच पहावी लागते.

ज्या ठिकाणीं बाळंतपण व्हावयाचें ती खोली चांगली ऐस पैस असावी व तिच्यांत वारा व उजेड भरपूर येईल अशी तजवीज करावी. या खोलींत बाळंतपणाचे पहिले १०-१२ दिवस काढावे लागतात व तिथें बाळंतीण, सुईण—अथवा नर्स व मूल यांना सतत २४ तास एकत्र रहावयाचें असतें. खोलींतील जमीन स्वच्छ असून सर्द नसावी व खिडक्यांतून नेहेमी वारा, उजेड खेळता राहील व वाऱ्याचा झोत अंगावर न येण्यासाठीं पडदा वगैरे लावून जरूर ती सोय करावी. खोलींत बाळंतिणीसाठीं, पलंग, कॉट, गादी, चादर, उशा वगैरेसह मुलासाठीं पाळणा, व सुईणीसाठीं झोंपण्याची वगैरे सोय करावी. तसेंच कपडे ठेवण्यासाठीं, खुंटाळें, व लहानसें एक कपाट व टेबलाची तरतूदहि करावी. मूल जन्मतांच त्याला लागणारे लहान लहान गरम कपडे, नाळ छेदनाचें साहित्य, दोरा, कात्री, चाकू, चिमटे, मुलास आंघोळ घालण्यासाठीं टब, बोरिक पावडरचा डबा, पावडरचा मृदु कुंचला, साबू तसेंच बाळंतिणीसाठीं जरूर लागणारे कपडे पोटावर बांधण्याचे पट्टे, प्रसूतीनंतर योनिस्राव शोषून घेणारे सॅनिटरी टॉवेल्स

अथवा प्रसूति रुमाल, बेडपॅन ( शौचाचें भांडें ) व यूरिनल ( लघवी धरण्याचें भांडें ) स्पंज, डूश, मेणकापड, फीडिंग कप—झोंपल्याजागीं पेज जिन्नस पाजण्याचें भांडें, मेझर ग्लास, व्हॅसलीन, सेफ्टीपॅन्स, ब्रॅण्डी, देशी औषधांपैकीं हेमगर्भ, प्रतापलंकेश्वर, मध, महावातास्त्र तेल, चंदनबला लाक्षादि तेल हीं औषधें तयार ठेवावीं. प्रसूतिकालांत जे कपडे वापरावयाचे ते स्वच्छ परीट घडीचे असावे. तसे नसल्यास स्त्रियांस सूतिकाज्वर होण्याची भीति असते. तसेंच जें पाणी धूतिकालीं वापरावयाचें तें तापवून थंड केलेलें असावें. साधें थंड पाणी वापरल्यास सूतिकाज्वर व धनुर्वात होण्याचा संभव असतो. एकंदरींत प्रसूतीच्या पूर्व तयारींत सूतिकागार अथवा बाळंतिणीच्या खोलीची तयारी व व्यवस्था विशेष काळजीपूर्वक आगाऊ करून ठेवणें फार महत्त्वाचें आहे.

आपल्या आयुर्वेदांत सूतिकागार व त्या ठिकाणच्या साधनसिद्धतेचें महत्त्व फार सांगितलें आहे. चरक ( शारीर. अ. ८,४७ ) सुश्रुत यांच्या म्हणण्याचा आशय असा आहे कीं, शुद्ध, स्वच्छ, उजेडाची, मोकळी हवा खेळेल अशी पूर्व उत्तराभिमुखी खोली, तिच्यांत अवश्यक तितकीं शुद्ध, स्वच्छ वस्त्रें, बिछान्यावर मेण कापड, विस्तृत खाट अथवा पलंग, बस्ति ( एनिमा ) व उत्तर बस्तीचें. ( यूटराईनडूशचें ) सर्व सामान, अग्नीची व खाद्यपानादिकांची सिद्धता, ऊन पाणी, कृमिघ्न औषधें, गर्भाशय संकोचक व गर्भाशयोत्तेजक औषधें, पुष्कळशीं बाळंतपणें झालेल्या व केलेल्या व गोड स्वभावाच्या कष्टाळू, दयाळू, समयज्ञ स्त्रिया ( **परिणत वयसः प्रजनन कुशलाः कर्तितनखाः—सुश्रुत** ) ( परिचारिका, नर्सेस, मिडवाइफ्स् ), जाडा दोरा, तीक्ष्ण चाकू अथवा कात्री, इत्यादि शस्त्रें असावीं, ही सर्व सिद्धता अथवा तयारी कालानुसार बदलत आली आहे. चरकाच्या काळांत त्या ठिकाणीं एक एक "खर वृषभ" असावेत असेंहि सांगितलें आहे. कारण वार न पडल्यास त्याच्या कानांचे तुकडे काढयांत उकळून तेव्हां देत असत ! औषधी तयारींत पिंपळी, पिंपळमूळ, कुळीथ वगैरे औषधें सांगितलीं आहेत तीं गर्भाशय संकोचक असल्याचें अनुभव सिद्ध आहे. तसेंच तेल, तूप, मध, सैंधव, संचळ, करंज, हिंग, लसूण, वगैरे जीं औषधें चरकानें सांगितलीं आहेत, त्यांपैकीं, कांहीं कृमिघ्न व व्रणरोपण असल्यानें फार उपयोगी आहेत. सुरा व आसवें हीं उत्तेजक असल्यामुळें त्यांचाहि संग्रह आवश्यक म्हणून सांगितला आहे. योनिलेपन व कृमिघ्न धूपनाचाहि उद्देश तोच आहे.

प्रसूतावस्थेंतील सूतिकाज्वर हा भयंकर स्वरूपाचा असून तो जंतुद्भव असतो. यासाठीं जंतुनाशन अगर त्याचा प्रतिकार ही बाब सूतिकागारांत फार महत्त्वाची मानली गेली आहे. सूतिकागारांत कृमिघ्न व **व्रणरोपण औषधांची सिद्धता ठेवण्याबद्दल आयुर्वेदाचार्यांनीं जी सूचना दिलेली आहे त्यावरून त्यांना या जंतूंचें महत्त्व पूर्णपणें पटलेलें होतें हें सिद्ध होतें.**

सूतिकाज्वराचा उद्भव जंतूपासून होत असल्याचा शोध पाश्चात्य शोधक **पेश्चूर** यानें लावला अशी प्रसिद्धी आहे पण, तत्पूर्वी कैक वर्षांपूर्वी आयुर्वेदाचार्यांनीं याबद्दलचा शोध लावून सूतिकागारांतील तरतुदी संबंधीं **ज्या सूचना दिलेल्या आहेत, त्यावरून त्यांना या जंतूंचें महत्त्व पटलेलें होतें हें सिद्ध होतें; एवढेंच नव्हे, सूतिकागाराच्या** बाबतींतील आजकाल जी सुधारलेली पद्धत म्हणून दर्शविली जाते, ती **हि आयुर्वेदाचार्यांच्या सूचनानुरोधानें केलेलें त्यांचें अनुकरण होय** असें त्यांच्या निरानिराळ्या सूचना-आदेशावरून दिसून येतें. अर्थात् आयुर्वेदशास्त्र या विषयाला किती महत्त्व देत आलें आहे, हेंहि त्या दृष्टीनें पाहणाऱ्याच्या नजरेस येणार आहे.

गर्भधारणा होऊन नऊ महिने पूर्ण भरतांच किंवा जवळ जवळ त्या सुमारास प्रसूतिकाल असतो हें प्रत्येक स्त्रीस माहित पाहिजे. गर्भधारणा होऊन पिंड वाढूं लागतांच, गर्भवतीस अनेक प्रकारचे शारीरिक कष्ट सोसावे लागतात; व पिंड वाढत असतांना गर्भाशय मोठा होऊन पोटांत वर आल्यावर त्याचे आंतील भागांत एक पिशवी असते, तिच्यांत पाणी असून या पाण्यांत वाढणारें मूल तरंगत असतें याबद्दलची माहिती मागें विषयानुरोधानें आलीच आहे. गर्भाशयांतील मूल खालींवर गिरक्या घेत असलेलें गर्भिणीस समजतें व तें फिरत असतांना गर्भाशयाचें आकुंचन प्रसरण होऊन मधून मधून प्रत्येक गर्भिणीच्या पोटांत बारीक कळा येत असतात; पण नऊ महिने भरतांच गर्भाशयाचें एकदम जोरानें आकुंचन होऊं लागतें व त्यामुळें दुःखावेग जास्त होऊन पोटांतील वेदना असह्य होतात. या कळा येतांना प्रथम थोडी कळ येऊन ती थांबते; पण मलावरोध होऊन येणाऱ्या कळांपेक्षांही ही कळ जोरदार व वेगळ्या प्रकारची असते. कळ सुरू होण्याचे अगोदर गर्भवतीचे कंबरेंत जोराची वेदना होते व तिच्या मांड्या दुखूं लागतात व गर्भाशयास ताण पडल्यानें पोट एकदम घट्ट होतें

याप्रमाणें कळ येऊन ती थोडा वेळ राहून नंतर पोट पुन्हां सैल होतें व अशा स्थितींत कांहीं वेळ जातो. याप्रमाणें कळ सुरू झाली कीं एनिमा देऊन टाकावा. व आंतडीं रिकामीं करावीं. एनिमा देऊन मळ धुवून निघाल्यावर जर पोटांतील कळ सारखी सुरू राहिली तर ही कळ प्रसूति-वेदना होय असें समजून उपरोक्त सूचना देऊन सिद्ध केलेल्या सूतिकागारांत—बाळंतिणीच्या खोलींत गर्भिणीला ठेऊन नर्स—परिचारिका—डॉक्टर यांना आणवून पुढील व्यवस्थेस लागावें किंवा हॉस्पिटलमध्यें प्रसूतीची व्यवस्था करण्याचें ठरविलें असेल तर गर्भिणीला तावडतोब तिकडे पाठवावें.

एकंदरींत सगर्भावस्था ही जरी नैसर्गिक स्वरूपाची असली तरी स्त्रीजीवनांत व भावी पिढीच्या हिताच्या दृष्टीनें तिचें फार महत्त्व आहे. व त्या स्थितींत स्त्रियांची काळजी घेणें फार अगत्याचें आहे. गरोदरावस्थेंत गर्भिणीला जे निर-निराळ्या स्वरूपाचे विकार होतात त्यांची संपूर्ण माहिती या भागांत प्रसंगोचित दिलेली आहे. हे विकार झाल्यावर धांवपळ करून ते दूर करण्याचा प्रयत्न कर-ण्यापेक्षां आरंभापासूनच गर्भिणीच्या प्रत्येक गोष्टीकडे लक्ष पुरवून त्यांची बाधा गर्भिणीला न होईल त्या विकारांचा प्रतिकार होईल अशी खबरदारी व तरतूद राखणें गर्भिणीचें व तिच्या पालकांचें कर्तव्य आहे. सगर्भावस्था ही अत्यंत नाजूक अतएव काळजीची असते म्हणूनच त्या अवस्थेंतील विषयांचें सांगोपांग या भागांत विवेचन केलें आहे व त्याप्रमाणें खुद्द गर्भिणीनें स्वतःच्या हितासाठीं व आपल्या बालकाच्या कल्याणासाठीं तारतम्यानें आचरण करणें तिचें व पर्यायानें तिच्या पालकाचें कर्तव्य आहे.

# भाग ३ रा

## प्रकरण १ लें.

### प्रसूतीच्या तीन अवस्था

गरोदरपणांत स्त्रीची प्रकृति चांगली निरोगी असेल तर बाळंतपण निसर्गाच्या नियमांप्रमाणें सुखरूप झालेंच पाहिजे यांत संशय नाहीं. दिवसेंदिवस मध्यम वर्गाची स्थिती बिकट होत असल्यामुळें घरीं बाळंतपण होणें, फार कठीण झालेलें आहे. बाळंतपणाची हल्लींची हॉस्पिटलमधील सुधारलेली म्हणून दर्शविली जात असलेली व्यवस्था, **चरक, सुश्रुत, वाग्भट,** या आपल्या आयुर्वेदाचार्योनीं लिहिल्याप्रमाणेंच आढळते, व स्वच्छता, शुद्ध हवा, उजेड, हें बाळंतिणीच्या खोलींत असलेंच पाहिजे याबद्दल दोन्ही वैद्यकांची दृष्टी एकच आहे, असें आढळून येतें, मग बाळंतिणीलाच, काळोख असलेली, वारा नसलेली, व गलिच्छ वातावरणाची अशा तऱ्हेची जुन्या काळची व्यवस्था कां रूढ झाली यांचें आश्चर्य वाटतें. त्याबद्दल विचार करतां हा दोष परंपरागत रूढीलाच द्यावा लागेल. आयुर्वेदीक पद्धती अशा प्रकारची नाहीं हें त्यांतील विवरणावरून स्पष्ट दिसतें. टिकाकारांनीं आपले आयुर्वेदीय ग्रंथ न पहातां हीच हिंदुची पद्धत असावी, व यामुळेंच बाळंतीण—मुलें यांच्या मृत्युसंख्येची जास्त वाढ होते असें मानण्यास त्यांना या रूढीमुळें बळकट कारण सांपडलें असावें असें वाटतें. परंतु समाजामध्यें रूढींना महत्त्व जास्त असल्यामुळें, शास्त्राच्या विचारसरणीकडे साहजिकच डोळेझांक केली जाते ! सूतिकाज्वरांसारखे विकार बाळंतपणांत अशा प्रकारची गलिच्छ वागणूक ठेवली असतां होतात हें लिस्टर व पेश्चयुरच्या जंतुनाशन पद्धतीनंतर सिद्ध झालेलें आहे; व ही जंतुनाशन पद्धति अंमलांत आणल्यानंतर सुतिकाज्वरांसारखे विकार टळतात, हें हॉस्पिटल मधील केसीसवरून कळून येत आहे. जंतुनाशन, स्वच्छता याविषयीं आपल्याकडे धर्माच्या नांवाखालीं जें दिनचर्या, ऋतुचर्या, यांचें महत्त्व आपल्या वैद्यक ग्रंथांत दर्शविलें आहे त्याचा उघड व स्पष्ट

हेतु जंतुनाशन हाच आहे हें आपले वैद्यक ग्रंथ त्या दृष्टीनें पाहिल्यास सहज कळून येणार आहे; परंतु पाश्चात्त्यांचें सर्वच चांगलें, आमचें तेवढें वाईट ही परप्रत्येन बुद्धि जेथें अंगीं बाणलेली आहे तेथें अशा प्रकारच्या विचाराकडे कोणी लक्ष द्यावें ? असो.

बाळंतपण हॉस्पिटलमध्यें करण्याचें प्रत्येकाला शक्य नसल्यामुळें, निदान प्रत्येक स्त्रीला प्रसूतीच्या तीन अवस्था असतात याची माहिती पाहिजे, या तीन अवस्था अत्यंत महत्त्वाच्या आहेत. पुष्कळ वेळां या स्थितीचें अज्ञान असल्यामुळें मजा काय होते बाईच्या पोटांत दुखत असलें म्हणजे तें खरें किंवा खोटें याची घरांतील मंडळीना जाणीव नसल्यामुळें, बाईला विनाकारण एखाद्या खोलींत ८-८ दिवस काढावे लागतात, व या अज्ञानामुळें घरांतील मंडळींना निष्कारण विवंचनेंत दिवस काढावे लागतात.

उपरोक्त तीन अवस्थाच्या विचारापूर्वी प्रथमतः कोणत्या प्रकारची व्यवस्था असावी तें अगोदर पाहूं. बाळंतिणीची बाज लोखंडाची असावी. सुइणीला तिच्या सभोंवार जातां येईल अशा पद्धतीनें ती ठेवावी. बाजेवर मेणकापडाचा तुकडा मध्यावर असावा. ह्या तुकड्यावर सूतिकास्राव होतो त्यामुळें इतर कपडे खराब होत नाहींत. उशाच्या बाजूला दुसरा मेणकापडाचा तुकडा ठेवावा.

पहिले ८ दिवस शौचाला साफ होण्याकरितां -॥- ते १ औंस स्त्रीला एरंडेल द्यावें व नंतर कांहीं दिवस सकाळीं विरेचन चूर्ण, त्रिफळा चूर्ण अशाप्रकारचें सौम्य सारक औषध द्यावें. प्रसूतीनें डाव्या कुशीवर निजावें. गुडघे पोटाशीं घ्यावेत. सुइणीनें तिच्या पाठीशीं उभें रहावें. प्रसूतिचे नितंब बाजेच्या कडेजवळ आलेले असावेत.

सुइणीनें आपला हात जंतुनाशक औषधानें धुवावा. तर्जनी व मध्यमा ह्या दोन बोटांना जंतुनाशक औषधें लावून तीं बोटें योनीमार्गात हळुहळू शिरवावीं. बोटांना गर्भाशयाची मान व तोंड हीं लागतात. योनी परीक्षेनें गर्भाशयाचें तोंड कोणत्या अवस्थेंत आहे हें समजून घ्यावें.

( १ ) जननमार्गाची स्थितिः—मऊ व ओलसर असेल तर प्रसूति लवकर होईल व जर तो ऊन व रुक्ष असेल तर बराच वेळ आहे असें समजावें.

मलाशयाची स्थितिः—मलाशय भरलेला असेल तर बोट व त्रिकास्थीची ( sacrum ) पोकळी यांच्यामधून तो योनी मार्गाच्या मागच्या भिंतीतून पुढें आलेला लागेल व रिकामा असेल तर बोटांना लागणार नाहीं. आंत मळ असेल तर एनिमा द्यावा.

प्रसूतीची पहिली अवस्थाः—( 1st stage ) हें गर्भाशयाच्या मुख प्रसरणावरून ठरवतां येतें. मुख पूर्ण रुंद झालें म्हणजे पहिली अवस्था पुरी होऊन दुसरी अवस्था ( stage ) सुरू होते.

खोट्या वेणा ( false pains ) गर्भाशयाचें तोंड मुळींच सुरू न होतां वेदना होत असतील तर त्या खोट्या वेणा आहेत असें समजावें.

दुसरी अवस्थाः—(2nd stage) ग्रीवेचें तोंड पूर्ण पसरून झाल्यानंतर दुसरी अवस्था सुरू होते. वेणा सुरू असतां गर्भोदकाची पिशवी हाताला लागल्यास ती नखानें फोडावी. ह्यामुळें गर्भकोश फुटून गर्भोदक एकदम बाहेर येतें. या गर्भोदकाबरोबर डोकें अगर दुसरा भाग कटिराच्या काठांत बराच पुढें येऊन बसतो. गर्भदर्शन व नाळ पुढें आलें किंवा काय हें योनीपरिक्षा करून ठरवलें पाहिजे. या अवस्थेच्या वेळीं प्रसूतेला आंथरुणावर निजवावें, व खुंटीवर धोतर बांधून हातानें ओढण्यास द्यावें. यामुळें कुंथण्याला व गर्भाला पुढें येण्यास जोर मिळतो. प्रसूतीची परीक्षा अर्ध्या अर्ध्या तासानें केली असतां, गर्भाची गति कळून येते. प्रत्येक वेळीं हात जंतुनाशक औषधानें धुवावेत. डोकें बाहेर पडल्यावर सुइणीनें डोकें हातांत धरावें व नाळ गर्भाच्या मानेभोंवतीं आहे किंवा काय तें पहावें. तोंडांतील कफ रुमालानें पुसून काढावा, व डोळेंहि त्याच प्रमाणें पुसून काढावेत. पोटावरून हात दाबून प्रसूतेला मदत केल्यास वेणा येण्यास मदत होते, व गर्भाशय रिकामा होऊन तो दाबला गेल्यामुळें नंतर रक्तस्राव होत नाहीं.

तिसरी अवस्थाः—(3rd stage) तिसरी अवस्था म्हणजे मूल बाहेर आल्यानंतरची व्यवस्था या अवस्थेवर सर्व अवलंबून असतें. यामध्यें हलगर्जीपणा अस्वच्छता, असे प्रकार घडल्यास सूतिकाज्वर, गर्भाशय सैल रहाणें, तो स्थानच्युत होणें, ह्या गोष्टी होतात.

डाव्या हातानें गर्भाशयाचें बुड आंवळून घट्ट धरावें. बेंबीजवळ डोक्याच्या आकाराएवढा कठीण वाटोळा गोळा हातास लागला, तर गर्भाशय चांगला आकुंचित झालेला आहे असें समजावें. हात १५ मिनिटेंपर्यंत तसाच ठेवावा. या वेळीं गर्भाशय संकोचन व सैल झाल्यामुळें, तो मऊ व कठीण असा हातास लागतो.

वार न पडल्यास आकुंचनाच्या वेळीं गर्भाशय जोरानें घट्ट दाबावा व कटिराच्या प्रवेश मार्गाच्या आंसांमध्यें तो जोरानें खालीं लोटावा. ह्यामुळें वार बाहेर

पडण्यास मदत होते. वार नच पडल्यास कांहीं वेळ बुडावर हात ठेऊन प्रसूतेला कुंथण्यास सांगावें.

वार बाहेर काढतांना तिला पीळ दिल्यास गर्भाशयांतील गर्भकोशांना पीळ पडून ते बाहेर येण्यास मदत होते.

नाळ कधींही ओढूं नयेः—नाळ ओढल्यास गर्भाशय उलटा होऊन रक्तस्राव सुरू होतो, व वार बाहेर येण्याचें बंद होतें. वार बाहेर पडल्यानंतर गर्भाशयांचें बूड १० मिनिटेंपर्यंत घट्ट आंवळून पहावें, व गर्भाशय चेंडूसारखा हाताला घट्ट लागला म्हणजे इतर व्यवस्थेला लागावें.

गर्भाशयांचें पूर्णपणें संकोचन झाल्याशिवाय पोटावर पट्टा बांधू नये. मूल बाहेर आल्यानंतर स्त्रीला थकवा येतो त्याकरितां **हेमगर्भ, सूतशेखर** किंवा **प्रतापलंकेश्वर** १ ते २ गुंज आल्याचा रस व मध यांतून द्यावा. याप्रमाणें बाळंतपणाच्या तीन अवस्था स्थूलदृष्ट्या दिलेल्या आहेत.

बाळंतपणानंतरची व्यवस्थाः—पहिले दोन दिवस कॉफी, दूध, साबुदाण्याची लापशी यांवर ठेवावें, नेहमींचे जेवण तिसऱ्या दिवसापासून देण्यास हरकत नाहीं. शौचशुद्धीची तक्रार असेल तर सकाळीं एरंडेल देण्यांत यावें. प्रत्येक प्रसूता स्त्रीनें आपल्या पचन शक्तीवरून काय खावें याची निवड केली पाहिजे. एखाद्या बाळंतिणीला भूक नसते तरी तिला खव्याचा सांजा देण्याची रूढी पडलेली आहे, परंतु तो पचतो, किंवा नाहीं इकडे पाहून तो दिला पाहिजे. दूध भरपूर देण्यास हरकत नाहीं. अन्नपचनशक्ति कमी असेल तर तांदुळाची कांजी तूप घालून द्यावी.

पहिले १० दिवसपर्यंत अर्गट मिक्श्चर देतात. त्याऐवजीं **बाळंतकाढा (नं.१)** दुसऱ्या दिवसापासून दिल्यास अर्गट मिक्श्चरचें काम होऊन इतर उपद्रव होण्यांचे टळतात. **बाळंतकाढ्यानें गर्भाशयाचें संकोचन नैसर्गिक स्थितींत होऊन सेप्टीसिमीया—होत नाहीं, सूतिकाज्वराला प्रतिबंध होतो.** वायुगोळा फार चढत असल्यास **प्रतापलंकेश्वर** स्वतंत्र आल्याचा रस व खडिसाखर अगर **बाळंतकाढ्यांतून** १ गोळी—सकाळीं सायंकाळीं घ्यावी. अंगाला नेहमीं तेल लावावें. तेलामुळें, सर्व शिरा, स्नायूंना जोर—बळकटी येते. पाश्चात्त्यांच्या नादीं लागून ही पद्धती अंमलांत आणणें कमीपणाचें व रानटीपणाचें समजणारांनीं तेल लावण्याचें टाकल्यास प्रसूतीला बाळंतपणानंतर इतर विकार होण्याची फार धास्ती असते, हें त्यांनीं लक्षांत ठेवावें.

# प्रकरण २ रें.

## बाळंतपण (Puerperium)

९ महिने पुरे झाले, वेणा सुरू झाल्या, म्हणजे बाळंतपणाची स्थिती सुरू होते, व गरोदरपणांत जननेंद्रियांच्या आकारांत जे फेरफार झालेले असतात, ते पूर्वस्थितींत आणणें हें बाळंतपणांतील काम असतें. गरोदरपणांत झालेले इंद्रियविषयक फेरफार बाळंतपणाच्या वेळीं इजा वगैरे झाल्यास पूर्वस्थितीवर येणें कठीण असतें. गर्भाशयाचा आकार वाढलेला असतो व त्याचें संकोचन होऊन तो मूळपदावर येण्यास साधारण ६ ते ८ आठवडे लागतात किंवा यापेक्षांहि जास्त दिवस लागण्याचा संभव असतो. याचे तीन प्रकार कल्पलेले आहेत.

( १ ) बाळंतपणाचे ( Puerperium ) इंद्रिय विज्ञान.

( २ ) जननेंद्रियें पूर्वस्थितीवर येणें.

( ३ ) बाळंतपणाची व्यवस्था.

( १ ) बाळंतपणाचे दिवस जसे जवळ येत जातात त्याप्रमाणें स्त्रीची प्रकृति थकलेली असते. दरमिनीटाला नाडीचे ठोके ७०-८० असतात. उष्णतामान साधारणपणें नेहेमीपेक्षां कमीच असतें. मधून मधून थंडी वाजते, दांत कडकडतात, पायांना वळ येतात व हें १० ते १५ मिनिटें टिकतें. बाळतपणांत रक्तस्राव पुष्कळ झाला तर उष्णतामान कमी होऊन नाडीचा वेग वाढतो, चेहरा फिक्कट होतो व थकवा फार येतो. बाळंतपण होण्याला वेळ लागला तर १०१ पर्यंत ताप वाढतो. कांहीं त्रास न होतां प्रसूति झालेली असेल तरी पहिल्या २४ तासांत उष्णतामान १००–१०१ वाढतें, व त्यामुळें प्रकृतींत कांहीं फेरबदल होत नाहीं. दूषित विकार ( septic condition ) असेल तर स्त्रीचा चेहरा ओढलेला, व उतरलेला दिसतो, नाक खालीं ओढल्यासारखें होतें व चेहरा बदलून जातो. बाळंतपणांत वेणा येऊन स्नायूंना जो थकवा येतो, व त्यांची जी झीज होते त्यामुळें उष्णतामानामध्यें वाढ होते. हा ताप न वाढतां दुसऱ्या दिवशीं कमी होतो. २४ तास झाल्यांनंतर उष्णतामान ९९–४ अगर त्यापेक्षां कमी या दरम्यान असतें. स्त्रीची प्रकृति चांगली असेल तर पहिले कांहीं दिवस संध्याकाळीं उष्णतामान ९९ ते

१०० पर्यंत वाढतें. ताप कमी जास्ती होणें हें बाळंतपणाचें मुख्य चिन्ह आहे. बाळंतीणबाईचें उष्णतामान दिवसांतून तीनदां घेतलें पाहिजे. सकाळीं ८ वाजतां, दुपारीं २ वाजतां व रात्रीं ८ वाजतां. फक्त दोनदांच घेतलें तर दुपारीं काय फरक होतो हें कळणार नाहीं. अन्नामध्यें बदल, आमांशय, आंतडी यांमध्यें बिघाड, मानसिक त्रास, स्तनजन्य पीडा यामुळें पहिल्या आठवड्यांत साधारणतः ताप १०० पर्यंत वाढतो. हा ताप पहिल्या आठवड्यांत १०० पर्यंत वाढलेला दिसल्यास खाण्यापिण्यांत चूक होत आहे असें समजावें. मलावरोध असल्यास जुलाबाचें औषध दिल्यास हें उष्णतामान कमी होतें. रागामुळें उष्णतामान वाढतें, परंतु तें फार वेळ टिकत नाहीं. ४ थ्या दिवशीं स्तन ओथंबतात व त्यावेळीं दूध उत्पन्न होत असल्यामुळें ताप वाढतो. यावेळीं योग्य काळजी घेतली तर २४ तासांनीं हा ताप कमी होतो. वर दिलेल्या कारणांमुळें येणाऱ्या तापाचा शरीरप्रकृतीवर फारसा फरक होत नाहीं. ताप २४ तासांपेक्षां जास्त राहिला तर प्रकृतीमध्यें कांहीं तरी दोष आहे असें समजलें पाहिजे. त्याचप्रमाणें झोंप न येणें हेंहि प्रकृती बिघडल्याचें लक्षण समजावें. बाळंतपणांत ताप येणें हें बाळंतरोगाचें चिन्ह आहे असें समजून चाललें पाहिजे. या तापासंबंधीं हलगर्जीपणा करतां कामा नये. बाळंतरोग म्हणजे आंतड्याचा क्षय—असें म्हणण्यास हरकत नाहीं. पहिल्या २४ ते ४८ तासांत नाडीचा वेग मंद असून ६०-७० ठोके असतात, व त्याप्रमाणें उष्णतामान वाढलेलें आढळत नाहीं. याच्या उलट कदाचित उष्णतामान वाढून नाडीचा वेग कमी आढळेल. तिसऱ्या दिवशीं उष्णतामान व नाडीचा वेग नेहमींसारखा असतो. रक्त कमी झालेलें असेल, व रक्तस्राव प्रसूतीच्या वेळीं जास्त झालेला असेल तर नाडीचा वेग जलद व अनियमीत असा बरेच दिवस चालू असतो. ह्या कारणाव्यतिरिक्त जर ९० वर नाडीचे ठोके असतील तर ही स्थिति चांगली समाधानकारक नाहीं. मनावर कांहीं परिणाम झाला किंवा काय हें पाहावें व ताप असून नाडीचा अनियमीत जलद वेग असेल तर सूतिकादोष आहे असें समजून मानावें.

उत्सर्जन ( excretions ):—बाळंतपणाच्या पहिल्या दिवसांत लघ्वीमध्यें फेरफार होत असतात. पहिल्या २ दिवसांत लघ्वी बरीच होते, व हळुहळु नैसर्गिक स्थितीवर येते. अंगावरील दूध सुटलें म्हणजे साधारणः लघ्वीमध्यें साखर

आढळते. ह्या साखरेला लॅक्टोज म्हणतात व ती स्तनग्रंथीच्यामुळें सांपडत असते. २ ते १० दिवसपर्यंत पेपटोनस सांपडतात, व गर्भाशयांच्या स्नायूंमध्यें होणाऱ्या फेरफारामुळें हें सांपडत असतात. अलब्यूमीन, असीटोन, अगदीं कमी प्रमाणांत सांपडतात व युरीया, फॉस्फेटस् व सल्फेटस् कमी होतात. पहिल्यांदा लघ्वी होण्याच्या वेळीं त्रास होतो, व अशक्तपणामुळें किंवा मूत्राशयांच्या स्नायूंच्या संकोचनांमुळें किंवा मूत्राशयांच्या स्नायूंच्या भिंतीचा ( muscular walls ) चलनशक्ती भ्रंश ( Paresis ) झाल्यामुळें लघ्वी आंतल्या आंत रहाते. विटप-( perinium ) ला जखम झालेली असेल तर लघ्वी होतांना कळा लागतात, व त्या लवकर कमी होतात. परंतु अशक्तपणा, मानसिक दुर्बलता असल्यास लघ्वीची तक्रार शक्ती येईपर्यंत चालू रहाते.

त्वचेचें कार्य नियमित चालू असतें, परंतु कांहीं दिवस मलावरोधाचा विकार चालू रहातो.

रक्तः—गरोदरपणांत रक्तांमधील तांबडे कण व तांबडा रंग ( हीमोग्लोबीन ) कमी होतो तो बाळंतपणांत पहिल्या १० दिवसांत वाढूं लागतो.

पांढरे रक्त कण ( leucocytosis ) जे वाढलेले असतात तेहि हळुहळु कमी होऊं लागतात. बाळंतपणांत योनीच्या द्वारें स्राव होत ( lochia ) असतो त्यांचा या पांढऱ्या रक्तकणांशीं संबंध असावा, कारण स्राव कमी होत असल्यास हे रक्तकण कमी होत नाहींत. हे पांढरे रक्तकण वाढले तर आंतल्या बाजूला दाह व दोष ( Septic ) असावा हे सिद्ध होतें.

अन्नपचन क्रियाः—ही पहिल्या तीन दिवसांत मंद होते. भूक थोडी असते अगर मुळींच नसते व याकरितां पेय व हलके पदार्थ घ्यावेत. शरीरप्रकृती व्यवस्थित असते यामुळें भुकेचा कमीजास्ती परिणाम होत नाहीं.

वजनः—पहिल्या १० दिवसांत वजन थोडें कमी होतें व वजनाचा फरक अंगावर पिणारीं न पिणारीं मुलें यांची तुलना करतां आढळून येतो.

गर्भाशयः—बाळंतपणानंतर गर्भाशयांचें वजन २४ ते ४८ औंस असतें, व तें ९ ते १० ड्राम वजन होण्यास साधारण ६ आठवडे लागतात. पहिल्या १० दिवसांत गर्भाशय जलदीनें संकोच होऊं लागतो व नंतर पूर्व स्थितीवर हळुहळु

येण्यास ६ ते ८ आठवडे लागतात. गर्भाशयांची संकोचन स्थिती कशी चालली आहे हें पोटाचा भाग तपासला असतां कळून येतें.

ज्या स्त्रीला ४—५ मुलें झालेलीं असतात तिचा गर्भाशय पूर्वस्थितीवर येण्यास ह्यापेक्षां बरेच दिवस लागतात. दुसरी गोष्ट फाजील गर्भोदक, एकाच वेळीं दोन मुलें, अगर फाजील रक्तस्राव झाला असेल, मूल अंगांवर दूध पीत नसेल, तर गर्भाशय पूर्वस्थितीवर येण्यास विलंब लागतो.

बाळंतपणांत योनिद्वारां होणारा स्राव:—( Lochial discharge )— बाळंतपणांत जननेंद्रियांच्या मार्गानें स्राव होत असतो, व हा २ ते ३ आठवडे चालू असतो. पहिल्या २४ तासांत स्रावामध्यें रक्त व रक्तांच्या गुठळ्या असतात, हा स्राव पातळ होऊन त्याचा रंग रक्तांसारखा असतो. ३—४ थ्या दिवशीं स्राव पिंवळसर किंवा हिरवट रंगाचा होतो हा रंग हळुहळु बदलून पांढरसर होतो व नंतर कमी होतो. ह्या स्रावांमध्यें निरनिराळ्या प्रकारच्या पेशी ( Cells ) आढ-ळतात. बाळंतपणांत रक्तस्राव जास्त झाला असेल तर हा स्राव जास्त असतो. साधारणतः काळ्या वर्णाच्या स्त्रियांमध्यें व दर महिन्याला ज्यांचा ऋतुस्राव जास्त प्रमाणांत जातो त्यांच्यामध्यें हा स्राव फाजील प्रमाणांत आढळतो. बाळंतपणानंतर गर्भाशय धुऊन काढला ( डुश ) म्हणजे हा स्राव कमी होतो. बाळंतपणांत गर्भा-शयांतून येणारा स्राव अलकालाइन असतो, योनीमार्गांत आल्यानंतर तो असिड होतो, व कांहीं दिवस हा स्राव रोगजंतु विरहीत असतो. साधारणतः योनीमध्यें हा स्राव २४ तासांपेक्षां जास्त जंतु विरहीत राहूं शकत नाहीं. परंतु गर्भाशयाच्या ग्रीवेमध्यें ( cervix ) २—३ दिवसांनंतर जंतु आढळूं शकतात. (Bacteria)

गर्भाशयांमधून हा स्राव काढून त्याची परीक्षा करणें अत्यंत कठीण आहे. स्त्रीची प्रकृति आरंभापासून चांगली असेल तर गर्भाशय बरेच दिवसपर्यंत जंतु विरहीत आढळतो.

हा स्राव एकाएकीं बंद होणें चांगलें लक्षण नव्हे.

या स्रावाला एक प्रकारचा चमत्कारिक वास येतो परंतु तो दुर्गंधियुक्त नसतो. प्रकृतिमध्यें कांहीं फरक झाल्यास स्राव बंद होतो—म्हणजे दोषजन्य जंतूचा प्रादुर्भाव झाल्यास पुनः रक्तस्राव सुरूं होतो व गर्भाशयाची संकोचन स्थिती थांबते.

हा स्राव मुख्यतः गर्भाशयांमधून येत असतो. परंतु त्यांमध्यें योनि, ग्रीवा व जननेंद्रियाच्या आंतल्या भागामुळें होणारा स्राव मिळालेला असतो.

वेणाः—बाळंतपणांत पहिले २–३ दिवस गर्भाशयाच्या संकोचनामुळें पोट दुखत असतें. वेणा अत्यंत जोराच्या व सहन न होण्यासारख्या असल्या तर गर्भाशयामध्यें, रक्ताच्या गुठळ्या, किंवा वारेचा कांहीं अवशिष्ट भाग राहीला असून तो बाहेर काढून टाकण्याचा गर्भाशयाचा प्रयत्न होय असें मानावें. बरींच बाळंतपणें झालीं असतील तर गर्भाशय रिकामा झाला असला तरी मागून रक्ताच्या गुठळ्या तयार होतात. गर्भाशय रिकामा झाला नसेल तर वेणा चालू रहातात व यांकरितां गर्भाशयाला उत्तेजक व वेणा वाढवण्याचें औषध द्यावें लागतें. ४–४ तासानें १–१ चमचा एक्सट्रॅक्ट अर्गट द्यावें, पोट हळुहळू वरून चोळावें, गरम पाण्याचा डुश द्यावा. ( ११५° ते ११८° ). याप्रमाणें केल्यानंतर रक्ताची गुठळी असल्यास बाहेर पडून जाते.

कांहीं वेळां गर्भाशय रिकामा झाला तरी कळा येत असतात, व त्या कां येत असतात हें समजणें कठीण जातें. अशावेळीं उत्तेजक व २० ते ३० थेंब स्प्रीट अमोनिया अरोमेटीक्स दिलें असतां बरें वाटतें.

बाळंतपणांतील व्यवस्थाः—बाळंतपणांत स्वच्छता ठेवणें हें मुख्य महत्त्वाचें काम आहे व यांवरच प्रकृति चांगली रहाणें, व बिघडणें अवलंबून असतें. यांकरितां प्रथमतः मुख्य तीन गोष्टींकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे.

( १ ) जननेंद्रियांचा भाग स्वच्छ ठेऊन त्यांमध्यें इतर जंतूंचा प्रवेश होऊं न देणें. ( २ ) पूर्णपणें विश्रांती घेणें. ( ३ ) स्तनांची काळजी घेणें.

निर्जंतुक स्थिती ( Asepsis ):—आपल्यामध्यें बाळंतपणाची व्यवस्था पाहिली म्हणजे अस्वच्छता, काळोख, वगैरे गोष्टी प्रकृतीला बाधक असे प्रकार आढळून येतात. सूर्यप्रकाश, ह्या खोलीमध्यें खेळल्यास बाळंतिणीच्या प्रकृतीवर अनिष्ट परिणाम होईल, यांकरितां उजेड व हवा यांना शक्य तेवढी बंद करण्यांत येते. शहरांचे ठिकाणीं जागेच्या अभावीं, हॉस्पिटलची वाट प्रत्येक स्त्रीला धरावी लागत असते. सूतिकाज्वरांसारखे विकार जंतुजन्य आहेत हें प्रयोगानें सिद्ध झालेलें आहे व आरंभापासून जननेंद्रियांचा भाग जंतुघ्न औषधांनीं स्वच्छ ठेवला तर स्त्रीला सहसा या विकाराची बाधा होत नाहीं हें सानुभवानें ठरलेलें आहे. आपल्यामध्यें शास्त्रापेक्षां

रूढीचें महत्त्व मनावर जास्त बिंबल्यामुळें जुनी बाळंतपणाची व्यवस्था ही शास्त्रीय तत्त्वांवरच असावी अशी दृढ समजूत झाली असल्यास नवल नाहीं. अशा समजुतीमुळें आयुर्वेदिक पद्धति सदोष आहे अशी जर पाश्चात्त्य वैद्यांची समजूत असेल तर त्यांत आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. ही जुनी पद्धति अशास्त्रीय असली तरी त्या स्त्रियांना हा ज्वर कसा होत नसे याचा बारकाईनें विचार केला तर त्यांची सुदृढ प्रकृति व मजबूत जीवनशक्ती हें होय. नैसर्गिक शरीर मजबूत असलें तर बाह्य जंतुचा पगडा आपल्या शरिरावर होत नाहीं, शरीरांत प्रतिकारशक्ती नैसर्गिकपणें उत्पन्न होत असते व ही **वैष्णवी** शक्ति (Vitality) नाना प्रकारच्या स्त्रीपुरुषांच्या आहारविहारांमध्यें अनियमितपणा —असल्यामुळें तिचा परिणाम होऊन क्षय वगैरे वाटेल त्या रोगजंतूंचा पगडा बसण्याला वेळ लागत नाहीं.

बाळंतणाची व्यवस्था आज पाश्चात्त्य वैद्य हॉस्पिटलमध्यें ज्याप्रमाणें करीत आहेत त्याचप्रमाणें **सुश्रुत** अगर **वाग्भट** या ग्रंथांत वर्णन केलेलें आहे. जंतुनाशक रोगांची कल्पना त्यांना नसती तर स्वच्छता वगैरे पाळणें या गोष्टी त्यांनीं लिहिल्या नसत्या. योनीमार्गें होणाऱ्या स्रावांच्या ठिकाणीं स्वच्छ, शोषक अशा घड्या ठेवाव्यात. त्याचप्रमाणें ह्या घड्या स्रावानें ओल्या झाल्या म्हणजे ताबडतोब बदलाव्या. पहिले ४ दिवस योनीभाग वारंवार स्वच्छ ठेवला पाहिजे. हात, नखें, डुश देण्याची नलिका वगैरे लागणारीं साधनें जंतुनाशक औषधांनीं धुऊन नंतर वापरलीं पाहिजेत.

बाळंतपणांत स्राव बरोबर होत असेल तर योनीमार्ग धुण्याची जरुरी नाहीं. आंतील जंतु मारण्यापेक्षां बाह्य भाग दूषित होऊं नये हें पहाण्याचें मुख्य काम आहे. जननेंद्रियांचा बाह्य भाग स्वच्छ ठेवला नाहीं, व योनीमार्ग धुऊन काढला तर कांहीं उपयोग होत नाहीं. बाईला जंतुशास्त्र अगर स्वच्छपणा ठेवण्याचें ज्ञान नसेल व योनीमार्ग धुण्याचा प्रयत्न केला तर उलट बाह्य जंतूचा मात्र आंत प्रवेश होऊं शकेल. स्त्री झोंपतांना पाय दुमडून ( recumbent position ) पडून राहील, तर स्राव योग्य तऱ्हेनें बाहेर जाण्यास मदत होईल. गर्भाशयामधून येणाऱ्या स्रावाला घाण येऊं लागली, व ताप येऊं लागला, तर अशावेळीं डुश देणें महत्त्वाचें आहे. गरम पाण्याचा डुश दिला असतां, गर्भाशयाच्या आंत असलेल्या रक्तांच्या गुठळ्या, पडदे, बाहेर पडून जातात, व रक्तस्राव

होत असेल तर तो कमी होतो. गर्भाशय पहिल्या आठवड्यांत धुवावयाचा असेल त्यावेळीं जंतुनाशक सोल्युशन वापरणें व तें योनीमार्गाच्या सोल्युशनपेक्षां निम्म्या शक्तीचें वापरणें बरें. पाऱ्यांचीं द्रावणें हीं इतर जंतुनाशक औषधापेक्षां पुष्कळ बरीं, परंतु त्याच्याबरोबरच हीं वापरतांना त्या विषांचा परिणाम बाळंतिणीवर होणार नाहीं याबद्दल काळजी घेतली पाहिजे. उलटया, लाळजाणें, अतिसार, तोंड येणें, हे पाऱ्यांच्या विषांचे परिणाम होत.

बाळंतपणाच्या वेळीं विटपला ( Perineum ) जखम झाली असेल, तर बोरीक असिड व्हेसीलीन ( १-४० ) लिंटला लाऊन तेथें घडी बांधून ठेवावी. मलमांचें भांडें नेहमी पाण्यानें उकळून तें वापरण्यांत यावें. बाळंतिणीची जागा, हवाशीर, दूषित वायु आंत न येणारी अशी असावी, त्याचप्रमाणें बिछान्यावरचे कपडे स्वच्छ असले पाहिजेत. गरिबीमुळें ज्यांना हवाशीर खोल्या नाहींत, त्यांनीं बाह्य भाग स्वच्छ ठेवण्याविषयीं तरी काळजी घेतली पाहिजे.

विश्रांतीः—बाळंतपणांत गर्भाशयाचा आकार वाढलेला असतो, व त्याचें संकोचन होऊन मूळस्थितीवर येण्यास बरेच दिवस लागतात. याकरितां जंघनास्थि संधिच्या ( Symphysis-pubis ) खालीं गर्भाशय व स्राव रंगहीन होईपर्यंत स्वस्थ पडून राहिलें पाहिजे. १० दिवस झाल्यानंतर बाळंत स्त्री काम करूं लागली तर गर्भाशय स्थानच्यूत, अगर वांकडा, उलटा होण्यांचा संभव असतो. कारण तो जागेवर आलेला नसतो. ४८ तासानंतर स्त्रीला पाठीमागें उशांचा आधार द्यावा म्हणजे स्राव जाण्यास मदत होते. पहिल्या २ दिवसांत हलका आहार, दूध, कांजी—असा द्यावा व दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं सारक औषध द्यावें. व त्यानंतर हलकें अन्न द्यावें. बाळंतपणांत आंतड्यांचें काम शिथिल असल्यामुळें शौचाला साफ होण्याकरितां सारक औषध देण्याची जरुरी पडते. सारक औषधानें शौचाला साफ झालें नाहीं तर एनिमा द्यावा. त्याचप्रमाणें लघ्वीला साफ होतें किंवा नाहीं, लघ्वी, कोंडून रहाते किंवा काय हें पाहून त्याप्रमाणें इलाज करावा. लघ्वी काढते वेळीं जंतुनाशक द्रावणांचा उपयोग करावा. लघ्वीला साफ झालें नाहीं तर स्त्रीला अस्वस्थता उत्पन्न होते. बाळंतपणांत मनाच्या विरुद्ध कांहीं गोष्टी झाल्यास उष्णतामान वाढतें. ह्याकरितां स्त्रीला त्रास न होईल अशा तऱ्हेनें स्वतंत्र ठेवावी. झोंप येत नसेल तर झोंपेचें औषध द्यावें. झोंप न आल्यास मेंदूवर परिणाम होण्याचा संभव असतो.

अंगाला तिळाचें अगर खोबरेल तेल लावून मर्दन करावें. तेल लावल्यानें शारीरिक थकवा कमी होऊन स्नायूंची झालेली झीज भरून येते व स्त्रीला आराम वाटतो; व पचनशक्तिहि वाढते. पोटांच्या स्नायूंना कायमचा शिथिलपणा आल तर आंतडी, व ओटी यामधील इंद्रियें स्थानच्यूत होण्याचा जास्त संभव असतो. योनी परिक्षा करून गर्भाशयाची स्थिती कशा प्रकारची आहे हें ठरवून त्याप्रमाणें, पेशरी वगैरे लागल्यास त्यांचा उपयोग करतां येतो. योनीमार्गाच्या आंत कांहीं जखमा ( lacerations ) झाल्या असल्यास त्या ६।७ दिवसांत भरून येतात. विटपला जखम झाली असेल, तो फाटला असेल तर तो भरल्याशिवाय स्त्रीला उठूं देऊं नये.

बाळंतपणानंतरः—पोटाच्या भिंती सैल झालेल्या असतात, व त्वचेवर पांढऱ्या ( striae ) रेषा आढळतात. गर्भाशय मोठा असतो, व पहिल्या दहा दिवसांत गर्भाशयाचें बुड पोटावरून तपासलें असतां आढळून येतें. स्तनांमध्यें दूध पुष्कळ असतें, व त्याचा आकार वाढतो. योनी मार्ग तपासला असतां त्या जागीं खरचटलेलें ( laceration ) असतें. स्त्राव चालू असतो. ग्रीवा मऊ व वाढलेली असते. पहिल्या १० दिवसांत बोट सहज ग्रीवेमध्यें जाऊं शकतें. त्यांवरून जखमा वगैरे आहेत किंवा काय तें आढळून येतें, गर्भाशय मोठा व मऊ असतो.

गर्भपात झाल्यासः—स्तनांमध्यें किंवा पोटामध्यें विशेष फरक होत नाहीं, योनीमार्गांत दुखापत नसते. गर्भाशयांचा आकार वाढलेला, स्त्राव थोडा व ग्रीवा मऊ झालेली असते.

बाळंतपणांत होणारा दूषित जंतूंचा संसर्गः—( Purpural infection ) बाळंतपणांत प्रसूतिच्या वेळीं त्रास झालेला असेल, जननेंद्रियांला इजा झाली असेल, तर रोगोत्पादक जंतूचा प्रवेश आंत होतो, हे जंतु आंत अगोदरच असतात व योग्य समयाची वाट पहात असतात असें म्हणण्यास हरकत नाहीं. या जंतूंचा प्रादुर्भाव गर्भपात किंवा बाळंतपण यावेळीं होतो. सूतिकाज्वर बाळंतिणीला कां होतो याबद्दल कांहीं वर्षांपूर्वी हा जंतुजन्य विकार आहे याची कल्पना नसल्यामुळें, हॉस्पिटलमध्यें या विकारामुळें बऱ्याच स्त्रिया मृत्यु पावत असत. जंतुशास्त्रांची प्रगति व शोध लागल्याबरोबर हा विकार कमी होत चालला. माधव निदानकारांनीं ह्या तापांचीं कारणें खालील प्रमाणें दिलेलीं आहेत. स्त्री प्रसूत

झाल्यावर तिला भलभलते उपचार करणें व क्लेश होणें, दूषित अन्न खाणें, विषम, व जड अन्न खाऊन अजीर्ण होणें यांमुळें ज्वर, अतिसार, शूळ, पोटफुगी, शक्तिक्षीणता, तंद्री, अरुचि, मळमळ, हे विकार होतात. बाळंतपणांत ज्वर व अतिसार असणें, हें धोक्याचें चिन्ह आहे.

रक्तस्राव, जखम, गर्भाशयांमध्यें बाळंतपणानंतर अवशिष्ट भाग रहाणें, यामुळें या जंतूच्या वाढीला मदत होत असतें.

प्रतिबंधक शक्तिः– या जंतूचा जोर, त्याचप्रमाणें स्त्रीची आनुवंशिक प्रतिबंधक शक्ति यांवर सर्व अवलंबून असतें. गरोदरपणांत आजार, बाळंत होण्यास त्रास अगर वेळ लागणें, फाजील रक्तस्राव होणें किंवा तो नंतर होणें, अलबुमीन जाणें, ओटीमध्यें दाह असणें, या कारणानें प्रतिबंधक शक्ति कमी होऊन या जंतूचा अंमल बसतो व प्रतिबंधक शक्ति कमी होते.

सामान्य माणसांना साधारणपणें खालील लक्षणांवरून बाळंतिणीच्या प्रकृतिची कल्पना करतां येते.

**( १ ) स्त्रीला ताप बराच असेल, दिसण्यांत प्रकृति बरी असेल, झोंप चांगली येत असेल, व तिला विचारलें असतां आपल्याला बरें वाटतें असें ती म्हणत असेल तर तिला विषजंतूची बाधा झाली नाहीं असें समजाव**

**( २ ) ताप जास्त असेल, दिसण्यांत प्रकृति चांगली असेल, झोंप मुळींच नसेल, व तिला आपण फार आजारी आहोंत असें वाटत असेल तर ती खरोखरच आजारी आहे असें समजावें.**

**( ३ ) ताप जास्त, चेहरा उतरलेला, झोंप मुळींच नाहीं, व आपल्याला बरें वाटत आहे असें ती म्हणत असेल, तर ती खात्रीनें असाध्य आहे असें समजावें.**

---

# प्रकरण ३ रें

## बाळंतपणांतील जंतुजन्य व इतर व्याधी

आतां प्रसूतावस्थेमध्यें ज्या निरनिराळ्या व्याधि उत्पन्न होतात त्याबद्दल विचार करूं.

पूयजन्य ज्वरः-(Sapraemia):—या विकारांत ताप, स्रावाला घाण येणें, तो कुजणें व गर्भाशय मूळ स्थितीवर येण्याचें बंद होणें अशीं लक्षणें असतात.

हा विकार दूषित जंतुमुळें होतो, प्रसूतीच्या वेळींच जर जंतूंची बाधा झाली असेल तर २-३ तिसऱ्या दिवशीं चिन्हें होऊं लागतात. बाळंतपणानंतर जंतूची बाधा असेल तर उशिरां चिन्हें होऊं लागतात. पहिल्या प्रथम थंडीभरून ताप १०० ते १०२ पर्यंत येतो. किंवा १०४ पर्यंत वाढतो, नाडीची गति तापाच्या प्रमाणांत वाढते. डोकें दुखी व थोडया प्रमाणांत अस्वस्थता आढळते व गर्भाशय तपासला असतां नेहमींपेक्षां आकारानें मोठा व मऊ आढळतो. स्रावाच्या घडया तपासल्या असतां त्यांमध्यें रक्तांचे डाग आढळतात. (sheds) कांहीं केसीसमध्यें स्राव कुजलेला आढळत नाहीं ह्याचें कारण म्हणजे पूतिजनक जंतू, ज्यांची वाढ गर्भाशयांमध्यें होत असते. स्राव पुष्कळ प्रमाणांत होत असून त्यांमध्यें रक्त पुष्कळ आढळतें. वेळींच उपचार केल्यास २।३ दिवसांत तें कमी होतें. रोगांचा जोर जास्त असेल तर ९ आठवड्याच्यावरहि दिवस लागतात. उपचार झाले नाहींत तर हें विष सर्व शरिरामध्यें फिरून ताप वगैरे लक्षणें वाढूं लागतात व सेफ्टीसीमीया होतो. कांहीं स्त्रियांमध्यें, ताप अगदीं थोडा असतो, स्रावाला घाण येत नाहीं, डोकें दुखत नाहीं असा प्रकार दिसून येतो व एखादे वेळीं रक्ताच्या गुठळ्यामुळें स्राव बाहेर पडण्यास अडचण येत असेल,किंवा घाणीचें शोषण झालें असेल, तर या विकाराचीं सौम्य चिन्हें दृग्गोचर होतात.

पूतिज्वर—( Septicaemia ):—सेप्रेमीया व सेफ्टीसीमीया यामध्यें फरक म्हणजे, सेप्टीसीमीयामध्यें तीव्र लक्षणें असतात, व स्थानिक उपचार करून विकार कमी होत नाहीं. या विकारांमध्यें नाना प्रकारचे विषजन्य जंतू असतात, व त्याप्रमाणें लक्षणें निरनिराळ्या प्रकारचीं व तीव्र आढळतात.

सुरवातः—बाळंतपणाच्या दुसऱ्या दिवसापासून तीव्र लक्षणें होऊं लागतात. कधीं कधीं पहिल्या २४ तासांत हीं लक्षणें आढळतात, व त्या त्या प्रमाणें रोगांचा जोर होत असतो. पहिल्या प्रथम जोराची थंडी वाजते, हळुहळु उष्णता वाढते.

डोकें दुखतें, अस्वस्थता वाटते अशीं चिन्हें होत असतात, परंतु थंडी येइपर्यंत या रोगाची जाणीव स्त्रीला नसते. थंडी फार जोराची वाजते, दांत कडकडतात, हातापायांत वळ येतात, अंग बाहेरून थंड लागतें. व चेहरा, ओंठ यांच रंग निळसर भासतो, गुदद्वारातलें उष्णतामान घेतलें तर १०३ ते १०५ असतें. व तें बरेंच चढतें. नाडी जलद चालते, व ठोके मोजणें कठिण जातें. थंडी १०–१५ मिनिटें लागते, व नंतर आग झाल्यासारखी वाटते. पाय वळणें कमी होतें व चेहरा लाल होतो. त्वचा कढत लागते. डोकें अत्यंत दुखत असतें व नंतर ताप येऊन तो कमी होतो.

उष्णतामान:—उष्णतामान अनियमित असतें, तीव्र विषांची व्यथा असेल तर मधून मधून थंडी वाजते, व त्याचप्रमाणें उष्णतामान कमीजास्ती होतें. प्रमाणापेक्षां ताप जोराचा असून तो खालींवर होत असतो. वारंवार ताप व थंडी वाजणें हें बरेंच आठवडे चालू असेल तर रोगी वांचण्याचा संभव असतो; परंतु ज्यांत ताप मोठा नाहीं अशा प्रकारच्या केसीस असाध्य स्वरूपाच्या असतात.

नाडी:—नाडीची गति जलद असते, व ती उष्णतामानास धरून नसते. नाडी १२० असेल तर ताप कमी असतो. अशा तऱ्हेची स्थिति असणें हें बाळंतपणांत दूषितजन्य तापांचें लक्षण आहे असें मानावें. नाडीचा वेग १२० वर सारखा असणें हें लक्षण ठीक नव्हे.

ओटीमधील इंद्रियें—( Pelvic organs ) गर्भाशय रिकामा असतो, व गर्भाशयाची संकोचन क्रिया बंद होत नाहीं. यामुळें गर्भाशय मोठा व मऊ आढळत नाहीं. स्राव लवकरच थांबतो व असल्यास कुजलेला आढळून येत नाहीं. योनी परीक्षा केली असतां पहिल्या प्रथम ओटीचा दाह वगैरे झालेलीं चिन्हें आढळत नाहींत परंतु जननेंद्रियाच्या भागांत, किंवा ग्रीवेच्या ठिकाणीं स्थानिक दोष झालेला ( Infection ) आढळून येतो, पोटाच्या अंतरावरणाचा दाह, किंवा गुल्म ( Pelvic-cellulitis ) हीं चिन्हें आढळून येतात. रक्त तपासलें असतां जंतु आढळून येतात व हें तपासणें फार कठीण असतें. पांढरे रक्त-कण कमी किंवा जास्ती आढळतात, किंवा मुळींच नसतात. पांढरे रक्तकण असणें उत्तम लक्षण आहे. दूषित विषांच्या जोराप्रमाणें पांडुरोग होतो, व याकरितां रक्त मधुन मधुन तपासणें जरुरीचें असतें.

हृदयः—पूतिजन्य जंतु वाढल्यास ते हृदयांच्या स्नायूंवर परिणाम करतात, व हें धोक्याचें असतें. हृदयांमध्यें फुफ्फुसांच्या आवरणाचा दाह, न्युमोनिया, गळुं हीं होतात. यांमध्यें रोगी स्त्रीला अन्न घेतां येतें. उलटी होत नाहीं, साधारणपणें पचनक्रिया बरी असते. पोटाचा ताठरपणा असेल व उलट्या होत असतील, तर हें धोक्याचें चिन्ह असतें. उलटी झाल्यास, रंग काळा, रक्त-मिश्रित असतो. पोटाच्या अंतरावरणाचा दाह झाल्यास उलटी होत असते; परंतु साधारणतः पोटफुगी आढळून येते. जुलाब झाल्यास विषें बाहेर पडून जातात; परंतु फारच जुलाब होणें धोक्याचें चिन्ह असतें. झोंप न येणें व डोकें दुखणें हेंहि दुःश्चिन्ह असतें. त्वचेवर लाळ पुरळ येतो, परंतु तो कमी होतो. घाम फार येतो, लघ्वी कमी होते व त्यांमध्यें अलब्युमीन आढळतो. जिभेवर पांढरा थर असतो. रोग वाढत जातो त्याप्रमाणें ती रुक्ष होते, लाळ फार जाते व तिच्यावर चिरा पडतात. स्त्रीला शुद्धि असते, परंतु तिची बडबड चालते, वात झालेला असतो व शेवटीं बेशुद्धि येऊन मृत्यु येतो. कांहीं दिवसानंतर स्तनांतील दूध कमी होतें. कळा लागणें हें मुख्य चिन्ह असतें. पाठ, पाय, मांड्या डोकें यांमध्यें कळा येत असतात. सांध्यामध्यें पाणी झाल्यासारखें होऊन ते सुजतात परंतु तें हळुहळू कमी होतें.

निदान—( Diagnosis ) गर्भाशयामधून स्राव होतो तो तपासला पाहिजे. योनी स्वच्छ धुतली पाहिजे, व नंतर स्राव काढला पाहिजे. सेप्टीसीमीया अगर सेप्रेमीया यामध्यें जननेंद्रियाच्या भागांत दूषित विष असेल तर ताप येत असतो व गर्भाशय निर्जंतुक असतो व याकरितां जननेंद्रियांच्या भागांत असणाऱ्या जखमा निर्जंतुक करून त्या लवकर भरतील इकडे लक्ष दिलें पाहिजे.

बाळंतपणांत थंडी वाजून ताप आला म्हणजे तो मलेरियाचा समजून चिकित्सा करणें चुकीचें आहे. सेप्टीसीमीया व सेप्रेमीया यांची तुलना केली तर सेप्टी-सीमीयाची चिकित्सा करणें धोक्याचें असतें.

हा विषजन्य ताप बरेच दिवस चालू असतो. सुधारणा होते, ताप कमी होतो, परंतु हलगर्जीपणा झाल्यास पुनः उलटण्यांचा संभव असतो. ह्या विषांचें पुवांत रुपांतर होऊन हा पु स्त्रीअंड दूषित करतो.

धोक्याचीं लक्षणें:—१२० वर नाडीची गती असणें, उलट्या, पोटफुगी व जीभ पिवळसर असणें, झोंप नसणें, थंडी वाजणें व पोटांत कांहीं न जाणें हीं लक्षणें होतात. हीं लक्षणें दिसूं लागतांच काळजीपूर्वक आरंभापासून इलाज केल्यास रोगी वांचण्याचा जास्त संभव असतो.

चिकित्सा:—जंतु शास्त्रांच्या शोधांमुळें हा सूतिकाज्वर आटोक्यांत आलेला आहे. बाळंतपणानंतर, जंतुनाशक उपचार करून जननेंद्रियांचे भाग स्वच्छ ठेविले, त्याचप्रमाणें योनीमार्ग तपासतांना स्वच्छता बाळगिली, तर ह्या विषांचें प्रसरण होत नाहीं. रोगांची चिन्हें दिसूं लागतांच हलगर्जीपणा न करतां उपचार करूं लागावेत. सेप्रेमीया व सेप्टीसीमीया यांचीं चिन्हें आरंभीं कळणें कठीण असल्यामुळें लक्षणावर भिस्त ठेऊन उपचार करावेत. सूतिकाज्वरांचे त्यांच्या लक्षणावरून मृदु ( mild ) व तीव्र असे भेद केलेले आहेत.

मृदु जातीच्या सूतिकाज्वराचीं लक्षणें:—थंडी न वाजणें, ताप १०१ ते १०२ असणें थोडी डोकेंदुखी, गर्भाशय मोठा, स्रावाला घाण नसणें हीं साधारण सेप्रेमीक तापाचीं लक्षणें होत व रक्तामध्यें या जातीचें विष अल्प प्रमाणांत असतें. १ पाइंटमध्यें १ चमचा लायसॉल घालून ऊन पाण्यानें योनीमार्ग स्वच्छ धुतला व अर्गट तीनदां दिलें तर गर्भाशयामध्यें असलेल्या मृतपेशी व अवशिष्ट भाग बाहेर पडून जातात. जुलाबाचें औषध दिल्यास गुदद्वारें विषें बाहेर पडून जातात.

तीव्र जातीच्या सूतिकाज्वरांचीं लक्षणें:—ताप १०३ वर असणें. थंडी न वाजणें, नाडीची गति १०० ते १२० असणें. डोकें दुखणें, अस्वस्थता असणें व स्राव कमी प्रमाणांत, दुर्गंधी नसलेला, किंवा जास्त प्रमाणांत होऊन दुर्गंधीयुक्त असा आढळणें अशीं चिन्हें असतात. अशा वेळीं गर्भाशय जंतुनाशक औषधांनीं काळजीपूर्वक स्वच्छ धुतला पाहिजे. सेप्रेमीयाच्या तापांत गर्भाशयाच्या भिंतींत ( walls ) विष असतें व हें गर्भाशय स्वच्छ धुतला असतां आढळून येतें. परंतु ह्या गोष्टी साधारण इसमाच्या आवांक्याच्या बाहेर असल्यामुळें कल्पना येण्याकरितां त्याचें वर्णन दिलेलें आहे. रोग्याचें अन्न पातळ असावें, पेय पदार्थांचा उपयोग करावा, मांसाहार करणाऱ्या स्त्रियांना मांसाचा रस, सूप हे द्यावेत. अलकोल अल्प प्रमाणांत द्यावा. मलावरोध असल्यास १ दिवसाआड सारक औषध रात्रीं द्यावें. ताप जास्त असेल तर तो स्पांजिंग वगैरे करून व बर्फाचा उपयोग करून कमी

करावा. ताप कमी करण्याची एकदम घाई करूं नये. झोंप येत नसल्यास ब्रोमाइड ३० ग्रेनपर्यंत द्यावें. अगर गाईचें तूप माथ्याला चोळावें व निरशा दुधाच्या घड्या डोळयांवर ठेवाव्यात.

**सूतिकाज्वर अगर दुसऱ्या कोणत्याहि विकाराचा उद्भव त्या त्या विकाराच्या जंतूपासून होत असतो. अर्थात् विकार नष्ट करण्यासाठीं जंतुनाशन करणें अगर त्या त्या विकाराच्या जंतूचा उद्भव न होईल अशी प्रतिकारक्षम आगाऊ व्यवस्था-तरतूद करणें अशी पाश्चात्त्य वैद्यकाची साधारणपणें पद्धती आहे. आपल्या आर्यवैद्यकांत या प्रकाराला विशेष महत्त्व दिलें नसून कोणत्याहि रोगांचा उद्भव त्रिदोषांच्या व त्रिधातूंच्या वैषम्यामुळें ( शरिरांतील कफ, पित्त वात व सप्तधातु ) होतो व निरनिराळ्या रोगांच्या उद्भवाला कारणीभूत होणारे जंतु त्रिदोष वैषम्यामुळेंच पैदा होऊन त्याचा प्रकृतीवर परिणाम होऊन रोगोद्भव होतो अर्थात् कोणत्याहि रोगावर चिकित्सा करतेवेळीं त्रिदोषांचें व धातूंचें वैषम्य पाहून व त्याबद्दलचा विचार करून त्या अनुरोधानें चिकित्सा होते; शिवाय शरिरांत रोगप्रतिबंधक-अगर प्रतिकार शक्ती उत्पन्न होण्यासाठीं त्रिदोष पद्धतींचेंच अवलंबन केलें जातें. अर्थात् चिकित्सेच्या बाबतींत त्रिदोषपद्धतीच्या अवलंबनानें " मूले कुठारः " हेंच आयुर्वेदाचें धोरण असतें.**

स्तनांचा दाहः (Mastitis)—बाळंतपणानंतर अगर मुलाला दूध पाजल्यानंतर स्तन स्वच्छ ठेविले नाहींत, तर स्तनांला चिरा पडतात, व त्यांतून दूषित जंतूचा प्रवेश होतो. स्त्रीच्या दुधांत गरोदरपणांत शेंकडा ८६ प्रमाणांत व बाळंतपणांत शेंकडा ९१ प्रमाणांत जंतु असतात; स्टॅफीलोकोकाय म्हणून जंतुची जात आहे ते दुधाच्या नलिकेमध्यें निरोगी अवस्थेंत नेहमीं आढळतात. ही स्तनांची सूज बाळंतपणानंतर २-३ आठवड्यांनीं येते. स्तनांला लाली, ठणका, हीं अगोदर लक्षणें होतात. ताप वाढतो, डोकें दुखतें, अस्वस्थता, व सूज वाढलेली दिसते. सूज पिकल्यास थंडी वाजते व दाह झालेली जागा थंड होते, लाली

कमी होते, व त्वचा पांढुरकी दिसते. स्तन पिकून फुटून पू होतो व हळुहळु सर्व लक्षणें कमी होतात.

चिकीत्साः—स्तनांला चिरा दिसतांच त्या जंतुनाशक औषधानें धुऊन कापसाची घडी त्याला बांधावी. टिंक्चर बेलाडोना बाहेरून लावावें. जुलाब घ्यावा. अंगावरील दूध बंद करावें. दूध ब्रेस्ट पंपानें काढून घ्यावें.

बाळंतपणानंतर होणारा रक्तस्राव ( Secondary Post partum Haemorrhage )—बाळंतपणानंतर साधारणतः सहा तासांनीं एकाएकीं निरनिराळ्या स्थितींत रक्तस्राव सुरू होतो. त्याना निरनिराळीं कारणें आहेत. क्षुल्लक कारणानें पहिल्या तीन दिवसांत पुष्कळच रक्तस्राव होतो. ( २ ) बाळंतपणांतील स्रावाला वेळ लागणें. ( ३ ) सुतिकास्राव चिकट झाल्यानंतर रक्तस्राव पुनः सुरू होतो, किंवा, बरेच दिवस रक्तस्राव चालू रहातो.

कारणें:—वारेचा किंवा गर्भाच्या पडद्यांचा ( Chorion ) अवशिष्ट भाग आंत रहाणें, रक्ताची गुठळी आंत असणें, ( २ ) प्रकृति अशक्त असल्यामुळें, मुलानें अंगावर दूध ओढल्यामुळें, गर्भाशयाच्या संकोचनाला प्रतिबंध झाल्यामुळें व हृदय किंवा यकृतांचा विकार, गर्भाशयाची स्थान भ्रष्टता, मलावरोध, एकाएकीं एकदम उठणें, अशीं कारणें होतात.

तीव्र प्रकारांत थोडा थोडा पण एकदम रक्तस्राव होतो, परंतु तो मधून मधून होत असतो, व ह्याचें कारण म्हणजे मनाला धक्का बसून गर्भाशय एकाएकीं शिथिल होणें हें होय. वारेचा भाग दूषित झालेला असेल व तो गर्भाशयामधून निराळा होत असेल, किंवा नाळेचा मोड आंत झाला असेल, गर्भाशय उलट झाला असेल, किंवा गर्भाशयामध्यें नवीन वाढ, दुष्ट व्रण, फायब्रॉइड ग्रंथी हीं झालीं असतील तर तीव्र रक्तस्राव होतो.

तीव्र रक्तस्राव हा दुसऱ्या किंवा तिसऱ्या आठवड्यांत होतो.

गर्भकोशाला दुष्टव्रणः—( Chorionic-cancer ) हा गरोदरपणांत प्रारंभीं किंवा पुढें वारेच्या ठिकाणीं होत असतो. याला कारण गर्भाशयांच्या मागील व पुढील भिंतींत, गर्भाशयांचे बुड ( Fundus ), साधारणतः वारेच्या ठिकाणीं रक्तांची गुठळी तयार होऊन तो वाढत असतो. ( Haemorrhagic growth ).

बाळंतपणांत मधूनमधून एकाएकीं वारंवार रक्तस्राव होऊन गर्भ पडणें, या

स्थितींत क्वचित ९ महिने सुद्धां पुरे जातात. स्रावाला घाण येणें, फिक्कटपणा, थंडी ताप, व गांठी यामुळें पुष्कळ वेळां स्त्रीला मृत्यु येतो.

हा विकार तज्ज्ञ डॉक्टरला दाखविल्याशिवाय समजणें शक्य नाहीं.

वेड लागणें:—( Reproductive-Insanity ) ह्याचे तीन प्रकार कल्पलेले आहेत. गरोदरपणांत वेड लागणें, बाळंतपणांत वेड लागणें, दुग्धपान करीत असतांना वेड लागणें.

पहिल्या ६ आठवड्यांत वेड लागलें म्हणजे बाळंतपणापैकीं आहे असें समजावें. व नंतर लागल्यास दुग्धोत्पादनामुळें लागलें असें समजावें.

गरोदरपणांत हें वेड ५ व्या महिन्यानंतर लागतें. बाळंतपणांत पहिल्या १४ दिवसांत लागतें. दुग्धापासून वेड लागतें तें दुसऱ्या महिन्यांपासून लागतें. बाळंतपणाच्या दूषितजन्य विषांमुळें वेड लागलें असेल तर त्यांत झोंप मुळींच नसणें हें सुलभ चिन्ह समजावें. व त्यांत डोकें दुखणें, बारीक ताप–असेल तर तें निदान निश्चित समजावें. बाळंतपणांत वेड लागल्यास तें कांहीं दिवसांनीं कमी होतें. झोपेचीं औषधें मोठ्या प्रमाणांत द्यावींत व जागा बदलावी.

दाबामुळें होणारा मज्जातंतूचा दाहः—( Pressure Neuritis ).

प्रसूतीच्या दुसऱ्या अवस्थेच्यावेळीं मज्जातंतूच्या केंद्रावर ( Trunk ) दाब पडल्यामुळें इजा होऊन, बाळंतपणाच्या वेळीं पायांत दुखूं लागतें, व हें मज्जातंतूच्या गतिप्रमाणें मधून मधून दुखतें आणि हळुहळु याचा परिणाम एवढा होतो कीं त्या भागाची संज्ञा नाहींशी होऊन पाय सुन्न होतो, हळुहळु कांहीं दिवसांनी योग्य उपचार केल्यास हा विकार बरा होतो.

सूतिकाज्वर हा जंतुजन्य आहे हें वर सांगितलेलें आहे. आतां हे जंतु कोणते याचा विचार आतां करूं.

बाळंतपणांत ह्या जंतूचा प्रवेश खालील कारणांमुळें होतो. ( १ ) जंतु ( Bacteria ) ( २ ) संसर्ग होण्याचा मार्ग ( channels of infection ) ( ३ ) दूषितजन्य पेशींची प्रतिबंधक शक्ति.

जंतू ( Bacteria ):—हे रोगोत्पादक जंतु नानाप्रकारचे असतात. याचे तीन वर्ग केलेले आहेत. ( १ ) पेशी सडवणारे जंतुः—( Putrefactive organisms ) ( २ ) पुवोत्पादक जंतुः—( Pyogenic organisms ) ( ३ ) विशिष्ट जंतु ( Specific organisms )

जंतूचा १ ला प्रकार—ह्यांचा मृत पेशीमध्यें वाढ होऊन ते सडवण्याचा धर्म आहे. ह्या जंतूचा सर्व शरिरावर परिणाम होत नाहीं व ह्यांचे आस्तित्व मृत पेशीच्या सांठ्यावर अवलंबून असतें. तो संपला म्हणजे यांचें अस्तित्व संपतें. रुधिराभिसरणांमध्यें यांचें शोषण झालें तर विषारी द्रव्यें उत्पन्न होतात. (Toxins) साधारणतः या जंतूचे पुष्कळ प्रकार आहेत. विशेषतः बाळंतपणांत हे तीन प्रकारचे जंतू आढळतात. ( १ ) बॅसिलस प्रोटीअस व्हलगेरीज ( २ ) बॅसिलस सेप्टीकस ( ३ ) बॅसिलस एरोजीनस कॅपसुलेटस.

( २ ) पू उत्पन्न करणारे जंतूः—( Pyogenic-organisms ) ह्या जंतूचा धर्म रोगाचें विष रक्तांत भिनवून पू तयार करणें. ह्याच्या मुख्यतः ४ जाती आहेत. ( १ ) स्ट्रेप्टोकोकस पायोजीनस ( २ ) स्टॅफीलोकोकस पायोजीनस ( ३ ) बॅसिलस कॉली कम्युनिज. ( ४ ) बॅसिलस पायोसीएनीअस.

हे जंतु शरिराच्या कोणत्याहि भागांत असले तरी रसवाहिन्या (lymphatics) व रक्तवाहिन्यांच्याद्वारें सेप्टीसीमीयाचीं लक्षणें उत्पन्न करतात.

ह्या जंतूपासून फारच जपून राहिलें पाहिजे. गर्दीच्या ठिकाणीं, धूळ, अस्वच्छ कपडे, व हवेमध्येंहि हे आढळतात. बाळंतपणांत येणाऱ्या तापांत स्त्रावामध्यें हे जंतु आढळतात. नर्स अगर डॉक्टर याच्या हाताला अगर शरिराच्या कोणत्याहि ठिकाणीं, क्षत अगर जखम पूयुक्त असेल तर यांच्या संसर्गाची बाधा होते. हे जंतू जननेंद्रियांच्या बाह्य भागांत, गरोदरपणांत व बाळंतपणांत योनीच्या स्त्रावांमध्यें प्रकृति चांगली असतां आढळतात.

( ३ ) तिसरा प्रकार विशिष्ट जंतूः—( specific organisms )

( १ ) डिप्लोकोकस गनोरिया
( २ ) बॅसिलस डिप्थेरियों
( ३ ) न्युमोकोकस
( ४ ) बॅसिलस टीटॅनी
( ५ ) बॅसिलस टायफोसस

पूप्रमेहांचे जंतू ओटीचा दाह उत्पन्न करतात. न्युमोकोकोस व बॅसिलाय कॉली हे उदराच्या आंतील वेष्टनांचा दाह, व नंतर शारीरिक परिणाम करतात. घटसर्पाचे जंतु जननेंद्रियाच्या भागांत सूज उत्पन्न करतात.

अस्वच्छपणा, योनीमार्गांतून येणारा स्राव, जखम, गर्भाशयामध्यें मृतपेशी असणें, त्याचप्रमाणें सुटका करतांना शस्त्रापासून जखम होणें हीं सर्व जंतूंना पोषक अशीं कारणें आहेत.

सूतिकाज्वरांमध्यें आंतील इंद्रियांचा दाह होत असतो. व दाह पसरत जाईल त्या त्याप्रमाणें विशिष्ट इंद्रियांमध्यें बिघाड होत जातो. ह्या जंतूमुळें शिरेचा दाह ( Phlebitis ) होतो. हा दाह दूषित झालेल्या गर्भाशयांतून रुंद बंधनांत जातो. ( Broad Ligament ) नंतर वर डाव्या अंडामधील शिरेमधून मूत्रवाहक शिरेमध्यें व डाव्या कटिशिरेमधून इन फीरीयर व्हेनाकेवामध्यें ही रक्ताची गुठळी हृदयाच्या उजव्या पडद्यांत जाते. कांहीं केसीसमध्यें मांडीच्या शिरेमध्यें जाऊन अडकते, व यामुळें पायांना सूज येते. ह्याला व्हाइट लेग म्हणतात. ह्या गुठळ्याचें पुढें पूवांत रूपांतर होतें. हे जंतु शरिरांमध्यें ज्या ज्या इंद्रियांच्या ठिकाणीं जाऊन वस्ती करतात त्या त्या प्रमाणें इंद्रिय विशिष्ट चिन्हें उत्पन्न होतात. बाळंतपणांत मांड्यांना सूज येते व पाय मोठा होतो उचलवत नाहीं, ताप, दुखावा, अस्वस्थता, हीं चिन्हें जाणवतात. रक्ताची गुठळी शिरेमध्यें अडकून रुधिराभिसरणाला प्रतिबंध होतो. शिरांमध्यें रुधिराभिसरणाला व्यत्यय आला म्हणजे या दूषित जंतूमुळें पू होऊं लागतो, याला इंग्रजींत पायेमीया ( Pyaemia ) म्हणतात.

बाळंतपणांत एकाएकीं मरण येणें:—मूर्च्छा, झांपड किंवा फुफ्फुसांच्या धमनी मध्यें रक्ताची गुठळी अडकणें, हीं कारणें होत.

मुर्च्छा:—( Syncope ) हृदयांचा विकार, पांडुरोग, अतिशय रक्तस्राव होणें, या कारणामुळें पहिल्या आठवड्यांत हृदयाची क्रिया बंद पडून मृत्यु येतो. मनावर एकाएकीं धक्का बसल्यासहि मृत्यु येतो.

बेशुद्धि:—( Coma ) मेंदूमध्यें रक्तस्राव होणें, आंचके येणें, मधूमेहाचा विकार असणें यांमध्यें बेशुद्धि येऊन मृत्यु येतो.

मांडीची सूज व ठणका—बाळंतपणांत पहिल्या दोन चार दिवसांत चालल्यास अथवा योनिधूति अथवा पट्टी लावण्यांत चूक झाल्यास मांडीतील शीर ( नीला ) सुजून तिचा दाह होतो व त्यामुळें मांडी दुखते, व तींत फार वेदना होतात. अशावेळीं मांडी चोळून शेकून घेण्याची सल्ला देण्यांत येते. परंतु तसें करणें चुकीचें आहे. अशा चोळण्यानें मांडीतील शीर अधिक फुगून त्यापासून फार

त्रास होतो व या चुकीचा परिणाम स्त्रियांना जन्मभर सोसण्याचा प्रसंग येतो. ही सूज बहुधा बाळंतपणाच्या पहिल्या पंधरवड्यांत येते. प्रथमतः जांघेंत, ओटींत, किंवा पोटरींत, अगर मांडींत दुखूं लागून थोड्याच वेळांत पायांवर सूज चढते. मांडी, पोटऱ्या व पाय फुगट आणि पांढुरके दिसूं लागतात. व त्या त्या जागीं अत्यंत तीव्र ठणका असतो. थंडी वाजून अंगांत तापहि भरतो. अशा वेळीं ताबडतोब डॉक्टर–वैद्यांचे मार्फत उपचार करवावे व ते सुरू होईपर्यंत बिछान्यावर स्वस्थ पडून राहावें. व दुखऱ्या जागीं जवसाच्या पोटिसानें अगर वाफारलेल्या फ्लानेलच्या कपड्यानें शेक द्यावा; या बाबतींत एक गोष्ट विशेष लक्षांत ठेवावी ती ही कीं, दुखरा भाग मुळींच चोळूं नये. ही सूज विशेषतः डाव्या पायावर येत असते.

मूत्राशयदाहः—(Cystitis) गरोदरावस्थेप्रमाणेंच सूतिकावस्थेंत मूत्राशयदाह हा विकार प्रसूता स्त्रीला आगांतुक कारणांनीं होत असतो व त्याची तीव्रता विशेष असल्यास त्या योगें स्त्रीला अस्वास्थ्य, वेदना होतात एवढेंच नव्हे, तिच्या मूत्रद्वारांतून—जनन मार्गांत अथवा मूत्राशयांतून मूत्रपिंडापर्यंत हा दोष पसरतो व त्याचे भयंकर परिणाम होतात. ही विकृती गरोदरपणाच्या पूर्वी, गरोदरपणांत अथवा सूतिकावस्थेंत पहिल्यानें होऊं शकते. आरंभीं मूत्राशय दूषित होऊन त्यावेळीं ती सुरू होते. या विकारांत वारंवार लघवी होणें, लघवीच्या वेळीं वेदना होणें हीं आरंभींचीं लक्षणें असतात, व एकदोन दिवसांत लघवी पुवामुळें गढूळ दिसूं लागते. (Pyelitis) व रोगाच्या तीव्रतेच्या मानानें लघवींतील पुवाचें प्रमाण कमज्यास्त दिसून येतें. मूत्राशयदाह थोडा असला तर लघवी थोडी भुरकट दिसते. व तो तीव्र असेल व दोष बराच वाढलेला असेल तर लघवींत पुवाचें प्रमाण फारच असतें. या विकारांत बहुतेक ज्वरांश असतो व नाडीची गति वाढलेली असते. हा दोष मूत्राशयांतच असतो, किंवा वर दर्शविलेल्या दोन मार्गांपैकीं एखाद्या मार्गानें तो पसरत जातो. हा दोष मूत्रद्वारांतून खालीं बाह्य जनन भागावर पसरूं शकतो व तेथून योनि व गर्भाशय यांत जाऊं शकतो.

अशा विकारांत जंतुघ्न मूत्रशुद्धी होणारीं औषधें पोटांत देऊन बोरीक लोशनसारख्या सौम्य जंतु नाशनानें मूत्राशय नियामितपणें धुवून टाकणें हीच या विकारांवर मुख्य चिकित्सा आहे. हा विकार गरोदरपणांत झाला असेल

तर प्रसूतावस्था सुरू होण्यापूर्वीच त्यावर उपाय केला पाहिजे. नाहींतर इतर विकार होण्याचा संभव असतो; यासाठीं या विकारांकडे त्याचें चिन्ह दिसतांच विचारपूर्वक लक्ष देणें फार जरुरीचें आहे.

फुप्फुसांच्या रक्तवाहिनीमध्यें रक्ताची गुठळी अडकणें:—( Pulmonary-embolism ) गरोदरावस्था, प्रसूतीची सुरवात, किंवा बाळंतपण ह्या मध्यें वरील स्थिती होण्याचा संभव असतो. एकाएकीं जोराचा खोकला येणें, जोराचें काम करणें, किंवा आंकडी हीं कारणें होत.

प्रसूतावस्थेंत जे विकार होतात त्यापैकीं हा विकार फार गंभीर व भयंकर स्वरूपाचा मानावा लागेल. गर्भाशयाच्या किंवा याच्या आजूबाजूच्या मोठ्या शिरांत रक्ताच्या गुठळ्या होतात त्यापैकीं कांहीं फुटून त्यांचा अंश रक्ताभिसरणाबरोबर हृदयांत जातो व हृदयांतून गुठळीचा अंश फुप्फुसांच्या शिरांत जातो. व तिथें तो अडून राहून रक्ताभिसरणास प्रतिबंध करितो. गुठळी ज्या मानानें लहान मोठी असेल तिच्या मानाइतकी मोठी धमनी रुद्ध होते व त्यामुळें फुप्फुसाच्या बऱ्याच भागाला रक्त मिळेनासें होतें. आणि ताबडतोब निरनिराळ्या प्रकारचीं भयंकर चिन्हें दिसूं लागतात. प्रसूतावस्थेनंतर गर्भाशय योग्य प्रकारें आकुंचित झाला नाहीं तर हा विकार होण्याचा संभव असतो. गर्भाशय आकुंचित असतो तेव्हां रक्तवाहिन्यावर दाब पडल्यामुळें त्या रिकाम्या असतात. आकुंचन होत नसलें तर त्यावर दाब पडत नाहीं म्हणून रक्तवाहिन्या रुंद व रक्तानें भरलेल्या असतात. या विकारांचीं लक्षणें एकाएकीं सुरू होऊन तीं वाढत जातात. ग्लानि येते, श्वास कोंडतो, हृदयाची गति जलद होते व त्याचा शक्तिपात होऊं लागतो. श्वासोच्छ्वास जलद होतो. स्त्रीच्या शक्तीचें मान व रुद्ध झालेल्या धमनीचें मान यावर विकाराचा कमज्यास्तीपणा अवलंबून असतो. मोठ्या धमनींत जर अवरोध झाला असेल तर अल्पावधींत मृत्यु येण्याचा संभव असतो. लहान धमनींत प्रतिबंध झाला असेल तर स्त्रीच्या जगण्याची बरीच आशा असते. या विकाराचे प्रसंगीं डॉक्टर वैद्याचेमार्फत त्वरित उपाय योजना करावी, स्त्रीला तक्क्याचा आधार देऊन किंवा अर्धवट बसवून ठेवावी. व ब्रँडीसारख्या उत्तेजक औषधांचा उपयोग करावा.

# प्रकरण ४ थें

## बाळंतरोग व पथ्य

बाळंतरोगः—(Purpural Disease) या नावाचा स्वतंत्र रोग नाहीं. स्त्री प्रसूत झाल्यानंतर तिला जे विकार होतात त्या विकाराचा समावेश बाळंतरोगामध्यें होतो. आपल्या आर्यवैद्यकांत बाळंतरोगाचीं जीं लक्षणें सांगितलीं आहेत तीं सर्वच लक्षणें प्रत्येक स्त्रीस होतातच असें नाहीं. कित्येकींना नुसता ताप व खोकला सुरू होऊन तोच वाढत जाऊन शेवटीं त्यानेंच अंत होतो. तर कित्येकींना नुसता अतिसार होऊन त्यानें तिचा शेवट होतो. खोकला, ताप, अतिसार यांवर जे उपाय सांगितले आहेत ते या बाळंतपणाच्या स्थितींतल्या विकारांवर केले असतां फायदेशीर होऊं शकत नाहींत. तीच स्त्री जर बाळंत नसून साध्या स्थितींतील असेल तर तिला त्या उपचारांनीं गूण येतो असें दिसून येतें. यावरून बाळंतपणांतील झालेला प्रत्येक रोग त्या रोगावरील उपचार केले असतां बहुधा बरा होत नाहीं, यावरून तो बाळंतरोग असावा असें समजण्यास हरकत नाहीं. बाळंतपणामध्यें ताप, खोकला, अतिसार असे विकार जडले असतां ते बहुतेक कष्टसाध्य, किंबहुना असाध्यच होऊं शकतात.

पहिल्या बाळंतपणामध्यें विकार जडल्यास तो त्यावेळीं नाशास कारण होतो असेंच केवळ नाहीं; परंतु त्यावेळीं त्याचें बीजारोपण होतें असें म्हणावें लागतें पुढें अयोग्य वर्तनानें किंवा शक्तीची कांहीं मुदत गेल्यावर दुसऱ्या किंवा तिसऱ्या बाळंपणामध्यें त्यास अनुकूल अशी मदत होऊन तो बीजरूपी रोग एकदम वाढून बाळंतिणीच्या नाशास कारण होतो. अशीं अनेक उदाहरणें आढळून आलीं आहेत. या बाळंतरोगाचें प्राबल्य हिंदू जातींतील उच्चवर्णीयांमध्यें विशेष दिसून येतें. खालच्या वर्गांतील स्त्रियांमध्यें या रोगांचें प्रमाण फारच अल्प दिसतें. युरोपियन स्त्रियांमध्यें हा विकार सहसा आढळून येत नाहीं. हिंदूमधील उच्च वर्गांत या विकारांचें प्राबल्य ज्यास्त असण्याचें कारण अलिकडील सुधारलेली म्हणून दाखविली जाणारी अविचारी वागणूक हेंच म्हणावें लागेल. युरोपियन लोकांमध्यें कोणत्याहि अनुकूलतेनें म्हणा, परंतु शरीर रक्षणाचा विचार जास्त केला जातो. व हिंदूपैकीं खालच्या वर्गीयांमध्यें कोणत्याहि प्रकारची अनुकूलता नसल्यामुळें नैसर्गिक राहणीची स्थिती आढळते; यामुळें त्याच्या

विचार आचारास कांहीं ताळतंत्र नसतां सुद्धां या रोगाचें कारण घडत नाहीं याचें कारण त्यांच्या प्रकृतींत नैसर्गिकपणेंच प्रतिकारशक्ती उत्पन्न झालेली असते. आमच्या उच्चवर्णीयांमध्यें या रोगाचें प्राबल्य होण्याचें कारण अलीकडील सुधारलेला आहार-विहार-वर्तन-रहाणी हेंच म्हणावें लागेल. सूक्ष्म रीतीनें याबद्दल विचार करणारास हें म्हणणें सहजीं पटूं शकेल. शिवाय " **शास्त्रात् रूढिर्बलीयसी** " या जगप्रसिद्ध म्हणीप्रमाणें अंध परंपरेच्या आधीन होणें हेंहि एक कारण म्हणावें लागेल. आमच्यामध्यें अशा कांहीं रूढी अथवा समजुती बनून गेल्या आहेत कीं, गरोदर स्थितींत एकादा विकार झाल्यास ' स्त्री गरोदर आहे सबब औषध द्यावयाचें नाहीं अशी बहुतेक ठिकाणीं समजूत रूढ आहे व त्या समजुतीप्रमाणें बरेच प्रसंगीं गरोदर स्थितींत गर्भिणीच्या विकाराची हयगय होत असते व त्याचे परिणाम मग पुढें भोगावे लागतात.

ज्या खाद्यवस्तु पौष्टिक आहेत, परंतु त्या एकाद्या अशक्त प्रसूतेला सोसत नसल्यास त्या पौष्टिक म्हणून तिला आग्रह करून बळेंच तिला देणें केव्हांहि योग्य नाहीं. दुसरे हलके पदार्थ देऊन जठराग्नीचें रक्षण करावें, जठराग्नि मंद झाल्यास अशक्तपणा येतो व अशक्तपणा उत्पन्न करणारीं सर्व कारणें बाळंतरोगांच्या मुळाशीं असतात. बाळंतिणीची खोली कशी असावी याचें वर्णन मागें आलेंच आहे. शुद्ध मोकळी हवा ही रोग प्रतिबंधास मुख्य उपाय आहे. तशी हवा बहुतेकांना मिळत नाहीं. बाळंतिणीनें घरांत मोकळ्या जागेंत फिरण्यास हरकत नाहीं. तसेंच थंडीवाऱ्याचा उपद्रव होऊं नये म्हणून तेलकट वस्त्रांचा सतत उपयोग करूं नये. असे निरनिराळ्या प्रकारचे विचार केले पाहिजेत.

आपल्या आर्यवैद्यकांत बाळंतरोगांचें कारण पुढीलप्रमाणें सांगितलें आहे—अल्पवयांत अथवा कोणत्याहि कारणानें क्षीण झालेल्या स्थितींत स्त्रीला गर्भधारणा होऊन ती प्रसूत झाली असतां, गरोदरपणीं क्रोध, शोक, अति व्यायाम, अति चिंता, अति मैथुन, कुपथ्यानें वागणें, न सोसेलसें अधिक खाणें इत्यादि कारणें बाळंतरोगास होत असतात. तसेंच गरोदरपणीं झालेल्या रोगावर योग्य औषधोपचार न केल्यानें, बाळंतपणानंतर सूतिकाज्वर बरा झाल्यावर जो हाडीताप असतो त्यावर योग्य औषधोपचार न करतां त्या बाबतींत चालढकल केल्यानें, गरोदरपणांतील अतिसारावर वेळींच योग्य उपाय न केल्यामुळें, तो अतिसार बाळंतपणांतहि

तसाच चालू राहिल्यानें, ज्यास्त सूतिकास्राव व रक्तस्राव झाल्यानें बाळंतरोग होतो. पूतिदोष व पूय दोष तत्काळ प्राणघातक न होतां जर गर्भाशयांत सूज राहून गेली तर त्याचे चिरकालिक परिणाम म्हणजेच बाळंतरोग होय.

सर्व साधारणपणें या विकारांत केव्हां केव्हां अतिसार, बारीक ताप, हातापायांची आग होणें, जळजळणें, तिसऱ्या प्रहरीं आंग मोडून येणें व कधीं खोकला व ताप बरोबरच येणें, अपचनाची बाधा, भूक नसणें, मळमळणें, डोकें दुखणें, हातपाय किंवा सर्वत्र आंग ठणकणें, थोडें खाल्लें तरी पोट फुगणें, पोटांत दुखणें, हातापायावर सूज येणें, तोंड फुरफुरून येणें, झोंप नसणें, दिवसेंदिवस क्षीणता वाढत जाणें अशीं लक्षणें प्रकृतीनुरूप कमज्यास्त प्रकारें होत असतात. हा रोग पहिल्या बाळंतपणांत जडल्यास दुसऱ्या तिसऱ्या बाळंतपणांत उत्तरोत्तर वाढत जाऊन शेवटीं क्षयाची भावना होऊन स्त्रीचा अंत होतो. याला कारण गरोदरपणांतील व सूतिकावस्थेंतील आजारीपणांत पूर्व स्थितींतल्याप्रमाणें योग्य उपचारांची हयगय केल्याचें जरी कारण असलें तरी आपल्यांतील जुन्या रूढींस अनुसरून बाळंतिणीची खोली व तींतील रोगोत्पादक वातावरण, शिवाय बाळंतपणानंतरची वागणूक, विश्रांती व व्यायामाचा आणि पौष्टिक–हितावह अशा अन्नाचा अभाव इत्यादि गोष्टीच मुख्यत्वेंकरून या बाळंतरोगाला कारणीभूत होत असतात. एकंदरींत बाळंतरोग हा विकार असाध्य व प्राणघातक असा असला तरी आरंभापासून त्याच्या प्रतिकाराबद्दल दक्षता बाळगिल्यास या रोगापासून दूर राहतां येईल. आजकाल आपल्या देशांत या रोगाचा प्रसार बराचसा दिसून येत असून शक्य त्या उपायांनीं त्याच्या प्रसारास पायबंद घालणें फार अगत्याचें झालेलें आहे.

बाळंतिणीचें पथ्यः—बाळंतिणीनें काय खावें असा प्रश्न विचारला जातो; व बाळंतपण हें जरी नैसर्गिक असलें तरी त्यामुळें स्त्रीच्या शरिरांत अत्यंत क्षीणता आलेली असते. यासाठीं शक्ति–ताकद यांची वाढ होण्यासाठीं म्हणून तिच्या पचनशक्तीचा व ताकदीचा विचार न करितां निरनिराळे पौष्टिक पदार्थ पचण्यास जड असे तिची शक्ति वाढविण्यासाठीं म्हणून तिला दिले जातात. बाळंतीण आजारी नसली तरी प्रसूतीनंतर आलेल्या शिणामुळें तिला फारसें खाववत नाहीं. यासाठीं सोसेल व पचेल असें हलकें खाणें तिला दिलें पाहिजे. पहिल्या दिवशीं तिला दुधावरच ठेवावें व दुसरे दिवसापासून हळुहळू लापशीसारखे पदार्थ, रव्याची

खीर दोन दिवस देऊन नंतर चारपांच दिवसांत साधारण हलकें अन्न देण्यास सुरवात करावी. पहिले दहा दिवस हलकें पण पौष्टीक अन्न द्यावें. अहाळीवची खीर पौष्टिक व दूध वाढण्याकरितां देतात. कित्येक ठिकाणीं गव्हांचा सांजा देण्याची वहिवाट आहे, ती पद्धत चांगली; मात्र तो सांजा घट्ट न करितां पातळ करावा. सांजा दिल्यानें दूध वाढतें व शौचास साफ होतें. पाश्चात्य देशांत "ब्रॅन टी" म्हणजे गव्हांच्या कोंड्यांचा चहा देण्याची पद्धत आहे. गव्हांचे कोंड्यांत सारक व स्तनांतील दूध वाढविण्याचा धर्म आहे; स्तनांत दूध वाढल्यानें मुलाची जोगवण होऊन मूल अंगावर पिऊं लागलें म्हणजे, गर्भाशयाचें आपोआप आकुंचन होऊं लागतें, तेव्हां या दृष्टीनें बाळंतिणीच्या आहारांत गव्हांच्या सांज्यांचा अवश्य समावेश व्हावा.

पथ्य या सदरांत फक्त आहाराचाच समावेश होऊन भागत नसतें. आहाराप्रमाणें वर्तनांतहि पथ्याचें फार महत्त्व आहे, त्या दृष्टीनें विचार करतां प्रसूता स्त्रीनें तिच्या प्रसूतावस्थेची मर्यादा संपेपर्यंत म्हणजे प्रसूतिकालापासून पुढें कमीत कमी **तीन महिने** तरी आपली राहणी आरोग्यमय राहील असें वर्तन ठेवलें पाहिजे. या मुदतीपर्यंत स्त्री "**बाळंतीण**" या सदरांत मानिली जाते. सबब ही बाळंतपणाची कालमर्यादा संपेपर्यंत तिनें नेहमींची शारीरिक मेहेनतीचीं व मानसिक श्रमाचीं कामें करणें, थंडीवाऱ्यांत फिरणें, जाग्रणें करणें, मैथून वगैरे प्रकारापासून अलिप्त राहिलें पाहिजे. कित्येक ठिकाणीं हमेशा अशीं उदाहरणें दिसून येतात कीं, स्त्री प्रसूत झाल्यानंतर तिचें मूल ठरीव नियमाप्रमाणें आंकडी होऊन मृत्यु पावतें. अगर कित्येक स्त्रिया मृत गर्भच प्रसवतात. या दोन प्रकारांपैकीं पहिला प्रकार विशेष रीतीनें दृष्टीस पडतो. मूल जन्माला आल्यानंतर सर्व कांहीं व्यवस्थित असावयाचें व कांहीं कालानंतर ठरलेल्या नियमाप्रमाणें त्याला आंकडी होऊन मृत्यु यावयाचा असें कां व्हावें हा खरोखरच विचार करण्यासारखा प्रश्न आहे. याचें उत्तर स्त्रीच्या गरोदरावस्थेंतील व प्रसूतावस्थेंतील वागणुकींत सांपडूं शकेल. कित्येकांचें मत असें आहे कीं, बालकाच्या कोठ्याचा पचनशक्तीचा विचार न करतां अनियमित व फाजील स्तनपान झाल्यानें हा विकार जडतो, हें मत कसेंहि असो; पण स्त्रीच्या उदरीं जन्मास येणारें बालक गर्भाशयांत असतांना–गर्भधारणेपासून त्याचा जन्म होईपर्यंत त्याचें शारीरिक पोषण, संवर्धन, तसेंच त्याच्या बुद्धीवर, मनावर,

मेंदूवर वगैरे होणारे संस्कार यांचा सर्व प्रकारें पुरवठा स्त्रीच्या मानसिक-शारीरिक परिस्थित्यनुरूप होत असतो. अर्थात् स्त्रीचा गर्भाशय गर्भधारणेच्या पूर्वी व प्रसूतावस्थेनंतर निर्दोष स्थितींतील असेल व स्त्रीच्या वर्तनामुळें व मानसिक विचारांमुळें गर्भाशयांत कोणत्याहि प्रकारचा दोष उत्पन्न होण्याजोगी परिस्थिती निर्माण झाली नसेल किंवा तशी निर्माण होण्याची संवय होण्यासारखी परिस्थिती होत नसेल तर त्या गर्भाशयांत पोषण व वृद्धी होणाऱ्या बालकाला तसा आंकडीचा विकार उद्भवणार नाहीं असें वाटतें. एकंदरींत सांगावयाचें म्हणजे एवढेंच कीं बालकांच्या भावी आरोग्याची-जीवनाची सर्व प्रकारची जबाबदारी स्त्रीच्या व तिच्या गर्भाशयाच्या सुस्थितीवर अवलंबून असल्यामुळें व ती सुस्थिती स्त्रीच्या पथ्याच्या वागणुकीवर अवलंबून असल्यामुळें स्त्रीनें गरोदर व प्रसव या दोन्ही अवस्थांतील पथ्य विशेष काळजीपूर्वक व दक्षतापूर्वक पाळलें पाहिजे व तसें पाळलें जाईल तर तिच्याबरोबरच तिच्या भावी संततीस तें हितावह झाल्याशिवाय राहणार नाहीं; हें नमूद करणें जरूर वाटतें.

स्त्री प्रसूत झाल्यानंतर तिच्या नाडीचे ठोके दर मिनिटास ७० ते ८० व श्वासोच्छवास १८ ते २० असून शरिराची उष्णता ९७॥ ते ९८॥ डिग्री असल्यास व शौचास साफ होणें, पोटांत कळा नसणें, भूक तहान लागणें, झोंप येणें विशेष शीण न वाटणें योनिस्राव चालू असून मूत्रोत्सर्ग व्यवस्थित होणें अशीं चिन्हें असल्यास व तिला उल्हास वाटत असल्यास तिची प्रसूतावस्था व्यवस्थित झाली असून तब्यत ठीक आहे असें धरून चालण्यास हरकत नाहीं.

पुरुषांमध्यें कडकी म्हणजे क्षयाचें पूर्वचिन्ह समजलें जातें. त्याचप्रमाणें गरोदरपणांत बारीक ताप येणें हें बाळंतरोगांवर जाण्याचें मुख्य चिन्ह आहे. याकरितां आरंभापासून गरीब किंवा श्रीमंत अशा व्यक्तिनीं यांकडे दुर्लक्ष करूं नये. ह्या तापांमध्यें हवा पालटली असतां स्त्रीला बरें वाटतें व सुधारणा होऊं लागते. परंतु पुष्कळ लोक ही कडकी औषधानें कमी होईल या भरंवशावर शहरांत कोणी तिच्या शक्तिकडे लक्ष न देतां काळ काढीत असतात. अशा विकारांत हवा १२ आणे व औषध ४ आणे हें धोरण लक्षांत बाळगलें पाहिजे. रोगी आपल्या हातापायांनें चालत आहे तोंपर्यंत बाहेर गांवीं रुक्ष व उघड्या ठिकाणीं ( मिरजेसारख्या शहरीं ) प्रकृति निकोप होईपर्यंत जाऊन राहिलें पाहिजे, तरच जगण्याची पुष्कळ आशा असते.

---

# प्रकरण ५ वें

## महत्त्वाच्या विशिष्ट सूचना.

आमची पूर्वपरंपरा काल परिस्थितीमुळें दिवसेंदिवस नष्ट होत चालल्यामुळें घरांतील तरुण तरुणींना जाणत्या माणसांकडून प्राप्त होणारें ज्ञान-व घरगुती शिक्षण मिळेनासें झालें आहे. व त्यामुळें किरकोळ बारीकसारीक क्षुल्लक गोष्टींत सुद्धां परावलंबीपणा होऊं लागला आहे. घरांतील एकाद्या माणसास अकस्मात् साधारण क्षुल्लकसा जरी आजार झाला तरी त्या प्रसंगीं काय करावें हे कोणासच सुचेनासें होऊन डॉक्टर-वैद्याकडे धांवपळ करण्याची प्रत्येकाला पाळी येते. कोणताहि आजार उद्‌भवला तरी घरांतील स्त्रीपुरुषांना प्रथमोपचारांची माहिती असणें व ती प्रत्येकानें मिळवून प्रसंगीं तिचा उपयोग करणें जरुरीचें आहे. पूर्वी घरांतील वृद्ध आजी आजोबा—आई वडील यांच्यापासून घरच्या घरीं हें शिक्षण आपोआप मिळत असे व प्रसंगीं उपयोगी पडणाऱ्या औषधांचा बटवा प्रत्येक कुटुंबांत मुद्दाम संग्रह करून ठेवण्यांत येत असे व त्या औषधी बटव्यांतील औषधांचें ज्ञान व त्या औषधांचा उपयोग यांची परंपरागत माहिती पुढील पिढीला मिळत असे, यामुळें कित्येक आजार डॉक्टर-वैद्यांच्या अभावीं घरच्या घरीं चांगले होत असत. कित्येक आजार असे असतात कीं, ते घरगुती उपायांनीं अल्पावधींत बरे होतात; पण आमची पूर्वपरंपरा नष्ट झाल्यामुळें घरांतील प्रत्येक मनुष्य या ज्ञानास मुकलें जाऊन किरकोळ बारीकसारीक व अल्पावधींत बरे होणाऱ्या आजारांतसुद्धां परावलंबी झालेलें आहे.

साधारण सर्दी पडशाचा विकार झाला तरी आजकाल डॉक्टर वैद्य पाहिजे. त्याशिवाय भागत नाहीं. आजारांतील घरगुती प्रथमोपचाराचें अज्ञान सांप्रतच्या आपल्या जीवनार्थ कलहांत आणखी खर्च व नुकसानीची बाब होऊन बसलें आहे. ताप आला कीं, तो मग कसलाहि असो डॉक्टरला आणलाच पाहिजे किंवा डॉक्टर-वैद्याकडे गेलेंच पाहिजे असें जणु ठरूनच गेल्यासारखें झालें आहे. तापाचें लक्षण दिसतांच जुलाब घेणें, लंघन करणें आणि जर शरिरांतील उष्णता १०० डिग्रीच्या वर गेली असेल तर डोक्यावर कोलन वॉटर, नवसागराच्या पाण्याची घडी किंवा कांदा ठेंचून मस्तकावर ठेवणें व स्वस्थ पडून राहणें, अशा

उपायांनीं साधारण सर्दीचा, अजीर्णाचा वगैरे किरकोळ स्वरूपाचा ताप असल्यास तो ४८ तासांच्या आंत आपोआप कमी होतो. अशा प्रसंगीं औषध देण्याचें झाल्यास आयुर्वेदानें दीपन पाचन करणारें औषध देण्यास सांगितलें आहे. यांत आयुर्वेदाचा हेतु गूढ अतएव महत्त्वाचा आहे असेंच म्हणावें लागेल. कोणत्याहि रोगाचा अथवा विकाराचा आरंभ ज्वरापासून होत असतो, म्हणजे बहुतांशीं कोणत्याहि रोगाच्या सुरवातीस ज्वर असावयाचा हें ठरलेलें असतें. आणि " **विनाऽजीर्णेनच ज्वरम्** " या उक्तीप्रमाणें, ज्वराला कारण अजीर्ण हें ठरलेलें असतें. याकरितां आरंभी दीपन व पाचन असें औषध दिल्यास. जर तो ताप दोषी नसेल तर तीन दिवसांच्या आंत आपोआप कमी होईल व दोषी असल्यास तीन दिवसांनीं त्याचीं लक्षणें दिसून येतील. अशा प्रसंगीं ज्वर कमी करण्यासाठीं एकदम कडक उपाय करणें केव्हांहि हितावह होणार नाहीं. दीपन व पाचन औषधानें रोग्याच्या जीवनशक्तीला त्रास अगर नुकसान न पोंचतां जरी तो ज्वर दोषी ठरला तरी त्याचे उपद्रव सहन करण्याची शक्ती राहूं शकते व इतर होणारे उपद्रव टळले जातात, व आरंभींच एकदम कडक उपाय केल्यास विकाराचें खरें स्वरूप न समजतां विकाराला जोर चढून इतर निरानिराळे विकार उद्भवतात. तसा तो न होईल व त्याचें स्वरूप कायमचें व वाढतें दिसेल तरच मग डॉक्टर–वैद्यामार्फत उपचार करणें योग्य होईल. इतर किरकोळ निरनिराळ्या विकारांतहि त्या त्या विकारास अनुसरून असेच प्राथमिक उपचार झाल्यास पैशाची–दगदगीची बरीचशी आपत्ती टळूं शकते; मात्र त्या प्रथमोपचारांची व योजावयाच्या औषधींची वगैरे माहिती असणें जरुरीचें आहे, पण आज काल आमचें कुठें अडत असेल तर इथेंच. पूर्वपरंपरा नष्ट झाल्यामुळें व आमच्यांत या विषयाच्या आवडीचा, इच्छेचा आणि अगत्याचा अभाव असल्यामुळें आमचे लोक दिवसेंदिवस इतर निरानिराळ्या गोष्टींप्रमाणें या गोष्टींतहि पराधीन बनूं लागले आहेत नव्हे बनले आहेत असें म्हणावें लागतें. घरगुती उपचारांचा कांहीं उपयोग होत नाहीं व डॉक्टर–वैद्याशिवाय आतां भागणें शक्यच नाहीं अशी जेव्हां मनाची समजूत होईल तेव्हांच डॉक्टर–वैद्याचे मार्फत उपचार करवावे. मात्र या प्रसंगीं एक मुख्य गोष्ट लक्षांत ठेवावी ती ही कीं, ज्या डॉक्टर–वैद्यावर आपला विश्वास असेल व ज्याच्याविषयीं अनुभवानें खात्री

झाली असेल त्यांचेच औषधोपचार सुरू ठेवावे. दुसऱ्याच्या सांगण्यावरून अगर शिफारशीवरून वारंवार वैद्य डॉक्टर बदलणें केव्हांहि श्रेयस्कर न होतां उलट रोगवृद्धीस व पैशाच्या दृष्टीनेंहि नुकसानीस कारणीभूत होतें. औषधापेक्षां **विश्वास** याचें आजारांत गुण येण्याच्या कामीं फार महत्त्व आहे. कोणताहि वैद्य-डॉक्टर आपल्याला यश यावें अशीच इच्छा बाळगीत असतो, तेव्हां दुसरा वैद्य-डॉक्टर बदलण्याचा झाल्यास तो पहिल्याच्याच सम्मतीनें व त्याच्याच मार्फत बदलणें योग्य होईल. तरी आजाराच्या प्रसंगीं याप्रमाणें प्रत्येकानें तजवीज करावी असें मुद्दाम सुचवून ठेवावेंसें वाटल्यामुळें सुचविलें आहे. शेवटीं आणखी एक सूचना द्यावीशी वाटते ती ही कीं, आजाऱ्यानें ईश्वरावर दृढभाव ठेवावा; दृढ-भावनेनें आपल्यामध्यें एक प्रकारची सहनशक्ति उत्पन्न होत असते; व मनाला एक प्रकारचा आधार वाटत असल्यामुळें आजाराच्या संकटांतून पार पडतां येतें.

---

# प्रकरण ६ वें

## आयुर्वेद म्हणजे काय

प्रस्तुत ग्रंथांत प्रसंगोपात आयुर्वेदाची तरफदारी दर्शवून मनाला पटणारी आयुर्वेदाचीं मतें व सूचना आधारास धरून निरनिराळ्या विषयाचें विवरण केलेलें आहे, तेव्हां आयुर्वेद म्हणजे काय, त्याची रूपरेषा कशी काय आहे याचें दिग्दर्शन करणें या ग्रंथांत ग्रंथांतील विषयाच्या दृष्टीनें आवश्यक न वाटलें तरी जिज्ञासू वाचकांच्या समाधानासाठीं म्हणा अथवा माहितीसाठीं म्हणा स्पष्टीकरण करणें इष्ट वाटल्यावरून ठोकळ रूपरेषेनें तें दर्शविण्यांत येत आहे.

प्रत्येक प्राणिमात्रास जरुरीपुरतें वैद्यक शास्त्राचें ज्ञान असणें अगत्याचें आहे, परंतु त्याच्या आरोग्यांत बिघाड होऊन तो आजारी पडेपर्यंत त्या विषयाची फिकीर करीत नसतो. एकदां तो आजारी पडला म्हणजे मात्र मग त्याला त्या विषयाचें महत्त्व कळूं लागतें. रोग झाल्यावर तो प्रयत्नांनीं दूर करणें निराळें व तो मुळींच होऊं न देणें निराळें. यांत रोग मुळींच होऊं न देणें या गोष्टीचें विशेष महत्त्व आहे. कारण त्यामुळें नेहमीं निरोगी व सशक्त राहतां येतें. व जगांतील खऱ्या सौख्यानंदाचा लाभ प्राप्त करून घेतां येतो व त्याकरितांच प्रत्येकाला जरुरी पुरती तरी वैद्यक शास्त्रांची माहिती असणें फार जरुरीचें असतें.

वैद्यक शास्त्र म्हटलें कीं, आयुर्वेदिक, ॲलोपाथिक, होमिओपाथिक, बॉयोकेमिक, नॅचरोपाथिक, वगैरे निरनिराळ्या प्रकारचीं वैद्यक शास्त्रें आजकाल उपलब्ध व प्रचारांत आहेत; व आपल्या राज्यकर्त्यांच्या नियंत्रणानें व आश्रयानें ॲलोपाथिक ज्याला इंग्रजी वैद्यक म्हणतात तें बरेंच पुढें आलें असून दिवसेंदिवस नवोनव सुधारणांनीं तें प्रसारत आहे व आपल्या देशांत पुरातन कालापासून चालत आलेलें आपलें आयुर्वेदशास्त्र, बराच काल निराधार स्थितींत राहिल्यामुळें मागें पडलेलें आहे, पण कालपरिस्थितीमुळें हल्लीं आपल्या आयुर्वेदाकडे मोठमोठ्या विद्वान लोकांचें व थोड्याशा प्रमाणांत सरकारचेंहि लक्ष जाऊं लागलें आहे ही फार समाधानाची गोष्ट म्हटली पाहिजे. गेल्या कांहीं कालपर्यंत आयुर्वेदीय चिकित्सा व औषधी या विषयीं इंग्लीश पद्धतीचे डॉक्टर व सुशिक्षित समाज यांत बराच अनादर दिसून येत होता. पण अलीकडे त्यांचा त्यासंबंधीचा दृष्टीकोन बदलत चालला असून आयुर्वेद चिकित्सा व औषधी

यांच्याकडे सर्वसाधारण जनते प्रमाणेंच उपरोक्त लोकांचेंहि लक्ष वेधूं लागलें आहे; शिवाय अनेक विद्वान व मोठमोठे गृहस्थ या शास्त्राच्या पुनरज्जीवनार्थ झटत आहेत. एवढेंच नव्हें वरिष्ट व प्रांतिक कायदे मंडळाचे कांहीं सभासद आयुर्वेदिक पद्धतीला सरकारची मान्यता व आश्रय मिळवून देण्याची खटपट करीत आहेत. अशा वेळीं आयुर्वेदीक पद्धतीचें गूण व यथार्थ स्वरूप ठोकळपणें कां होईना पण जनतेच्या बरोबर लक्षांत आणून देण्याचे प्रयत्न जितके होतील तितके थोडेच आहेत व या बाबतींत इंग्रजी डॉक्टरांपेक्षां आयुर्वेदिक वैद्यांवर व तत्संबंधींचा व्यवसाय करणाऱ्या लोकांवर विशेष जबाबदारी असून त्याबद्दल नेटाचे प्रयत्न त्यांच्याकडूनच विशेष झाले पाहिजेत. इतर वैद्यकशास्त्रें आपापल्यापरी श्रेष्ठ असतील परंतु आयुर्वेद हें कोणत्याहि दृष्टीनें इतर शास्त्रापेक्षां कमी योग्यतेचें आहे असें म्हणतां येणारें नसून कित्येक बाबतींत त्याची श्रेष्ठता इतरांपेक्षां बरीच मोठी ठरेल.

आयुर्वेद पद्धति, तिचे नियम आणि त्याचें महत्त्व व निरनिराळ्या बाबतींतील त्याची श्रेष्ठता यांचें तौलनिकदृष्टया निरीक्षण झाल्यास त्याची श्रेष्ठता सहजीं दिसून येणार आहे पण तत्पूर्वी प्रथमतः आयुर्वेद म्हणजे काय ? त्याची रचना कशी, कोणत्या पद्धतीवर आहे व कोणत्या मूलभूत तत्त्वावर त्याची उभारणी झाली आहे वगैरे निरानिराळ्या विषयांचें सोपपात्तिक विवेचन होणें इष्ट दिसतें; तथापि प्रथमतः आयुर्वेद म्हणजे काय याचा अगोदर विचार करूं.

" **आयुरस्मिन्विद्यतेऽनेन** " अथवा " **आयुर्विंदती त्यायुर्वेदः** "
शरीर, इंद्रियें, मन आत्मा यांचा संयोग हेंच आयुष्य व त्या आयुष्याची प्राप्ती ज्याच्यामुळें होते तो आयुर्वेद.

**" हिताहितं सुखं दुःखं आयुस्तस्य हिताहितम्**
**मानंच तच्च यत्रोक्त मायुर्वेदःस उच्यते "**

हित कोणतें, अनहित कोणतें, सुख कोणतें, दुःख कोणतें, आयुष्य म्हणजे काय, आयुष्यास हितकर व अहितकर काय, आयुष्याचें प्रमाण किती, या संबंधीचा विचार ज्यांत केला आहे तो आयुर्वेद होय. आयुष्याचें हितानहित, रोगाचें कारण व त्याचा नाश या संबंधींचा विचार ज्यांत केला आहे त्याचें नांव आयुर्वेद होय.

शिवाय त्याच्या योगानें आयुष्याचें ज्ञान होऊन त्याची प्राप्ति होते, म्हणून त्याला आयुर्वेद अशी संज्ञा दिलेली आहे.

**रोगनिदान करून चिकित्सेच्या आधारें रोगनाश करणें हें आयुर्वेदाचें प्रधानतत्त्व नसून निरोगी मनुष्यास दीर्घायुष्य प्राप्त करून देणें हेंच त्याचें मुख्य ध्येय आहे,** यामुळें इतर वैद्यकशास्त्रांच्या बाबतींत व आयुर्वेदाच्या बाबतींत हाच मुख्य फरक आहे. हल्लीं निरानिराळ्या विद्वान् शोधकांनीं लावलेल्या शोधावरून आज जगांत प्रचलित असलेल्या ॲलोपाथिक ( इंग्रजी वैद्यक ) आदि निरानिराळ्या वैद्यकशास्त्राचा उगम आयुर्वेदापासूनच झाल्याचें दर्शविलें आहे. अनादि कालापासून प्रतिपादिलेले आयुर्वेदाचे सिद्धान्त आजकाल प्रचितीस येत असून ते त्रिकालाबाधित सत्यतेच्या पूर्ण कसोटीस उतरत आहेत व उतरले आहेत यावरून आयुर्वेदाचें महत्त्व किती श्रेष्ठतम आहे हें सहजही कोणाच्याहि नजरेस येणार आहे व म्हणूनच आजवर आयुर्वेद विरुद्ध परिस्थितींतहि टिकाव धरून राहिलेला आहे. निरनिराळ्या शोधांची भर व सक्रिय आधार यांची मदत जर आयुर्वेदास लाभली असती तर आजकाल सर्व जगांत निःसंशय त्याचा प्रसार झाला असता, या बाबतींत तौलनिकदृष्ट्या लिहावयाचें झाल्यास स्वतंत्र ग्रंथच लिहावा लागेल या साठीं तो विचार बाजूस ठेवून आयुर्वेदानें मानवी जीवन, उत्पत्ति व स्थिति याविषयीं कसकशी उपपत्ति लावलेली आहे हें पाहूं.

जीवानें केलेल्या पूर्वकर्माप्रमाणें सुखदुःख भोगण्याचें शरीर हें साधन आहे. उत्पन्न होणें, असणें, वाढणें, परिणाम पावणें, झिजूं लागणें व नाश पावणें असे शरिराला सहा विकार होतात. ह्या शरिराचे दोन भाग कल्पलेले आहेत. सूक्ष्म शरीर व स्थूलशरीर. डोळ्यानें दिसतें तें स्थूल शरीर. ह्या स्थूल शरीरामध्यें सुखदुःख भोगण्याकरितां जीव लिंगशरीराबरोबर ( सूक्ष्मशरीर ) प्रवेश करितो, पंच ज्ञानेंद्रियें, पंच कर्मेंद्रियें, पंचप्राण, मन व बुद्धी ह्याला सूक्ष्मशरीर अगर लिंग देह म्हणतात.

इच्छा, द्वेष, सुख, दुःख, प्रयत्न, चेतना, धैर्य, बुद्धि, स्मरण, अहंकार, हीं जीवाचीं ( life ) लक्षणें आहेत. प्राणि जिवंत असतांना हीं लक्षणें अनुभवास येतात. स्थूलशरिरास अन्नमय कोश म्हणतात. अन्नानें तें वाढतें व अन्न कमी झाल्यास क्षीण होतें.

प्राण, अपान, व्यान, उदान, समान ह्यांस पंचप्राण म्हणतात.

वाणी, हात, पाय, जननेंद्रिय, गुद हीं पांच कर्मेंद्रियें होत.

पंचप्राण व पंचकर्मेंद्रियें ह्यांच्या योगानें शरिरांतील सर्व क्रिया चालू असतात. हात पाय, हें त्या त्या इंद्रियांच्या चलनशक्तीचें बोधक आहे. पंचप्राण व पंचकर्मेंद्रियें यांस प्राणकोश म्हणतात. कान, त्वचा, डोळा, जिव्हा व नाक हीं पांच ज्ञानेंद्रियें त्या त्या इंद्रियांचे बोधक आहेत. उदाहरणार्थ, कानानें ऐकूं येणें याचें कान हें अधिष्ठान आहे. अधिष्ठानांहून इंद्रिय भिन्न असतें. हीं ज्ञानेंद्रियें व मन मिळून इच्छाशक्ति ( will-power ) होते. हीं ज्ञानेंद्रियें व बुद्धि मिळून ज्ञानशक्ति होते. (psychic power)

पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश हीं पंचमहाभूतें ( Elements ) होत. ह्या पंचमहाभूतात्मक शरिरांत राहणारा जीव त्याला पुरुष अगर स्त्री म्हणावें.

चरकानी खालीलप्रमाणें प्रत्येक महाभूतांचे कोणते अवयव व कोणतें इंद्रिय शरिरांत आहे हें दाखविलें आहे.

अवयवः—(organs) नखें, हाडें, दांत, मांस, कातडें, मळ, केश, लोम, स्नायू, वगैरे स्थूल, स्थिर, मूर्तिमान, जड, खर कठीण हीं सर्व पृथ्वीतत्त्वांचीं आहेत. गंध, घ्राण हें पृथ्वीचा अनुक्रमें गुण व इंद्रिय आहे.

रस, रक्त, वसा, कफ, पित्त, मूत्र, स्वेद, जें जें पातळ, मंद, स्निग्ध, मऊ, बुळबुळित हीं सर्व जलतत्त्वांचीं आहेत. जलाचा रस हा गुण व जिव्हा हें इंद्रिय होय.

पित्त शरिरांतील उष्मा व कांति-हीं सर्व तेजतत्त्वांचीं आहेत. रूप हा गुण व नेत्र हें इंद्रिय होय.

श्वासोश्वास करणें, सोडणें, डोळयांची उघडझांक, आकुंचन, प्रसरण, जाणें येणें, प्रेरणा, धारणादि सर्व कार्यें ही वायुतत्त्वांचीं आहेत. स्पर्श हा गुण व त्वचा हे इंद्रिय होय.

जें, जें पोकळ, मोठीं, व सूक्ष्म स्त्रोतसें हीं सर्व आकाशतत्त्वांचीं आहेत. शब्द हा गुण व श्रोत्र हें इंद्रिय होय.

पृथ्वी देहधारण करते, जल क्लेदन करतें, तेज पचन करतें, वायु गमनादि क्रिया करतो व पोकळी आकाशापासून मिळते.

## आजच्या स्त्रियांचें आरोग्य

शरिरांतील रुक्षता वायु पासून, लघुपणा आकाशापासून, कांति, उष्णता, व पाक तेजांपासून, शीतपणा जलांपासून व जडपणा पृथ्वीपासून प्राप्त होतें. प्रकृति तीन प्रकारच्या आहेत. सात्त्विक, राजस व तामस.

परलोकां विषयीं आस्तिक्य बुद्धी, शारिरीक व मानसिक शुचिर्भूतपणा, सद्धर्मांची इच्छा, शौर्य, गंभीरपणा, बुद्धी, कृतज्ञता हे गुण सात्विक प्रकृतिमध्यें आढळतात.

अभिमान, पुष्कळ बोलणें, क्रोध, ढोंग, मत्सर, शौर्य, हर्ष वगैरे गुण राजस प्रकृतिमध्यें आढळतात.

भीति, अज्ञान, निद्रा, प्रमाद, मोह. हे गुण तामस प्रकृतिमध्यें आढळतात. ह्या पंच महाभूतांचा आपल्या शरिरांवर कसा परिणाम होतो तो पहा. हवेमध्यें जलतत्त्व वाढलें म्हणजे अशक्त मनुष्यांला थंडीपासून विकार होऊं लागतात, भूक कमी होते, व हातापायांना सुस्ती येते. हवेमध्यें उष्णता वाढली म्हणजे तहान लागते, जिव्हेला कोरड पडते, रक्तामध्यें बदल होऊन ताप येऊं लागतो तर कोणाला नाकांतून रक्त पडतें किंवा शौचाच्या वाटे रक्त पडतें. हिंवाळयामध्यें हवा रुक्ष असून शीत असते. त्यामुळें कातडी रुक्ष होते, अंगांतून, पायांतून कळा लागूं लागतात, ह्यांवरून, वायु, व तेज ह्यांचीं कार्यें अनुभवास येतात. व ह्यांनाच पर्यायानें वात, पित्त व कफ अशीं नांवें आहेत. हवेंतील वायुमध्यें रुक्षतत्व गुण वाढले म्हणजे शरिरांतील वायु तत्त्वांवर परिणाम होतो. जलतत्त्वांमध्यें फरक झाल्यास शरिरांतील जलतत्त्वांवर कार्य होतें. वात, पित्त, कफ—हीं जरी इंद्रियांस प्रत्यक्ष गोचर नाहींत तरी हवेंतील वायु, तेज, जल यांच्या प्रमाणांत जसा बदल होतो त्याचप्रमाणें शरिरांतील वायु, तेज, जल ह्या तत्त्वांमध्यें फरक होतो. हें ज्ञान प्रत्यक्ष अनुभवास येतें. मुख्यतः वायु हा हाडांमध्यें आहे, पित्त हें रक्त व स्वेद ह्यांमध्यें आहे व कफ सर्व धातुमध्यें आहे, बाह्य कारणांनीं अगर खाण्यापिण्याच्या गुणधर्मांत फरक झाल्यानें शरिराच्या घटकावयवामध्यें फरक होऊन जीवनशक्तीवर परिणाम होतो. ह्या शरिरास धारण करणारे वात, पित्त, कफ याच्यापैकीं ज्यावर प्रथम परिणाम होतो तो पहिल्यानें बिघडून दुसऱ्यास बिघडवतो म्हणून वाग्भटांनीं "**रोगस्तु दोषं वैषम्यं**" असें म्हटलें आहे. व 'आरोग्याचें लक्षण दोष साम्य असें म्हटलें आहे. साधारण व्यव-

हारांत आपण पाहिलें असतां एखाद्याला उन्हाळा मानवतो व एकाद्यास पावसाळा त्रास देतो, तर एखाद्याची प्रकृती थंडीमध्यें सुधारते—यांवरून वात, पित्त, कफ हे दोष अगर धातू समस्थितींत असतील तर त्या स्थितीस आरोग्य व त्यांच्यांमध्यें कमीजास्तपणा झाला तर ती रुग्णस्थिति होय. वात हे पांच प्रकारचे आहेत. प्राण, अपान, व्यान, उदान व समान.

आपल्या शरिरास कारणीभूत होऊन शरिरांत वास्तव्य करणाऱ्या त्रिधातु–अथवा त्रिदोष यांबद्दल आतां विचार करूं.

वात–पित्त–कफ हे धातु आहेत. या तिघांत वात हा बलवान व श्रेष्ठ आहे. यांच्या अंगीं शरिरांतील रस रक्तादि सप्त धातूंना दूषित करण्याची शक्ति असल्यामुळें आयुर्वेदानें त्यांना दोष ही संज्ञा दिलेली आहे. जसें वातदोष, पित्तदोष, हे धातु अयोग्य अथवा अनुचित स्थितीनें आहार (अन्नपानादि) विहार. (शारीरीक श्रम, स्त्रीसंगातिरेक वगैरे) केल्यामुळें प्रथम शरिरांतील पोषकरसाला दूषित करतात; त्यामुळें जठराग्नि असावा तसा न राहतां विकारयुक्त होऊन त्याची उष्णता बाहेर येते.

हे वर दर्शविलेले त्रिदोष–म्हणजे वात, पित्त, कफ हे शरिरांत कसकसे असतात व त्यामुळें कसकशा घडामोडी चालतात याचा विचार करूं.

वायु हा एकच आहे; परंतु शरिरांतील अवयव निरनिराळे असल्यामुळें त्या त्या अवयवांच्याहि ठिकाणीं असणाऱ्या वायूस स्थानपरत्वें निरनिराळीं नांवें पडलेलीं आहेत. "**प्राणो पानः समानश्चोदानव्यानौ च वायवः**" प्राण, अपान, समान, उदान आणि व्यान, अशीं एकाच वायूचीं स्थानभिन्नत्वामुळें निरनिराळीं, नांवें असून त्यांचीं स्थानें—" **हृदिप्राणो गुदेपानः समानो नाभिमंडले। उदानः कंठ देशेस्याद्यानः सर्व शरीरगः॥** " वायु एकच पण जो हृदयांत असतो त्यास प्राणवायु, गुदस्थानांत (मलाशयांत) असतो त्यास अपानवायु, नाभीच्या ठिकाणीं असणारा समान वायु, कंठाच्या भागांत असणारा उदानवायु व सर्व शरीर व्यापून असणारा तो व्यान वायु अशीं एकाच वायूला स्थानपरत्वें निरनिराळीं नांवें पडलेलीं आहेत. या वायुदोषाप्रमाणेंच पित्ताचींहि स्थानपरत्वें निरनिराळीं नांवें आहेत. पित्त स्वभावतःच अग्निरूप आहे. त्याचें पहिलें स्थान छातीच्या खालील भाग. तेथें सेवन केलेल्या आहारास पचविण्याचें काम होतें त्यास पाचक

पित्त असें नांव आहे. दुसरें स्थान प्लीहा व यकृत् यांत राहून पचन झालेल्या पदार्थांपासून उत्पन्न झालेला जो रस त्यापासून रक्त उत्पन्न करतें. यास पोषक पित्त म्हणतात. तें स्वतः तेजरूपानें त्यांत मिश्र होऊन शरिरास सतेजपणा दाखवितें म्हणून त्यास रंजक पित्त म्हणतात. हें त्याचें तिसरें स्थान होय. पित्ताच्या अंगीं तेजाचा गूण आहे दोन्ही डोळयांमध्यें तेजरूपानें पित्त आहे म्हणून डोळयांत द्रष्टेपणा आहे. हें चौथें स्थान होय. हृदयाचे ठिकाणीं जें पित्त आहे त्यानेंच इच्छा, बुद्धि, हे गूण उत्पन्न होतात. त्याला साधकपित्त अशी संज्ञा आहे. याप्रमाणें स्थानानुसार पित्ताचे पांच भाग व नावें आहेत. कफ पांच प्रकारचा आहे. क्लेदन, अवलंबन, रसन, स्नेहन, श्लेषक हीं पांच स्थानभेदानुरूप कफांचीं नांवें आहेत.

स्थानें:—आमांशयांत क्लेदनकफ, हृदयांमध्यें अवलंबन, मज्ज्यामध्यें रसन, डोक्यांमध्यें स्नेहन व सर्व सांध्यातून श्लेषक कफ आहे. हे दोष सर्व शरीरव्यापी असले तथापि हृदय व नाभि यांचे खालीं वात, हृदय व नाभि यांच्या मध्यभागीं पित्त, आणि हृदय व नाभि यांच्या वर कफ अशीं त्यांचीं निश्चित स्थानें आहेत.

धातू:—रस, रक्त, मज्जा, मांस, मेद, अस्थि, शुक्र–हे देहांचें धारण करितात.

धातूंचीं कर्में:—धातूंची झीज भरून काढणें, जीवनपरिमाणु उत्पन्न करून शरीर जगविणें, इंद्रियांना कमजास्ती लागणारीं द्रव्यें पुरवणें, शरीर धारण करणें, हाडें बळकट लागणें, व प्रजोत्पादन करणें हीं कामें धातूंचीं आहेत. ( **धारणात् धातवः** ).

हे तीन्ही दोष—वात—पित्त—कफ तमोगुण, सत्त्वगुण व राजसगुणात्मक आहेत. जसे गुण मूळांत एक रूपांतच उत्पन्न होऊन त्यांतच लीन होतात तसे हे दोष सुद्धां मूळस्थितींत एकरूपच आहेत; परंतु कार्यकारण भावानें पृथक् वाढतात. या तिघांच्या योगानेंच शरीर चालूं राहतें. यांतील एक नष्ट झाला कीं, दुसरे दोघे सुद्धां नाहींसे होतात. व शरीर अचेतन होतें. वायूपासून अग्नि, अग्निपासून पाणी व पाणी आणि अग्नि यांच्या मिश्रणधर्मांत कफाची जडस्थिती. यावरून साधारण स्थूलदृष्टया पाहिलें तर हे एक रूपच आहेत असें म्हणावें लागतें. तसें नसतें तर एक वायु नष्ट झाला कीं, उष्णता आणि रस व रक्ताचा तेजधर्म हे एकदम नष्ट कां व्हावेत ?

वरील माहितीवरून या त्रिदोषाचें महत्त्व व त्यांचे आधिभौतिक महाभूतांशीं व तदनुषंगानें आपल्या जीवनांशीं—पार्थिवदेहाशीं कसकसे संबंध आहेत हें समजून येईल.

आतां या त्रिदोषांच्या कालसंबंधींचा विचार करूं.

सकाळीं ६ ते १० वाजेपर्यंत कफ

दुपारीं १० ते २ ,, पित्त

सायंकाळीं २ ते ६ ,, वायू

दिवसाचा अस्तमान वेळ व रात्रींचा आरंभ या काळाला संध्या समय म्हणतात. हा काल वातकफात्मक असतो. वेळ १ ते १॥ तास.

मध्यान्ह काळ म्हणजे रात्र अखेर व दिवस ( पहांटेची वेळ ) हा काळ वातकफात्मक असतो.

रात्रीं ७ ते १० वाजेपर्यंत कफ

मध्यरात्र १० ते २ वाजेपर्यंत पित्त

उतरतीरात्र २ ते ५ वाजेपर्यंत वायू

भुक्तकाल दोन आहेत. दुपारीं जेवल्याबरोबर जेवणानंतर अर्धातास कफकाल.
,, जेवल्यानंतर १ तासानें पित्तकाल
,, पुढील काल वात काल

वयाचा आदिकाल म्हणजे बाल्यावस्था १ ते २० वर्षांपर्यंत कफकाल ( बाल )
,, मध्यकाल ,, २० ते ४० वर्षांपर्यंत पित्त काल ( तरुण )
,, अंतकाल ,, वृद्धावस्था ४० वर्षांनंतर वात काल ( वृद्ध )

वात-पित्त-कफ हीं तत्त्वें रोजच्या व्यवहारांत केव्हां व कसकशीं असतात हें वरील वर्णनांवरून समजून येईल. आयुर्वेदानें वात कमी अगर जास्ती झाला असतां काय लक्षणें होतात, त्याचप्रमाणें पित्त व कफ हीं कमी जास्त होतांना काय लक्षणें होतात, शिवाय वात प्रकृति, पित्त प्रकृति, कफ प्रकृति यांचीं लक्षणें, देशकाल ऋतु यांमध्यें कोणत्या तत्त्वांचें प्राधान्य आहे, या सर्वांचा विचार करून रोग्यांचा आजार जाणतां येतो. याच्या बरोबर पाश्चात्त्य वैद्यकांच्या इंद्रियविज्ञान शास्त्रांची माहिती असेल तर निदान चिकित्सा करण्याला मदत होते.

वायूचे पांच प्रकार आहेत.

प्राण, अपान, व्यान, उदान व समान.

कडू, तुरट, तिखट हे रस वायु वाढवतात.

मधूर, आंबट, खारट हे रस वायु कमी करतात.

पित्ताचे पांच प्रकार आहेत.

पाचक, रंजक, साधक, भ्राजक, आलोचक.

आंबट, खारट, तिखट हे पदार्थ पित्त वाढवतात.

तुरट, कडू, मधूर हे रस पित्त कमी करतात.

कफ पांच प्रकारचा आहे.

क्लेदक, बोधक, तर्पक, श्लेष्मक, अवलंबक.

कडू, तुरट, तिखट हे रस कफ कमी करतात.

मधूर, आंबट, खारट हे कफ वाढवतात.

दोषांचें प्राबल्यः—आषाढ, श्रावण, भाद्रपद, मार्गशीर्ष, पौष, माघ ह्या महिन्यांत वातदोषांचें प्राबल्य असतें. वैशाख, जेष्ठ, आश्विन, कार्तिक ह्या महिन्यांत पित्ताचें प्राबल्य असतें. चैत्र व फाल्गुन ह्या महिन्यांत कफांचें प्राबल्य असतें.

देशः—देश तीन प्रकारचे आहेत. जांगल, अनूप व साधारण.

जांगल देशः—डोंगर व झाडी फार असणें, पाऊस थोडा पडणें अशा देशांत रोग कमी असतात. ह्या देशांत वाततत्त्वाचें प्राबल्य आढळतें.

अनूप देशः—झाडी व डोंगर फार असून पाऊसहि पुष्कळ पडतो त्याला अनूप देश म्हणतात. ह्या देशांत वात–कफविकार होतात.

साधारण देशः—सर्व कांहीं समप्रमाणांत असतें त्याला साधारण देश म्हणतात. या देशांत हे तीन्ही दोष सम प्रमाणांत असतात.

वातप्रकोपाचीं कारणें:—मलमूत्रादिकांचे वेग धारण करणें, जेवणांवर जेवणें, रात्रीं जागरण, फार मोठ्यानें भाषण करणें, अति व्यायाम, गाडीचा प्रवास, तिखट, कडू, रुक्ष, तुरट, पदार्थ अति सेवन करणें, काळजी, मैथून, भिती, उपास, थंड उपचार, शेक यांमुळें वाताचा प्रकोप होतो.

पित्ताचा प्रकोपः—तिखट, आंबट, मध्य, खारट, उष्ण, घशांशीं जळजळणारे पदार्थ, मोहरी, राग, अतिशय ऊन शेक घेणें, भीति, अति श्रम, सुकलेल्या भाज्यांचें अति सेवन, क्षारादिक पदार्थ खाणें, विरुद्ध भोजन, अजीर्ण होईपर्यंत खाणें—हें पित्त वाढवतात.

कफाचा प्रकोपः—दिवसा झोंप घेणें, मधूर व थंड पदार्थ खाणें, मासे, मांस, जड, आंबट, बुळबुळित, तीळ, ऊंस, दूध, स्निग्ध पदार्थ यांचें अति सेवन, अतिशय जेवणें, खारट पदार्थ, पाणी अतिशय पिणें, यामुळें कफ प्रकोप होतो.

वातदोषांचें कार्यः—अंग कठीण, अंग आखडणें, टोंचल्यासारखी पीडा होणें, ठणका. अंगावर काळसरपणा व कळा लागणें, चलनवलन न होणें, स्पर्श न समजणें, अंग गार–खरखरीत होणें, शोष असणें, हीं कार्यें होत.

पित्तदोषांचें कार्यः—आयासांवाचून श्रम, घाम फार येणें, घशाशीं जळजळणें, अंग लाल होणें, दुर्गंधी, ओलसर, पुटुकळ्या येणें, गांधी उठणें, बडबड, घेरी, अंगाचीं आग हीं कार्यें होत.

कफदोषांचें कार्यः—आंगाला पांढरेपणा, अंग थंड, जड, कडु असणें, तेल ाळल्यासारखें वाटणें, ओलसरपणा, सूज, सुस्ती हीं कफाचीं कार्यें आहेत.

वातदोष कमी कसा करावाः—स्निग्ध, उष्ण, जड, धातुवर्धक, गोड, आंबट, खारट, असे पदार्थ तेल–पेयांत घेणें, अंगांला तेल लावून अभ्यंग स्नान करणें, बस्ती घेणें ( enema ) मांस व मद्य यांचें सेवन, अंग रगडणें, अंगांला उटी लावणें, नाकांत औषध घालणें, झोंप घेणें, पोटीस बांधणें, यामुळें वात दोष कमी होतो.

पित्तदोष कमी कसा करावाः—कडू, गोड, तुरट, गार वारा घेणें, सावली, रात्रींची वेळ, एकांतवास, चांदण्यांत बसणें, फुलें धारण करणें, स्त्रियांचा सहवास, दूध व तूप ह्यांचें सेवन, रेचक, जुलाब, रक्त काढणें, थंडलेप करणें.

कफदोष कमी कसा करावाः—रुक्ष, खारट, तुरट, कडू, तिखट, व्यायाम, ओकारी, मैथून, प्रवास, कुस्ती, जागरण, अंग रगडून घेणें, धूम्रपान, शेकणें, नस्य, घाम काढणें, अंगांला सुखकर असे लेप लावणें. थोडक्यांत असें म्हणतां येईल कीं, कफाला तीक्ष्ण उपचार करावेत, स्निग्ध उपायांनीं वायूला ताब्यांत ठेवावें, व पित्ताला मधूर व थंड असे उपचार करावेत.

वातप्रकृतिः—धैर्यहीन, दृढ मैत्री न करणारा, कृतघ्न, कृश, शिरा बारीक असणें, मन अस्थिर, निजला असतां स्वप्नांत आपण आकाशांत भ्रमण करतों आहोंत असें पहाणें, चंचल बुद्धी, धन संचय व रत्नें यांचा अल्प संचय, मित्र नसणें, असंबद्ध भाषण करणारा असा वात प्रकृतीचा समजावा.

पित्तप्रकृतिः—बुद्धिमान, कुशल, धीट, पराक्रमी, स्वप्नामध्यें सोनें, पळस, वड यांचीं झाडें, वीज, अग्नि, तारे यांना पहाणारा, नम्र न होणारा, उद्धटांशीं कठोरपणानें वागणारा व नम्र माणसांशीं शांतपणें वागणारा, मुख रोगानें युक्त, पित्त प्रकृतीचा समजावा.

कफप्रकृतिः—डोळे पांढरे, केंस भुंग्यासारखे काळे, श्रीमान, मृदु अंग, मेघ व सिंह यांच्यासारखा गंभीर भाषण करणारा, निजला असतां झोंपेंत कावळे, हंस पक्षी, सुंदर जलाशय पहाणारा, डोळ्यांचे कोंपरे आरक्तवर्ण असणारा, स्निग्ध कांतीचा, सत्त्व गुणी, कष्ट सहन न करणारा, गुरु—वडील माणसें ह्यांना पूज्य मानणारा—कफ प्रकृतीचा समजावा.

ह्या स्थूलदृष्टया प्रकृति दिलेल्या आहेत. कांहीं व्यक्तिमध्यें दोन्हीं दोषांचीं लक्षणें आढळूं शकतील. परंतु त्यांवरून आपली प्रकृती कोणत्या प्रकारची आहे, स्वतःला काय विकार होण्याचा संभव आहे हें वरील विवरणावरून जाणतां येईल.

पाश्चात्त्य वैद्यकांत पचन क्रिया, मज्जतंतू, यकृत्, हृदय, प्लीहा वगैरे इंद्रियांचीं कार्यें सविस्तरपणें सांगितलेली आहेत. ( Physiology ) परंतु हीं कार्यें कोणाकडून केलीं जातात त्या अदृश्य शक्तीचा शोध अद्याप लागलेला नाहीं. शास्त्रज्ञांचे या बाबतींत प्रयोग चालू आहेत. आयुर्वेदाचा पाया त्रिदोष आहे. हीं वात, पित्त कफ, त्रयीं इंद्रिय विषयक व्यापार जोंपर्यंत सुरळीत चालवीत आहे तोंपर्यंत त्यांना धातू ही संज्ञा आहे. कारण ह्याच्यावरच शरीर अवलंबून आहे. शरीर आजारी पडतें त्यावेळीं त्यांना दोष ही संज्ञा आहे. पाश्चात्त्यांच्या इंद्रियविज्ञान शास्त्राच्या दृष्टीनें वात तत्त्वांची नैसर्गिक स्थितींतील कार्यें मेंदु, मज्जातंतू, पृष्ठवंशरज्जु, ( Nervous system ) यांच्याशीं कांहीं बाबतींत जुळतात, तर पित्ततत्त्वांचीं कार्यें अन्नपचन क्रियेशीं ( Digestive System ) जुळतात परंतु कफ तत्वांची श्वासोश्वास क्रियेशी ( Respiratory System ) जुळतात व त्याच्यापेक्षांही ह्या तत्त्वांचें कार्य महत्त्वाचें आहे. इंग्रजी शिक्षणांमुळें, आमची दृष्टी तुलनात्मक झाल्यामुळें पाश्चात्त्य वैद्यकांच्या कसोटीला आमचा आयुर्वेद तंतोतंत जुळत नाहीं तें आपल्या शास्त्रांतील झूट आहे अशी आमची मनोभावना झालेली आहे. खरें पाहिलें असतां जेथें **परस्परांच्या वैद्यकांत पूर्व पश्चिमेइतकें अंतर आहे तेथें तुलनात्मक दृष्टीनें विचार करणें ही मुळांतच चूक आहे.**

परंतु त्याच्याबरोबर एवढें सांगतां येईल कीं, पाश्चात्त्य वैद्यकामुळें आमच्या आयुर्वेदीय कांहीं सूत्रांचा बोध सुलभ केलेला आहे. ज्ञान ही वस्तु कोणाकडूनही घेण्यास हरकत नाहीं असें आपल्या वाग्भटांनीं म्हटलेलें आहे. त्याचवेळेला आपलीं स्वतःचीं तत्त्वें न विसरतां इतर शास्त्रांतील नवीन शोध, प्रमेयें हीं आत्मसात करून त्यांचा आपलें शास्त्र वाढविण्याकडे उपयोग केला पाहिजे. या पुस्तकांमध्यें या त्रिदोष थिअरीची जरूरी नव्हती व ती न दिल्यास भागणारेंहि होतें, परंतु आयुर्वेदाकडे आपुलकीच्या भावनेनें जनतेनें व व्यवसायबंधुंनीं पहावें व त्यांच्या मनांत जिज्ञासा उत्पन्न व्हावी या सद्धेतुनेंच हें प्रकरण जोडण्यांत आलेलें आहे.

वर दिलेल्या वर्णनांवरून आयुर्वेदाची शारीरिक कल्पना कोणती आहे हें सुज्ञांच्या ध्यानांत येईल. आज ज्या निरनिराळ्या पॅथी ( पद्धति ) दिसत आहेत उदाहरणार्थ, मानसिक उपचार, जलोपचार, विजेचे उपचार, मातीचे उपचार, ह्या सर्वांचा बारकाईनें विचार करूं लागलें असतां असें आढळून येतें कीं, ह्या शास्त्रज्ञांनीं अंतर्भूत असलेलीं पंचमहाभूतात्मक तत्त्वें, स्वतंत्रपणें एक एक घेऊन त्यावर स्वतंत्र शास्त्रें रचलेलीं आहेत, व ह्यामुळें सर्वच विकार त्यांच्या शास्त्रांनीं बरे होऊं शकत नाहींत. या सर्वांचा आयुर्वेदानें सूक्ष्म विचार केल्यामुळें कोणत्याही नव्या शोधाचा अंतर्भाव ह्या त्रिदोष थिअरीमध्यें होऊं शकतो. आपले ग्रंथ सूत्रमय असल्यामुळें त्याचा अर्थ ताबडतोब ध्यानांत येत नाहीं व त्यामुळें चुकीची समजूत होते. आयुर्वेदाचे ग्रंथ आमच्या व्यवसाय बंधूंनीं पहावे—त्यांना इच्छा व्हावी या हेतूनेंच थोडक्यांत महत्त्वाचें तेवढें वर्णन दिलेलें आहे. त्यावरून पौर्वात्त्य व पाश्चात्त्य वैद्यकांची रोगपरीक्षा व चिकित्सा किती भिन्न आहे व त्रिदोषाची थिअरी रोजच्या व्यवहारांत कशी अनुभवास येतें तें कळून येणार आहे.

---

# प्रकरण ७ वें

## स्त्रीरोगांवरील अनुभविक औषधें

आयुर्वेद व आंग्ल वैद्यक यांचा चिकित्सेच्या दृष्टीनें मोठा फरक आहे. परस्परांच्या इंद्रिय विज्ञान पद्धतीमध्यें पूर्वपश्चिम इतकें अंतर आहे, हा विषय शास्त्रीय असल्यामुळें, तो समजण्याकरितां एखादें उदाहरण देऊन त्याचें स्पष्टीकरण खालीं केलेलें आहे. उदाहरणार्थः—मलेरियाचा ताप—हा ताप थंडीभरून येतो, व घाम येऊन निघतो, क्विनाइन सारखें औषध या तापांवर वस्ताद असल्याचें प्रत्येकाला माहिती आहे, परंतु हें क्विनाइन कोणाचा ताप वाढवतें, कोणाचा ताप कमी करतें, तर कोणावर त्याचा परिणाम होत नाहीं. क्विनाइन हें गुणकारक होण्याकरितां अशा प्रसंगीं निरनिराळ्या अनुपानांतून घ्यावें लागतें. याचें कारण आंग्ल वैद्यक दृष्ट्या प्रकृति वैचित्र्य म्हणतां येईल; परंतु आयुर्वेदाच्या भाषेंत वात पित्त, कफ या त्रयींचीं जीं लक्षणें दिलेलीं आहेत त्यांवरून ठरवतां येऊन चिकित्साहि समाधानकारक होऊं शकते. छातीमध्यें कफ झाला असतां कफ पडण्याचें औषध अगर कफ पातळ होण्याकरितां डॉक्टर लोक औषध देतात, परंतु या कफाबरोबर या त्रिदोष त्रयींपैकीं कोणता दोष कमी जास्ती आहे हें पाहून त्याप्रमाणें औषधांचें अनुपान बदललें असतां रोग्यांचा फायदा होतो व शिवाय जोपर्यंत हे तीन्हि दोष ( त्रिदोष ) वाढलेले नाहींत तोंपर्यंत रोगी जरी वरून असाध्य दिसत असला तरी वांचण्याची पुष्कळ आशा असते. शरीरामधील नलिका विरहीत ग्रंथीचें (Ductless Glands) महत्त्व शास्त्रज्ञांना अलीकडे कळूं लागलें आहे, व त्यावरून लवकरच त्रिदोष पद्धतीचें महत्त्व डॉक्टर वर्गाला कळून येईल अशी आशा बाळगण्यास हरकत नाहीं. वात, पित्त कफाचें नैसर्गिक कार्य, व रोगी स्थितींतील त्यांचें कार्य याचें बारकाईनें निरीक्षण केलें असतां प्रत्येकाच्या अनुभवांस येतें. हवेमध्यें सर्दपणा वाढला म्हणजे शरीरांतील कफतत्त्व वाढून सर्दी, खोकला सुरू होतात. उन्हाळा सुरू झाला म्हणजे पित्ततत्त्व वाढून शरिरांतील उष्णता वाढते, हवा रुक्ष झाली म्हणजे वाततत्त्व वाढून मलावरोध, हातापायांना मुंग्या येणें असे विकार होऊं लागतात. फार काय ही त्रयी रोजच्या दिनचर्येवर आंखलेली असल्यामुळें एखादा रोगी अमुक वेळीं—अमुक तत्त्व असतां आजारी पडला म्हणजे त्या तत्त्वांचीं लक्षणें जाणवूं लागतात. त्रिदोष प्रत्यक्ष दाखवितां आले नाहींत तरी त्यांच्या अनु-

भवावरून त्याचें आस्तित्व सिद्ध होतें व आयुर्वेदाचें श्रेष्ठत्व समजून येतें. पाश्चात्त्य इंद्रिय विज्ञान शास्त्रांचें ज्ञान नसतांनासुद्धां सुज्ञ वैद्य या त्रिदोष पद्धतीवर रोगी बरे करूं शकतात. याकरितां डॉक्टर वर्गानें रोगांची परीक्षा निश्चित होण्याकरितां या पद्धतीचें ज्ञान करून घेणें महत्त्वाचें व आवश्यक आहे.

स्त्रियांच्या निरनिराळ्या विकारांवरील खालीं दर्शविलेलीं औषधें वरील तत्त्वां-प्रमाणें विचार करून आयुर्वेदीय ग्रंथकारांनीं त्यांचे पाठ सांगितले आहेत व या औषधांची योजना करतेवेळीं उपरोक्त विवेचन लक्षांत घेऊन त्यांची योजना व्हावयाची असल्यामुळें मुद्दाम त्याबद्दलचे दोन शब्द नमूद केले आहेत. उपरोक्त विवेचनांत दर्शविल्याप्रमाणें विचार करून त्या त्या औषधाची योजना झाल्यास त्यांचा खात्रीशीर फायदा झाल्यावांचून राहणार नाहीं. शिवाय विकाराचें चिन्ह पाहून व त्याबद्दल खात्री करून घेऊन जरी यापैकीं जरूर तीं औषधें उपयोगिलीं तरीहि त्याचा हितावह परिणाम मिळाल्याशिवाय राहणार नाहीं.

स्त्रियांना जे निरनिराळ्या वेळीं निरनिराळे विकार होतात त्यावर कोणत्या प्रसंगीं कोणती औषधयोजना करावी, कोणतें औषध कोणत्या प्रसंगीं कोणता फायदा देतें हें खालीं औषधांची सविस्तर माहिती देण्यांत येत आहे त्यावरून समजून येईल. हल्लींचा काळ प्रत्येकास घरच्या घरीं औषध तयार करून घेण्यास गैर-सोईचा, त्रासाचा, व कंटाळवाणा असा असल्यामुळें प्रत्येकाच्या मनाची प्रवृत्ति आयतें तयार औषध घेण्याकडेच विशेष असते. यामुळें हरघडीं उपयोगी पडणाऱ्या अशा निवडक औषधांची सविस्तर माहिती देण्यांत येत आहे.

महारास्नाकाढाः—( गुग्गुळ युक्त ) हा काढा वातहारक, सारक असून स्त्रियांच्या जननेंद्रियांवर कार्य करणारा आहे. महिन्याची पाळी बरोबर येत नसेल, १५-२० दिवस अगर याहिपेक्षां जास्त दिवस जात असतील, अशा स्थितींत हा काढा सतत २ महिने घेतल्यास, स्त्रीअंड, व गर्भाशय शुद्ध होऊन पाळी नियमीत येऊं लागते. अंग स्थूल, शरिराचा बोजडपणा यांवर यानें वजन कमी होऊन अंगांतील चरबी कमी होते. कमर दुखणें, पायांत कळा येणें-फुटणें, मलावरोध, पोट फुगणें, यांवर सतत ८–१५ दिवस घेतला असतां कार्य होतें. नेहमींचें प्रमाण ४ टीस्पून, शौचाला साफ होत नसल्यास तेवढेंच त्यांत एरंडेल घालून घ्यावें.

गर्भिणीज्वर काढाः—गरोदरपणांत, मलेरियासारखा ताप, अगर नुसतेंच कधीं कधीं अंग गरम होणें, अशा वेळीं हा काढा चालू ठेवणें, गर्भाला व गर्भिणीला हितकारक आहे. यामधील औषधी द्रव्यें, गर्भ व गर्भिणी यांचें रक्षण करून ज्वरादि विकार कमी करतात.

ग. श्वासावर काढाः—गरोदरपणांत सर्दी, वारा, थंड पाण्यांत काम केल्यामुळें खोकला होऊं लागतो. गर्भाशयाच्या वाढीमुळें छातीवर दाब पडून दमा लागतो, श्वास कोंडल्यासारखें वाटतें, व अशा स्थितींत कफ पातळ होऊन गर्भाला इजा न होतां औषधाची निवड करणें अगर घेणें कठिण असतें. अशा स्थितींत हा काढा प्रथमोचार म्हणून घेण्यास हरकत नाहीं.

दशमूल काढाः—ह्या काढयांचा उपयोग स्त्रियांच्या बऱ्याच विकारांवर होत असतो. ताप, खोकला, आंतड्यांची सूज यांवर याचा चांगला उपयोग होतो. ह्याचा विशेष उपयोग बाळंतपणांत येणाऱ्या सूतिकाज्वरांवर करतात. पित्त प्रकृतीच्या माणसांना हा काढा उष्ण पडतो म्हणून त्यांनीं प्रत्येक भागांत १ चमचा तूप घालून घ्यावें. आंत्रिक सन्निपातावर आरंभापासून दिल्यास खोकला, अतिसार वगैरे उपद्रव होत नाहींत. सर्वांगांत कळा, पायांला मुंग्या येणें यांवर सकाळीं सायंकाळीं चार चार टीस्पून घेतला असतां फायदा होतो.

बाळंत काढा नं. १:—प्रसूति झाल्यानंतर तिसऱ्या दिवसापासून सुरूं करावा. ह्याचा उपयोग अर्गट मिश्चर प्रमाणें होतो. दूध सुटणें, ताप कमी करणें, गर्भाशयांचे संकोचन करणें, स्राव फार होत असल्यास तो कमी करणें, असे याचे गूण असून हा जंतुघ्न असल्यामुळें स्रावाची घाण नाहींशी करतो. ह्या काढ्यानें भूक चांगली लागते, व इतर उपद्रव होत नाहींत. या काढ्यांमध्यें सारक औषधें असल्यामुळें शौचालाहि साफ होतें.

बाळंत काढा नं. २:—ह्याचा उपयोग दहा दिवसांनंतर करावयाचा असतो. गर्भाशयाला ताकद देऊन तो मूळस्थितींवर आणणें, रक्त व ताकद वाढवणें, थंडी पासून होणारे उपद्रव कमी करणें, बाळंतिणीची प्रकृति बाळंत रोगांवर जाऊं न देणें. ह्या करितां १ महिनापर्यंत हा काढा चालूं ठेवावा. हा काढा उष्ण वाटल्यास प्रत्येक भागांत तूप घालून घ्यावा.

लशुनासवः—स्थूल प्रकृतींत चरबी कमी करण्याकडे याचा चांगला उपयोग

होतो. सर्वांगांत मुंग्या येणें, अपस्मार, हिस्टेरीया, छातींत कळा लागणें, मलावरोध, अग्निमांद्य यांवर दिवसांतून दोनदां घ्यावा. हिस्टेरीया असणाऱ्या कुमारिकांनीं २ महिनेपर्यंत हा काढा घेतल्यास तो विकार नाहींसा होतो.

लोध्रासव—श्वेत प्रदर, अतिसार यांवर हें सकाळीं व सायंकाळीं घ्यावें. नियमीत पाळी येण्याकडे याचा चांगला उपयोग होतो. कौमार्यावस्थेंत कृमीमुळें, जननें-द्रियांच्या भागांत खाज उत्पन्न होऊन त्या भागांचा दाह होतो. हा दाह ह्या आसवानें कमी होतो. बाळंतरोगानें तोंड येणें, अतिसार, संग्रहणी यांवर तांदु-ळांच्या धुवणांतून घ्यावें.

रुदंत्यासवः—गर्भाशयाची अशक्तता, स्त्रीअंडांची अपुरी वाढ, त्याचप्रमाणें श्वेतप्रदर यांवर याचा चांगला उपयोग होतो. जननेंद्रियांच्या स्रावांमधील दोषांमुळें संतति होत नाहीं, किंवा २–३ महिने गेल्यास गर्भस्राव होतो, धुपणीच्या विका-रानें अशक्तपणा येतो वगैरे तक्रारी यांपासून कमी होतात.

अभयारिष्टः—मलावरोधाचा विकार प्रत्येकामध्यें आढळतो, याचा उपयोग यकृत् व आंतड्यांवर होत असल्यामुळें या औषधानें शौचास साफ होतें. गरोदरपणांत सुद्धां याचा उपयोग करितां येतो.

अशोकारिष्टः—अनियमित पाळी असणें, पाळीच्या वेळीं पोटांत दुखणें, श्वेत-प्रदर, गर्भाशयांच्या अंतरावरणांचा दाह–वगैरे विकारांमध्यें १ महिनापर्यंत हें घेतल्यास फायदा होतो. पाळी नियमीत येऊं लागते, व प्रदराचा विकार कमी होतो.

गर्भस्रावावर चूर्णः—ह्या चूर्णाचा उपयोग पहिल्या महिन्यापासून ते ९ महिन्यांपर्यंत गरोदरावस्थेंत होणाऱ्या स्रावांवर करितां येतो. गर्भपात, गर्भस्राव, रक्तप्रदर हे विकार कमी होतात.

उशीरासवः—आंगाची आग होणें, लघ्वीची जळजळ, अंग नेहमीं संतप्त असणें, छातींतून रक्त पडणें, यांवर हें आसव तांदुळाच्या धुवणांतून घेणें.

सीतोपलाचूर्णः—सुका खोकला यांवर तूप मधांतून घ्यावें. आंगामध्यें कडकी अशक्तपणा, डोळ्यांची आग, लघ्वीची जळजळ यांवर सकाळीं व सायंकाळीं १ ते २ चमचे दूध व खडिसाखर यांतून घ्यावें. देवी गोंवर कमी झाल्यावर येणाऱ्या सुक्या खोकल्यावर याचा चांगला उपयोग होतो. श्वेतप्रदरांवर यांमध्यें चंद्रपुटी प्रवाळ मिळवून घेतलें असतां फायदा होतो.

प्रवाळ चंद्रपुटीः—डॉक्टर लोक जेथें कॅलसीअम अगर त्यांपासून तयार केलेलीं द्रव्यें वापरतात तेथें यांचा उपयोग होतो. उष्णता, अशक्तता, सुका खोकला, बाळंतपणानंतर येणारी अशक्तता, हातापायांची आग, डोळे जळजळणें, मस्तकांत आग वगैरेवर २ ते ४ गुंजा दूध खडिसाखर यांतून घ्यावें.

प्रवाळ पंचामृतः—अग्निमांद्य, ढेंकर येणें, कांहींही न पचणें, आंतड्याचा दाह, आंतड्यामध्यें सूज असणें, आम्लपित्त वगैरे विकारांत याचा उपयोग होतो. अशक्त प्रकृति असतां भूक मंद होणें, यांवर पचनक्रिया वाढवून शक्ति देणारें, असें सौम्य दुसरें औषध नाहीं.

मंडूरः—गरोदरपणांत अगर बाळंतपणांत रक्तामधील लाल रक्तकण वाढवण्यांकडे यांचा उपयोग होतो. पांडुरोग, अग्निमांद्य, संग्रहणी, अतिसार यांमध्यें, मलावरोध न करतां भूक वाढवून रक्त वाढतें, यकृतांला उत्तेजन देणारें असल्यामुळें, १ ते २ गुंजा ताकांतून घेतलें असतां भूक वाढते. व शौचाला साफ होतें. मुलांच्या रिकेटस्‌मध्यें हें मृगशृंग भस्माबरोबर दिल्यास हाडें वाढून यकृत्, प्लीहा, हीं कमी होतात.

शंखभस्मः—अजीर्णामुळें होणाऱ्या पोटदुखीवर २ ते ३ गुंजा १ ते २ चमचे लिंबाच्या रसांतून घ्यावें. प्लीहा वाढली असतां कुमारीआसवांतून घ्यावें. संग्रहणी, आमांश यांवर तूपसाखर मधून घ्यावें.

उन्मादगजकेसरीः—ह्या गोळ्या मेंदू व मज्जातंतू-यांवर कार्य करीत असल्यामुळें त्यांचा उपयोग, अपस्मार, हिस्टेरीया, बडबड यांवर प्रत्येक वेळीं १–१ गोळी तूपमधांतून घ्यावी.

गर्भपालरसः—ह्याच्या नांवावरून गर्भाचें पोषण करणें, हा याचा धर्म असल्याचें दिसून येईल. गर्भामध्यें व्यंग न राहूं देणें, गर्भस्राव, गर्भपात टाळणें यांवर याचा चांगला उपयोग होतो. गरोदरावस्थेपासून दिल्यास गर्भपात होण्याची संवय असल्यास टळते. हें औषध ९ महिनेपर्यंत देण्यास हरकत नाहीं; प्रत्येक वेळीं एक गोळी मनुकाच्या काढयांतून दिल्यास मलावरोध असल्यास शौचाला साफ होतें.

कामदुधाः—पित्तविकारांवर ह्या औषधाचा चांगला उपयोग होतो. चक्कर, घेरी येणें, उलट्या होणें, आम्लपित्त, यांवर १ ते २ गुंजा मुरावळ्यामधून अगर डाळिंबांच्या रसांतून देणें. गरोदरपणांत उलट्या होऊन कांहीं टिकत नाहीं त्यावर

तूप, खडीसाखर अगर डाळिंबाच्या रसांतून अथवा लिंबाच्या रसांतून देणें. श्वेत-प्रदर, देवी, गोंवर गेल्यानंतर राहिलेली उष्णता यांवरही फायदा होतो. यांमध्यें मौक्तिक-अभ्रक वगैरे भस्में असल्यामुळें मज्जातंतु-मेंदू यांना पोषक व इंग्रजी कालझाना टॅबलेटस् जेथें वापरतात तेथें याचा उपयोग होऊं शकतो.

प्रतापलंकेश्वरः—याचा उपयोग एक्स्ट्रॅक्ट अर्गटसारखा परंतु त्यापेक्षां टिकाऊ असा होतो. गर्भाशयांचे संकोचनाला उत्तेजन देऊन आंतील स्राव बाहेर जाण्यास व गर्भाशय मूळ स्थितीवर आणण्यास मदत करतो. बाळंत झाल्यानंतर १ गोळी सकाळ सायंकाळ २ चमचे आल्याचा रस, -॥- चमचा मध, यांमधून घ्यावी. वातविकार, बडबड, बाळंतपणानंतर येणारा थकवा वगैरे ताबडतोब कमी होतो. पहिले ३ दिवस प्रतापलंकेश्वर दिल्यास सूतिकाज्वर येण्याचा टळतो. याच्यामध्यें जंतुनाशक धर्म असल्यामुळें स्रावाला घाण येण्याचें कमी होतें. वायुगोळा, पोट-फुगी, वगैरे बाळंतपणांतील विकारावर १ ले निदान दहा दिवस आल्याच्या रसामधून किंवा बाळंतकाढयांतून किंवा सकाळ सायंकाळ बाळंतकाढा व दुपारीं व रात्रीं प्रतापलंकेश्वर यांप्रमाणें दिला असतां बाळबाळंतिणीची प्रकृति चांगली रहाते असा बऱ्याच वर्षांचा अनुभव आहे.

पंचामृत पर्पटीः—ही जंतुनाशक असून आंतड्यांची सूज, अतिसार, वारंवार तोंड येणें, यामध्यें उत्तम कार्य करतें. विशेषतः बाळंतपणांतील अतिसारावर याचा उत्तम उपयोग होतो. इंग्रजीमधील सॅलोल पेक्षां हें औषध उत्तम असून बरेच दिवस चालू ठेवतां येतें. -॥- ते २ गुंजा तूप, मध अगर ताकांतून घ्यावी.

प्रदररिपूः—योनीच्या भागांत असणारी सूज, त्यामुळें होणारा श्वेतप्रदर, गर्भाशयाच्या आवरणांचा दाह, यांमध्यें १–१ गोळी तांदुळाच्या धुवणांतून देणें. हें औषध चालू असतां ब्रह्मचर्य पाळलें पाहिजे. श्वेतप्रदराच्या विकारांत ब्रह्मचर्य पाळलें नाहीं, तर कोणत्याही औषधांचा उपयोग होत नाहीं.

लक्ष्मीविलासः—यामध्यें सोनें व इतर शक्ती वाढवणारीं औषधें आहेत. बाळंतपणांत येणारी अशक्तता–रक्त वाढवणें, वगैरे याचा शक्ति वाढवण्याकडे उपयोग होतो.

दशमुलारिष्टः—बाळंतपणानंतर १ महिन्यांनें शक्ती वाढण्याकडे, याचा चांगला उपयोग होतो. बाळंतकाढा १ महिना घेतल्यानंतर १।३ महिनेपर्यंत

हें अरिष्ट घ्यावें. ह्यानें भूक चांगली लागते, अन्नपचन चांगलें होतें, कडकी कमी होते, व ताकद वाढूं लागते. हें औषध चालू असतां कडकी कमी होऊन मुलाला दूधहि भरपूर मिळून बाळंतरोगादि उपद्रव टळतात. व प्रकृति चांगली होते. नाजुक स्थितींत जेथें कोणतेंहि औषध लागू पडत नाहीं तेथें हें पडतें असा अनुभव आहे.

लघुमालिनी वसंतः—अंगांत नेहमीं बारीक ताप असणें, खोकला, प्रदर वगैरे विकारांमुळें येणारी अशक्तता—यांवर अल्पमोली बहुगुणी असें हें औषध आहे. १ ते २ गुंजा दुध व खडीसाखर यांतून सकाळीं सायंकाळीं घ्यावें. आयुर्वेदांमध्यें हें टॉनिक औषध आहे. कॅलसीयम, लोह वगैरे तत्त्वें यांत असल्यामुळें शरीरामधील कमी झालेलीं तत्त्वें वाढण्याकडे याचा चांगला उपयोग होतो. हें औषध या गुणांमुळें आबालवृद्धांपर्यंत प्रसिद्ध आहे. क्षयजन्य कडकी, खोकला यांवर पिंपळी, तूप, मध यांमधून दिल्यास गुण येतो.

नारायण तेलः—याचा उपयोग इंग्रजीमध्यें टरपेंटाइन, लिनीमेंट कॅम्फर वगैरे वातहारक औषधें वापरण्यांत येतात त्याठिकाणीं करण्यांत येतो. हें तेल तिळाचें तेल व गाईचें दूध व इतर वातहारक औषधांमध्यें केलेलें असल्यामुळें याचा गुण बराच काळपर्यंत रहातो. आंगांमध्यें कळा, पाय दुखणें, छातीमध्यें दुखणें, यांवर हें तेल चांगलें चोळून शेकावें. २ ते ३ थेंब दुधांतून पोटांत घेतल्यास कॉडलीव्हर ऑइल प्रमाणें याचा उपयोग होतो. साधारणतः वातविकारांवर याचा उपयोग करतात.

चंदनबलालाक्षादि तेलः—बाळंतपणांत, अगर मुदतीच्या तापांमध्यें शरिराला क्षीणता येते अशावेळीं हें तेल अंगांला मर्दन केलें असतां रोग्याला हुषारी वाटते. तापांमध्यें अंगांची आग होत असेल तर हें तेल अंगांला चोळावें. दाह कमी होतो. टॉयफाइड सारख्या २१ दिवसांच्या तापांमध्यें रोज अंगांला हें तेल लावलें असतां शरिराची झीज कमी होते. गर्भाच्या वाढीमुळें पायांतील शिरांवर दाब पडून पाय फुटत असतात, अशावेळीं ह्या तेलाचें मर्दन करावें. बाळंतिणीनें पहिल्या दिवसांपासून तीन महिनेपर्यंत या तेलाचें मर्दन केलें असतां शरीरकांति सुधारते, अशक्तपणा कमी होतो, कडकी कमी होते व स्नायूची, त्वचेची शक्ति वाढून रुधिराभिसरामुळें विजातीय द्रव्यें बाहेर पडण्यास मदत होते, इंग्रजी तेलांमध्यें

ऑल्कोल असल्यामुळें, त्या तेलांनीं तात्पुरतें बरें वाटतें, तशी गोष्ट आयुर्वेदीक पद्धतीनें केलेल्या तेलांमध्यें नसते.

बोलबद्ध रसः—गर्भाशयांतून आणि योनीच्याद्वारें रक्तस्राव सुरू झाला तर ह्या गोळ्या सकाळ सायंकाळ तांदुळाच्या ( नवटांक ) धुवणांतून घ्याव्या. गर्भाशयांचें संकोचन होऊन स्राव बंद होतो. स्त्रियांमध्यें पाळी संपल्यावर स्राव ५–१० दिवस चालू असतो. त्यांना या गोळ्या फायदा देतात. या गोळ्यांनीं गर्भाशयांची शक्ती वाढून पुढच्या पाळीला जास्त रक्तस्राव जाण्याचें कमी होतें.

इरिमेदादि तेलः—गरम पेयें, अगर गरम पदार्थ वारंवार खाण्यांत आल्यामुळें दांत, त्याचप्रमाणें दाढा हलुहलु सुजतात, त्या पिकतात, व त्यांतून पु येऊं लागतो. कित्येक वेळां दांत पोकळ होतात व ठणका सुरू होतो. या तेलाचा उपयोग दंतमंजनाप्रमाणें होतो, व दुखाव्याच्या जागीं, कापसांत तेलाचा बोळा भिजवून ठेवला असतां ठणका कमी होतो, दाढा मजबूत होऊन पु वहाणें हळुहळु कमी होतें.

एलादि काढाः—मूत्रल असून, लघ्वी कोंडणें व आग होणें यानें कमी होतात. उन्हाळयाचें औषध ३–४ गुंजा व ४ टीस्पून काढा असें मिश्रण बनवून घेतलें असतां लघ्वीची तिडीक, प्रदर, उष्णता हीं कमी होतात. मुतखड्यावर याचा चांगला उपयोग होतो. लघ्वींतून पु जाणें यांवर शिलाजीत, सुवर्णराजवंगेश्वर हीं यांत मिळवून घ्यावींत.

विसर्पावर काढाः—हें आयुर्वेदांतलें दिव्य औषध आहे. सर्व प्रकारच्या जंतुजन्य विकारांवर उत्तम लागू पडतें. उष्णतामान १०३–१०४ वर गेल्यास ·॥· तें १ औंस चा डोस दिल्यास ताप कमी होऊं लागतो. हृदयांची शक्ती कमी करीत नाहीं; हल्लीं पुष्कळशा केसीस **सेप्टीक** ( Septic ) झालेल्या आढळून येतात; व त्यामध्यें निरनिराळ्या पद्धतीनें नानातऱ्हेचे औषधोपचार होऊन अखेर शस्त्रक्रिया सुद्धां करण्याची पाळी येते तरी रोगी वांचणें मुष्किलीचें होतें. अशा कोणत्याही **सेप्टीक** केसीसमध्यें रोगांच्या जोरांप्रमाणें ह्या काढयांचा अर्ध्या–१ तास तासाचे अंतरानें एक डोस दिला असतां उत्तम पैकीं फायदा होतो असा अनुभव आहे. आजच्या काळांत हें प्रत्येकाच्या संग्रहीं असणें जरूर आहे.

एकाद्या प्रसंगीं जखम होऊन रक्तस्राव सुरू झाला व ती केस सेप्टीक स्वरूपाची दिसूं लागली असतां व अकस्मात् जखम वगैरे होऊन धनुर्वाताची चिन्हें दिसूं लागलीं असतां हा काढा ताबडतोब सुरू करून जखमेंत शेंदूर भरावा. म्हणजे जखमेंत पाणी होत नाहीं व पू होण्याच्या क्रियेलाहि प्रतिबंध होतो. या काढयाच्या व शेंदुराच्या जंतुनाशक धर्मामुळें जखम भरून आल्याशिवाय शेंदूर बाहेर पडत नाहीं. तोंपर्यंत हा काढा सुरू ठेवणें.

चंद्रप्रभा—गर्भस्राव, गर्भपात, परमा, जुनाट उपदंश, वारंवार मुलें झाल्यानें गर्भाशयाची होणारी अशक्तता, विटाळशेपणीं कळा निघणें, रजोदर्शनाच्या वेळीं होणारा त्रास, अनियमित रजोदर्शन, योनिस्राव, यावर ही उत्तम फायदेशीर आहे. गर्भाशयाच्या अशक्ततेमुळें बीजाचें ग्रहण न होणें, गर्भ न राहणें, किंवा राहिल्यास तीन-चार-पांच महिनेपर्यंत कशी तरी गर्भधारणा होऊन गर्भपात होणें यांवर चंद्रप्रभा चांगलें कार्य करतें. चंद्रप्रभा ही स्त्री रोगांवर दिव्य औषधी असून पुरुषांचें मूत्र-वीर्य मेह विकारावरहि हिचा चांगला फायदा होतो.

पत्रांगासवः—हें प्रदरांवर रामबाण आहे. विशेषतः रक्तप्रदरावर याचा अत्युत्तम फायदा होतो. बऱ्याच वर्षांचा विकार असतां गर्भाशयाला शिथिलता येते, यामुळें संतति होणें कठीण असतें अशा स्थितींत यांचा उपयोग करावा.

योगराज गुग्गुळ—यांत पाचक, अग्निदीपक, वात नाशक, आम दोष नाशक, धातु परिपोषण योग्य स्थितींत ठेवणें असे गुणधर्म आहेत. विशेषें करून जुनाट वात विकारांत तसेंच रसादिधातूंच्या विकारामुळें उत्पन्न झालेल्या वात व्याधींत, वातरक्त विकारांत याचा उत्तम उपयोग होतो.

वात विध्वंस—कुक्षिशूल-पोटांतील कळा-आमवात, संधिवात यांची जुनाट अवस्था, ज्वरांतील बेशुद्धी, स्त्रियांच्या सूतिका ज्वरांत अथवा ज्वर नसतांहि उत्पन्न होणारा वायुगोळा व त्यामुळें उत्पन्न होणारी डोकेदुखी, बस्तिभागांतील, कोष्टभागांतील व गर्भाशयाच्या भागांतील भयंकर वेदना अशा निरानिराळ्या ठिकाणच्या वेदनावर याचा चांगला फायदा होतो.

रससिंदुरः—याचें कार्य हृदयस्थानावर विशेषतः श्वास वाहिन्यावर विशेष होतें. श्वासवाहिन्यांच्या दाहांत कफस्राव होणाऱ्या औषधाबरोबर हा दिल्यास कफ

सुटून पडतो. जुनाट कफविकार, कफानें भरभरलेला खोकला येऊन पिवळा, घट्ट, चिकट, पाढरा, असा कफ पडणें यांवर हें औषध उत्तम कार्य करतें. हें औषध हृदयाला उत्तेजक व बल्य आहे; यानें स्नायूंना बळकटी येते.

हेमगर्भः—याचा उपयोग उत्तेजक असा होत असून इंजेक्शन प्रमाणें याचा तात्काळ फायदा होतो; परंतु याचा परिणाम इंजेक्शन पेक्षां फार वेळ टिकतो. कफ वाताच्या भयंकर अवस्थेंत रोगी बेशुद्ध होऊन आसन्न मरण स्थितींस पोंचल्या प्रसंगीं याचा उपयोग केल्यास तत्काळ रोगी सावध होतो. इंजेक्शन प्रमाणें हें वारंवार द्यावें लागत नाहीं.

# उपसंहार

आजच्या स्त्रियांचें आरोग्य जसें असावें तसें तें असत नाहीं याचें कारण थोडक्यांत ठोकळपणें प्रारंभीं दर्शविलें आहेच, शिवाय आज काल स्त्रियांचें आरोग्य कोणकोणत्या विकारांनीं बिघडतें, त्यांच्या आरोग्य नाशास कोणकोणत्या व्याधी कारणीभूत होतात. त्याबद्दलचे प्रतिकार—उपचार कसकसें करावें याबद्दल प्रसंगोपात ठिकठिकाणीं विवरण-सूचना वगैरे केल्या आहेत पण एवढयानें स्त्रियांच्या आरोग्याचा प्रश्न सुटत नाहीं. **स्त्रिया व स्त्रियांचें आरोग्य हा विषय कुटुंब-समाज-राष्ट्र या दृष्टीनें फार महत्त्वाचा आहे. स्त्री ही राष्ट्र जननी तशीच पुरुषाची आकर्षक दिव्य शक्ति आहे.** सर्व सामाजिक आचार विचारा बरोबर स्त्रियांकडे पाहण्याची दृष्टीहि बदललेली आहे असें आपणास पदोपदीं अनुभवास येतें. दिवसेंदिवस होणाऱ्या सामाजिक हालचालींत स्त्रिया जास्त जबाबदार भूमिका घेतांना दिसतात; परंतु व्यक्तिस्वातंत्र्याच्या कल्पना कितीहि परकाष्ठेला पोंचल्या तरी स्त्रीपुरुषांच्या आयुष्यांत परस्परांची गरज व परस्परांचें आकर्षण हें मूलभूत आहेच. माणसानें नवीन विश्वें शोधून काढलीं किंवा निर्माण केलीं तरी स्त्रीच्या अस्तित्वाखेरीज त्याला आपल्या कर्तृत्वांत पूर्णता नाहीं. पुरुष व स्त्री यांच्या निसर्गसिद्ध संगतीविषयीं हे सिद्धांत पति व पत्नी आणि साहचार्य यांची कल्पना मूलभूत मानावी लागेल. पुरुष व स्त्री यांना एकमेकांच्या साहचर्याची गरज भासणें हें केव्हांहि नैसर्गिक आहे. या साहचर्याचें स्वरूप कोणत्याही प्रकारचें असलें तरी एकमेकांना एकमेकांचें साहचर्य पाहिजेच पाहिजे यांत संशय नाहीं. जीवनशास्त्रांच्या दृष्टिनें परस्परांच्या आयुष्याच्या पूर्ततेस परस्परांच्या साहचर्याची जरूर आहे हेंच दर्शवितें. पुरुषांच्या आयुष्यांत स्त्रियांना फारच क्षुद्रस्थान असून महत्त्वाचे फेरबदल करण्याचें त्यांच्या ठिकाणीं सामर्थ्य नाहीं असें समजणें चुकीचें होईल. सामान्य माणसाला स्त्री वांचून निव्वळ बौद्धीक एकाग्रतेंत आयुष्य घालविणें अशक्य आहे. आजन्म अविवाहित राहण्याची कल्पना आज तरी महत्त्वाची अथवा मोहक राहिलेली नाहीं तरी एकाद्या संकल्पित कार्यासाठीं अविवाहित स्थितींत राहण्याचा निर्धार

करून मनाच्या सर्व शक्तीचें केंद्रीकरण करण्याचे प्रकार अपवादात्मक ठरतील. सर्व साधारणपणें सामान्य माणसाला अशा स्थितींत आयुष्यामध्यें खरी शांतता मिळणें शक्य नाहीं. एखादें संकल्पित कार्य आजन्म अविवाहित राहून पुरें करण्यासाठीं केल्या जाणाऱ्या प्रतिज्ञेचे कितीही गोडवे गाईले तरी प्रत्यक्ष व्यवहारांत या सिद्धान्तांना पुरावा मिळत नाहीं. उलट असें अनुभवास येतें कीं, अविवाहित आयुष्यांत सामान्य माणसाला पदोपदीं विकारांशीं झगडा करावा लागतो. त्याच्या विचारांना तें आयुष्याचें व्रत कायम ठेवण्यासाठीं इतका बौद्धिक ताण पडतो कीं, स्वतःस अविवाहित ठेवावयाचें हेंच एक त्याचें आयुष्याचें ध्येय होऊन त्यांतच त्याची सर्व शक्ती खर्च होते. स्त्रीची गरज टाळणें अथवा अविवाहित राहणें हें साधुत्वाचें लक्षण समजलें जातें; पण स्त्री व पुरुष यांच्या आयुष्यांतील एकमेकांचें महत्त्वाचें स्थान दृष्टीआड करून निसर्ग नियमनाविरुद्ध वागणें केव्हांहि श्रेयस्कर होत नाहीं. यांत आयुष्याच्या इभ्रतीला कमीपणा मानणें हें केवळ निसर्ग नियम लक्षांत आणल्यास अज्ञानच म्हणावें लागेल. आयुष्यांतील स्त्रीचें साहचर्य वगळणें हें जीवनांतील व्यंग होय असें मोठमोठ्या शास्त्रज्ञांनीं स्पष्टपणें सिद्ध केलेलें आहे. कारण सामान्य माणसाच्या आयुष्यांत स्त्रीचें साहचर्य ही नुसती गरज नसून त्यांत परस्परांच्या आयुष्याच्या शक्तीचा उगम आहे. स्त्रीच्या सान्निध्याचा बाऊ करून तिचें साहचर्य चैनीसारखें व्हावें ही वृत्ति बहुतेक सर्वत्र दिसून येते. स्त्रियांच्या आयुष्याची रचनाच अशी आहे कीं, तिला जिवित स्वातंत्र्य कांहीं मर्यादित क्षेत्रांतच शक्य आहे. तीच गोष्ट पुरुषांचीही. तेव्हां प्रत्येकाच्या आयुष्याच्या पूर्णतेसाठीं एकमेकांचें सहाय्य आवश्यक असून त्यासाठीं साहचर्याची आवश्यकता हितावह अशीच आहे.

स्त्रीजीवनांत आजकाल अतिशय महत्त्वाचे फेरफार होत आहेत. गेल्या कांहीं वर्षांचा काळ या दृष्टीनें विचार करण्यासारखा आहे. आपल्याकडे इंग्रजी अंमल सुरू झाल्यानंतर या बाबतींत क्रांती घडून आली. क्रांतीचा इतिहास हा मानवी जातीचाच इतिहास असतो. पुढच्या पिढीनें मागच्या पिढीला वाईट म्हणावयाचें ही गोष्ट पूर्वीं पासूनच आहे. स्त्रीजीवनांत होणारी क्रांति ही भावनेवर आधारलेली आहे. तिला बुद्धीचीहि जोड दिली पाहिजे. पुढची व मागची पिढी यांत समन्वय होईल तरच ही उत्क्रांति यशस्वी होईल. युरोपमध्यें शास्त्रीय

## आजच्या स्त्रियांचें आरोग्य

सुधारणे नंतर स्त्री सुधारणेला सुरवात झाली अर्थात् एकोणिसाव्या शतकापर्यंत स्त्रियांच्या प्रश्नाकडे पाहण्याची कोणती दृष्टी होती, विसाव्या शतकांत तींत कोणता बदल झाला व पुढील काळांत तिचें कोणतें ध्येय ठेवावयाला पाहिजे हे स्त्री जीवनांतील विचार करण्यासारखे तीन महत्त्वाचे प्रश्न आहेत.

स्त्री जीवनांत विवाह ही फार महत्त्वाची बाब आहे. व स्त्रीपुरुषांचें साहचर्य यांत त्या बाबीचा उगम आहे. विवाहास स्थैर्य आणण्यास प्रेमच प्रथम कारण होतें; परंतु प्रेम म्हणजे क्षणिक चंचल कामातुर मनाचा विकार नसून माता पितरें आणि मुलें यांच्यांत जसें निर्व्याज प्रेम असतें तसेंच असलें पाहिजे. सुरवातीस प्रेम बसण्यास सद्गुण, बुद्धी अथवा सौंदर्य हीं निमित्त मात्र असतात; परंतु खरें प्रेम परिणत होतें सहवासानेंच. नैमित्तिक प्रेमाचा विकास सहचरांच्या दोषांकडे सहिष्णुवृत्तीनें पाहूं शकणाऱ्या चिरस्थायी प्रेमांत होण्याचें कार्य साहचर्य-विवाहांत प्रथम साधलें पाहिजे. साहचर्याचें खरें सौख्य, खरा आनंद व खरें सार्थक विवाहाखेरीज मिळणें अशक्य आहे. आपल्या धर्मशास्त्रामध्यें विवाहाच्या हेतूचें महत्त्व फार मोठें दर्शविलें असून त्याखेरीज स्त्री पुरुषांच्या जीवनाचें सार्थक होणारें नाहीं असें सांगितलें आहे. स्त्री व पुरुष हीं संसाररूपी रथाचीं दोन चक्रें आहेत व तीं पूर्वजांच्या संस्कृतीच्या चाकोरीनें जाण्यांतच त्यांचें खरें कल्याण आहे ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. सध्यां स्त्रीविषयीं जी एक प्रकारची क्रांति सुरू झालेली आहे व तीमुळें जी मनाची एकसारखी तळमळ व जो असंतोष पसरला आहे त्यामुळें प्रत्येकाला आपण काय करावें कसें करावें हें सुचेनासें झालें आहे. स्त्रियांच्या बाबतींतहि हाच प्रश्न प्रामुख्यानें पुढें आलेला आहे. वस्तुतः पाहिलें तर स्त्रीजन्म ही एक कसोटी आहे; स्त्रीजन्म हा केवळ स्वार्थ व सुखलोलुपता यांचेसाठीं नसून तो राष्ट्रीय कर्तव्यासाठीं आहे. अर्थात् राष्ट्राच्या भावना उदयोन्मुख स्थितींत असतांना त्याच भावनाची वाढ स्त्रियांमध्यें होणें साहजिक व जरुरीचें आहे. यासाठीं देशाच्या उन्नतीसाठीं प्रथमतः स्त्रियांच्या उन्नतीचा प्रश्न हातीं घेणें फार अगत्याचें आहे. **आदर्श गृहिणी व आदर्श माता हेंच ध्येय स्त्रीवर्गानें आपल्यासमोर ठेवून तत्प्रीत्यर्थ झटलें पाहिजे.** आपल्या संस्कृतीच्या दृष्टीनें आपली आर्यस्त्रीची प्रतिमा म्हणजे, स्वार्थत्यागाची मूर्तिच म्हटली पाहिजे, पण सध्यांच्या परिस्थितीकडे पाहिल्यास तें बीज आमच्यांतून

नाश पावत आहे असें म्हणावें लागतें. स्त्रियांना मिळणारें नवीन शिक्षण त्यांना स्वार्थी, सुखलोलूप, व स्वकर्तव्य भ्रष्ट, आणि संस्कृतीच्या विरुद्ध बनवीत आहे. स्वतःच्या कुटुंबाकरितां—देशांकरितां कांहीं करावयाचें ही प्रवृत्तीच स्त्रियांतून नष्ट होऊं लागल्याचीं चिन्हें दिसत आहेत. आदर्श गृहिणीप्रमाणें आदर्श माता होणें व त्या बद्दलच्या कार्यांत हातभार लावणें यांतच स्त्रीच्या कर्तव्याचें बीज आहे. व त्या कर्तव्यासाठींच स्त्रीजन्म आहे असें क्षणभर मानल्यास वावगें होणार नाहीं.

मातृपदावर आरूढ झाल्यानंतर स्वतःच्या चैनी, आवडी निवडी व सोयी या सर्वांचा " माता या दृष्टीनें कांहीं वेळां स्वार्थत्यागहि करावा लागतो, मातृपदाला स्वार्थत्यागाची " फारच मोठी किंमत द्यावी लागते यामुळें हल्लींच्या तरूण स्त्रियांत " मुलेंच नकोत ! " एवढेंच नव्हे विवाहाचें बंधनहि नको असें म्हणणाऱ्या स्त्रिया आढळून येतात व याबद्दल हल्लीं समाजांत मोठी चर्चाहि सुरू आहे. विवाहाचें बंधन नको म्हणून जी चर्चा सुरू आहे, तिच्या बुडाशीं वैयक्तिक सुख, स्वैराचार या पलीकडे दुसरी भावना संभवत नाहीं. विवाहाच्या बाबतींत आर्थिक परिस्थितीची सबब पुढें केली जाते पण तिच्यापेक्षां वरील कारणच यांत प्रमुख मानावें लागेल. शिवाय आजकाल जे विवाह होत असतात त्यामुळें स्त्रियांच्या व पुरुषांच्या आरोग्यावरहि परिणाम होत असल्याचें दिसून येतें. अवयवांची व बुद्धीची वाढ पूर्ण झाल्यावर विवाह होणें हें इष्ट आहे व असें मत प्रतिपादन करतांना मन विषय रहीत असतें अशी कल्पना होते, पण वस्तुस्थिती याच्या अगदीं उलट असते. शिक्षणासाठीं अथवा एकाद्या ध्येयासाठीं योग्य वय होऊनहि विवाह लांबणीवर टाकल्यामुळें भुकेनें ग्रस्त झालेला मनुष्य जसा अन्नासाठीं तडफडत असतो तद्वत् आजकालच्या तरुण तरुणीची स्थिति होते. त्यांच्यांत विषय वासना उत्पन्न होतच नाहीं हें म्हणणें निखालस खोटें आहे. योग्य वयांत विवाह न झाल्यानें स्त्रियांत निरनिराळ्या प्रकारचे हिस्टेरिया, फीटस् वगैरे रोगांची वाढ होऊन अल्पायु, खुरटी प्रजा उत्पन्न होण्यासारखे परिणाम होतात. बालविवाहापासून जसे तोटे होतात तसेंच अशा विवाहांमुळें होत असतात. सुप्रजाजनन शास्त्राचे ( Eugenics ) जनक डॉ. राबर्टसन आपल्या ( Woman her sex & love life) या पुस्तकामध्यें म्हणतात स्त्रियांनीं आपलें कौमार्यत्व पूर्णपणें संरक्षण करून कुलीन निरोगी व शुद्ध आचरणाच्या अशा तरुणांशीं विवाह करावा: व

विवाह झाल्यानंतर आपला पतिव्रता धर्म संभाळावा. स्त्री व पुरुष यांची जोडी उत्पन्न करण्यांत प्रजोत्पादन करणें हाच निसर्गाचा हेतु असला पाहिजे; तेव्हां स्वतःच्या चैनीसाठीं, स्वैरवर्तनासाठीं व आत्यंतिक सुखोपभोगाच्या लालसेसाठीं भलत्याच लंगड्या सबबी पुढें करून व त्यांचें समर्थन करण्याचा प्रयत्न करून आजकाल जो संतति-नियमनाचा बोलबाला चालला आहे त्याबद्दल विचार करणें क्रमप्राप्त अतएव इष्ट दिसतें.

सध्यां आपल्या देशांत संतातिनियमन व त्याच्या जोडीला नवनीती-नवमतवाद समाजांत रूढ करण्याच्या चळवळीला चालना देण्याचे प्रयत्न चालविले जात आहेत व त्यांतल्या त्यांत मुख्यतः आधुनिक तरुणवर्गाकडूनच या बाबतींत पुढाकार घेतला जात आहे; हें विशेष लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

संततिनियमनाच्या आवश्यकतेच्या दृष्टीनें जे मुद्दे मांडले जात आहेत, त्यांपैकीं कित्येक कांहीं अंशी विचारणीय असले तरी केवळ भौतिक शास्त्रांवरच भर ठेवून त्याबद्दलचा एकांगी विचार करणें केव्हांहि इष्ट व श्रेयस्कर होणार नाहीं. पूर्वीच्या भौतिक शास्त्रांच्या कल्पना आजच बदललेल्या नाहींत, कालपरिस्थिती समाज राष्ट्राच्या जीवनांत स्थित्यंतर घडवून आणते, हें खरें असलें व त्याप्रमाणें पूर्वीच्या व आजच्या परिस्थितींत बदल झालेला असला तरी तींत समरस होण्याचे पूर्वी आपली पूर्वपरंपरा, संस्कृती, तत्त्वज्ञान, व आजपर्यंतची समाजास्थिती हीं विचारांत घेणें अगत्याचें आहे.

संततिनियमनाच्या पुरस्कर्त्यांकडून तो विषय पुढें मांडतेवेळीं त्याच्या आवश्यकतेसंबंधीं मुख्यतः देशाची सांप्रतची अवनत स्थिती—देशांतील वाढतें दारिद्र्य ही सबब पुढें केली जाते. दिवसेंदिवस देशांत दारिद्र्यावस्थेचा पसारा वाढत आहे, बेकारी सर्वत्र पसरत चाललेली आहे, तेव्हां अशा स्थितींत देशांत संतान वृद्धी होणें म्हणजे वाढत्या दारिद्र्याला अगर बेकारीला आणखी मदत करण्यासारखें होय; व त्यासाठींच देशांत संततिनियमन होणें इष्ट आहे असें सांगण्यांत येत आहे; शिवाय संतानवृद्धीमुळें स्त्रियांचा शारिरीक ऱ्हास होत असल्यामुळें त्या दृष्टीनेंहि संततिनियमनाची आवश्यकता प्रतिपादिली जात आहे; पण ही दुसरी सबब पहिल्या सबबीपेक्षां कांहींशी गौण स्वरूपांत दर्शविली जात आहे.

देशांतील वाढत्या दारिद्र्यावस्थेंत संतानवृद्धी होणें म्हणजे त्या दारिद्र्यावस्थेला मदत करणें हें खरें आहे.

पण त्या गोष्टीचा सूक्ष्मपणें विचार केला असतां ज्या मूलभूत कारणामुळें आपल्या देशाचें दारिद्र्य वाढत आहे, त्या मूळ कारणावरच आघात करणें योग्य व इष्ट नाहीं काय? आमच्या देशाची सांप्रतची अवनत स्थिती व वाढतें दारिद्र्य याचें मुख्य कारण "**राजाकालस्य कारणम्**" या न्यायानें सध्यांची आपल्या देशाची राजकीय परिस्थितीच होय. तेव्हां ही परिस्थिती आपल्या देशाला हितावह होईल अशी घडवून आणण्याचे प्रथम जरूर ते प्रयत्न झाले पाहिजेत; व तसें झालें म्हणजे साहजिकच संततिनियमनाची आपणास तेवढीशी गरज भासणार नाहीं. पण आजकाल संततिनियमन, नवनीती–नवमतवाद यांची जी घोषणा चाललेली आहे, ती विचारांत घेतल्यास—"आधींच जन विषयांतले किडे व त्यांची धांव कामाकडे" या उक्तीस अनुसरून उपरोक्त चळवळींत वैषयिक स्वार्थाकांक्षाच बव्हंशीं दिसून येते व त्या बरोबरच नीतिभावना, धर्माधर्म, पूर्वपरंपरा व संस्कृती या महत्त्वाच्या विषयाकडे दुर्लक्ष केलें जातें. एवंच सांगावयाचें म्हणजे एवढेंच कीं, या चळवळीचें निरीक्षण केल्यास संततिनियमन, नवमतवाद–नवनीति यांचा उद्गम वैषयिक स्वार्थाकांक्षेपासूनच झाला असून त्याबद्दलची चळवळ मुख्य मुद्दा दृष्टीआड करून व गौण मुद्याला महत्त्व देऊन व तोच पुढें करून चळवळीचें महत्त्व दर्शविलें जात आहे. वैषयिक विचारांवर नवनीतीस अनुसरून तत्त्वज्ञानाचें झांकण घालण्याचे जे प्रयत्न होत आहेत ते केव्हांही अनर्थावह झाल्यावांचून राहणार नाहींत. आपलें म्हणून जें कांहीं तत्त्वज्ञान आहे तें, तसेंच आपली पूर्वपरंपरा, आपली संस्कृति, आपल्या नीति–भावना या महत्त्वाच्या विषयांकडे कामांधतेनें दुर्लक्ष केल्यास व संततिनियमनाच्या बाबतींत ज्या गोष्टींचा अवलंब करण्याविषयीं सूचना होत असतात त्यांची व नवनीतीच्या पुरस्काराच्या बाबतींत जें तत्त्व म्हणून पुढें केलें जात आहे त्याचा अवलंब केल्यास आपलें स्वत्व गमावलें जाऊन त्यांचा अनिष्ट परिणाम झाल्याशिवाय केव्हांहि राहणार नाहीं हें लक्षांत ठेवणें अगत्याचें आहे.

नवनीति हा विषय पूर्णांशानें वैषयिक भावना व भोगलालसा यांनीं व्यापून टाकला आहे. नवनीति, नवमतवाद यांचा स्पष्टार्थच असा आहे कीं, कोणत्याहि

स्त्री पुरुषांना स्वतःच्या वैषयिक वासनेची शांतता एकमेकांच्या संमतीनें पूर्ण करण्यास धर्म, नीती, कायदा व समाज यांची अडचण नसावी. हा नवनीतीचा प्रघात रूढ होऊं लागल्यास मानव व पशू यांमध्यें या बाबतींत तरी भेद राहणार नाहीं.

नवनीति—नवमतवाद—संततिनियमन या चर्चात्मक विषयापैकीं संततिनियमनाचाच विचार अगोदर करूं.

देशांतील वाढत्या दारिद्र्याची सबब पुढें करून संततिनियमनाची आवश्यकता त्या विषयाच्या पुरस्कर्त्यांकडून दाखविली जाते; पण ही सबब विचारांतीं बरीचशी गौणच मानावी लागेल. देशांत बेकारी भयंकर आहे, दारिद्र्य वाढतें आहे हें कबूल आहे, पण समाजस्वास्थ्यासाठीं त्याला टक्कर देण्यास संततिनियमनाची तेवढीशी नव्हे मुळींच जरूरी नाहीं. हल्लींची राजकीय परिस्थिती हेंच देशाच्या अवनत स्थितीचें कारण असल्यामुळें तें नष्ट करण्याचे प्रयत्न झाल्यास व त्याचा फायदा झाल्यास संततिनियमनाची सबब आपोआप लंगडी ठरेल. ज्याप्रमाणें नवनीति—नवमतवाद यांत भोगलालसा दिसून येते, तोच अंतिम हेतु संततिनियमनांच्या बाबतींतही समाविष्ट झालेला दिसतो. संततिनियमनाच्या इष्टानिष्टतेच्या बाबतींत आजकाल जी चर्चा सुरू आहे, तिचा आमच्या संस्कृतीचा, सामाजिक व व्यक्तिविषयक आरोग्याच्या दृष्टीनेंहि विचार होणें जरूर आहे. आजकाल या बाबतींत प्रदर्शित केले जाणरे विचार व सुचाविले जाणारे उपाय यांचें अवलंबन करणें म्हणजे आरोग्याचा नाश करणें होय. याबद्दलचें विवरण स्वतंत्र रीतीनेंच करणें ठीक होईल.

पाश्चात्य राष्ट्रांपैकीं कित्येक देशांत या संततिनियमनाचा बोलबाला चाललेला दिसून येतो पण त्यांचे हेतु व कारणें निराळीं असून त्यांच्यांत व आमच्यांत प्रत्येक बाबतींत महदंतर आहे. त्यांची नैसर्गिक परिस्थिती, संस्कृती, परंपरा वगैरे सर्वच गोष्टी आमच्यापेक्षां भिन्न आहेत; सबब त्या बाबतींत जो विचार करावयाचा तो आमच्या देशाच्या दृष्टीनेंच झाला पाहिजे; या संततिनियमनाच्या बाबतींत एकंदर बाजूंनीं विचार केला तर आमच्या देशाची राजकीय परिस्थिती व आर्थिक परिस्थिती सुधारली गेल्यास आमच्या देशांत संततिनियमनाची जरूर भासणार नाहीं. पाश्चात्य राष्ट्रांपैकीं कित्येक राष्ट्रें संततिनियमनाच्या विरुद्ध असून त्यांज-

कडून संतान वृद्धी करण्याचे प्रयत्न चालविले जात असल्याचें दिसून येतें व आज आमच्या देशांत आवश्यक वाटते यावरून दोन्ही देशांतील राजकीय परिस्थितीच याला कारण होय असें ठरत नाहीं काय ?

आमच्या देशांत संततिनियमनाची आवश्यकता दर्शवितांना स्त्रियांच्या आरोग्याची एक सबब पुढें केली जाते. स्त्रियांना ज्यास्त संतती झाल्यास त्याचा परिणाम त्यांच्या शरीर प्रकृतीवर होऊन त्या रोगट-दुर्बल होतात; पण संतति नियमनाचे बाबतींत भोगलालसेचें ध्येय समोर ठेवून ज्या उपायाचें अवलंबन करण्याच्या सूचना होत असतात त्या उपायांनीं तरी तो इष्ट हेतु साध्य होईल काय ? उलट त्यामुळें आरोग्य दृष्ट्या खात्रीनें भयंकर परिणाम झाल्यावांचून राहत नाहींत. आजकाल आमच्या स्त्रियांच्या शारीरिक आरोग्यांचा जो ऱ्हास होत चाललेला आहे तो संतान वृद्धीच्या कारणापेक्षां दुसऱ्या निराळ्या कारणानींच होत आहे.

एकंदरींत सांगावयाचें म्हणजे एवढेंच कीं आजकाल संततिनियमनाचा जो बोलबाला चाललेला आहे त्याच्या मुळाशीं दुसरें तिसरें कोणतेंहि कारण नसून अनावर व वाढती भोगलालसा हेंच सबळ कारण आहे असें सूक्ष्म व विचारी दृष्टीनें पाहणाऱ्याच्या लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं.

एकंदरींत सर्व गोष्टींचा विचार करतां आपल्या इंद्रियाचे नियमित उद्योग निर्वेध होऊं देणें हें शारीरिक व मानसिक दृष्ट्या अत्यंत हिताचें व सौख्यवर्धक आहे व स्त्रीजीवनांतील सौख्याचा तो मध्यबिंदु आहे. या बिंदूपासून स्त्रियाना दूर खेचणारी स्त्री स्वातंत्र्य ( आर्थिक ) लैंगिक स्वातंत्र्य, संततिनियमन, पूंसीकरण असली कोणतीहि चळवळ म्हणजे स्त्रीजीवनाचा व त्यांच्या कर्तव्याचा नाशच होय असें म्हणावें लागेल. वडाची साल पिंपळाला लावावी त्याप्रमाणें स्त्रीमृत्यूचें, बालमृत्यूचें व दोघांच्याहि अनारोग्याचें कारण स्त्रीहितवादी स्त्रीशिक्षण, विवाहाचा प्रश्न, स्त्री स्वातंत्र्य यांच्याशीं जोडूं पाहतात. परंतु सूक्ष्म विचारांतीं हें फोल असून दिशाभूल करणारें असें दिसून येणार आहे. प्रौढ विवाहिता पहिल्या एकदोन बाळंतपणांतच टेंकीला येतात, त्यांच्या संततीला अंगावर पिण्यास पुरेसें दूधहि मिळत नाहीं; स्वच्छ कपड्यांनीं किंवा नुसत्या मोकळ्या हवेनें आरोग्य वाढत नाहीं. त्याला मातेच्या तेजस्वी आरोग्यसिंचनाची फार आवश्यकता असते. अर्थात् मातेची तब्यत पूर्ण आरोग्यमय असणें जरुरीचें आहे. स्वार्थी, कृतघ्न, अज्ञ अशा

लोकांच्यामुळें स्त्रीजीवन हैराण होत असेल तर कांहीं उच्छृंखल स्त्रियांमुळें पुरुषांचें जीवन निःसार होत असेल म्हणून येवढयासाठीं बहुजनसमाज विस्कळीत होईल, कौटुंबिक सौख्याला आंचवेल अशी भलतीच विघटना निर्माण करण्याचा अट्टाहास धरणें चुकीचें ठरेल.

आपल्या देशाची संस्कृति नागरी स्वरूपांची नसून खेड्यांच्या भूमिकेवर तिचा पाया आहे. व एकत्र कुटुंब हें तिचें परिणाम आहे. समाजांकरितां—असा समाज घडविणाऱ्या कुटुंबाकरितां स्वार्थत्याग करणें हें संस्कृतीचें बीज आहे व येथें वैभवाला महत्त्व नसून त्यागाला आहे. घडी विस्कटणें, समाजबंधनें झुगारून देणें सोपें आहे, पण रुचतील, पचतील, जीवनाच्या कर्तव्याचा विकास करतील, सौख्य संवर्धन करतील अशीं बंधनें निर्माण करणें कठीण आहे.

आर्य संस्कृति व पाश्चात्य संस्कृति यांची तुलना केली असतां यांपैकीं एक आधिभौतिक सुधारणा ( Materialism ) व दुसरी आर्यसंस्कृति आत्मीय उन्नति कशी करावी ( Spiritual ) या मार्गाकडे नेणारी आहे. मेकॉले साहेबानें म्हटल्याप्रमाणें देण्यांत येणाऱ्या शिक्षणांचा योग्य तो परिणाम आपल्या देशांतील स्त्री पुरुषांवर झालेला आहे. "खाना, पिना, मजा करना" हें घातुक तत्त्व आम्हीं अमलांत आणून देशाभिमान, आपला देश, आपले बंधु यांच्याबद्दल असलेलें प्रेम ज्याची खरोखर आपल्या देशाला जरुरी आहे तें आम्ही लाथाडलें आहे व त्याचमुळें पारतंत्र्यांत आम्हीं खिचपत पडलें आहोंत. रामायण, महाभारत यांचा इतिहास पहातां स्त्रियांना गुलामगिरीनें वागविलें जातें असें आढळून येणार नाहीं—उलट स्त्रियांना मानाचें स्थान त्यांनीं दिलेलें आहे असें दिसून येईल.

परिस्थितीनें म्हणा अगर कांहीं कारणानें म्हणा एकत्र कौटुंबिक पद्धती नकोशी होऊन तरुण स्त्रीपुरुषांमध्यें स्वार्थी वृत्ती फार वाढलेली आहे असें आढळून येईल. कुटुंबांत सौख्य, प्रेम पाहिजे असेल तर त्याग केला पाहिजे. प्रेम सुद्धां निःस्वार्थी पाहिजे. स्वार्थी प्रेम घातूक असतें. स्वार्थीवृत्तीचें एखादें उदाहरण घ्यावयाचें म्हणजे आपले स्त्रीसंबंधीं नातलग मेव्हणे, मेव्हण्या, स्वतःच्या घरीं ठेवणें व त्यांच्या प्रीत्यर्थ खर्च करणें याबद्दल कांहीं वाटत नाहीं, परंतु स्वतःचा पिता मरणोन्मुख पडला असतां त्याला लागणारा खर्च आडवा येतो, यांवरून आपल्यांतील कौटुंबिक प्रेमांची कल्पना येईल ! शिवाय अशा स्त्रिया आशिक्षित असल्यामुळें हीन मतांच्या

असतात. परोत्कर्ष त्यांना सहन होत नाहीं व त्यामुळें एखाद्या कुटुंबांत अगर पतिपत्नींत वांकडेपणा—करण्यास त्या जपत असतात, व ह्या विघ्नसंतोषांत हाच आनंद—हेंच सौख्य मानत असतात. शहरांमध्यें पूर्ण स्वतंत्रता, वडील माणसांचा अभाव यामुळें अनिर्बंध वागणुकीला वाव सांपडून त्यामुळें आजारीपणाचें बीज रुजलें जातें व हेंच आणखी एक कारण संतति नियमनासाठीं पुढें आणलें जातें.

संतति-नियमनांचा उद्देश वारंवार येणाऱ्या बाळंतपणामुळें दर्शविणें व बेकारीला आळा घालण्याचें तत्त्व दर्शविणें हें बरोबर आहे, परंतु परिणाम मात्र याच्या उलट आढळत आहे. तरुण अविवाहित कुमार-कुमारिका यांचा आपली वासना तृप्त करण्याकरितां याचा उपयोग केल्याचें आढळून येतें—यामुळें विवाह संस्था नामशेष होणार किंवा काय याची भिती वाटत आहे.

बेकारी म्हणून ओरडावयाचें व स्त्रियांना पुरुषी शिक्षण द्यावयाचें. त्या शिक्षणाचा स्त्रियांच्या मनावर स्वातंत्र्याचा पगडा बसल्यामुळें विवाहीत झाल्यानंतर त्यांना गृहकृत्याची वगैरे माहिती नसावयाची, व बिचाऱ्या नवऱ्याला अन्यत्र सोय पहावी लागायाची अशी स्थिती दिसून येते.

पाश्चात्त्य देशांत स्त्रियांच्या स्वातंत्र्याचे दुष्परिणाम त्यांना भोगावे लागून विवाह ही व्यक्तिगत बाब नसून राष्ट्रीय आहे असें प्रत्येक तरुण पतिपत्नीनें समजलें पाहिजे व त्याप्रमाणें त्यांनीं कायदे केलेले आहेत. व त्याच्या उलट त्यांच्या सुधारणा—नव्हे कुधारणा आम्ही सुधारक, नवमतवादी म्हणून डोक्यीवर घेऊन नाचत आहोंत. संततिनियमनांच्या साधनामुळें शील व जाति यांचें महत्त्व नाहींसें होऊन विवाह हा धार्मिक विधि कालांतरानें नष्ट होण्याचीं चिन्हें दिसत आहेत. शिवाय हीं उपकरणें परदेशी असल्यामुळें काटकसरीच्या संसारांत नवीन खर्चाची बाब होऊन त्याचा शरिरावर होणारा परिणामहि भलताच होता याचा कोणी विचार करीत नाहीं.

महर्षि अण्णासाहेब कर्वे यांनीं स्त्रियांकरितां जो शिक्षणक्रम आंखलेला आहे तो हल्लींच्या पुरुषी शिक्षणांपेक्षां उत्तम असून कुटुंबव्यवस्थेला व गृहिणीपदाला पोषक आहे. अशा संस्था जितक्या जास्त निघतील तेवढा राष्ट्राला फायदा होणार आहे.

## आजच्या स्त्रियांचें आरोग्य

विधवाविवाह करण्याबद्दल शास्त्रांचें मत प्रतिकूल आहे व त्या काळीं तें योग्य असूं शकेलसुद्धां. स्त्रियांनीं पुनर्विवाह करूं नये म्हणून मात्र कडक नियंत्रण व लग्न केल्यास त्या नीतीच्या दृष्टीनें भ्रष्ट होतात, परंतु एखाद्या विधुरानें मात्र कोंवळया-१७-१८ वर्षांच्या आपल्या मुलीसारखी शोभणारी–अशा स्त्रीशीं विवाह केला तर मात्र पाप नाहीं. अशा स्थितींत त्यांच्या नांवावर तिनें वाटेल ते ढंग केले तरी समाजाला खपूं शकतात–तेव्हां यास उपाय म्हणजे विधुरांनीं आपल्यापेक्षां ५।६ वर्षांनीं लहान अशा गतभर्तृकेशीं अगर तशी कुमारिका असेल तरच तिच्याशीं बिनधोक विवाह करणें श्रेयस्कर होय. विषम विवाहामध्यें स्त्रियांना सौख्य नसून त्यांना नानातऱ्हेचे गर्भाशयाचे वगैरे विकार जडत असतात. समाज इतका अंध आहे कीं, या आमच्या गुणांमुळें मुंबईचे श्रद्धानंदासारखे आश्रम–पंढरपुरचे अनाथाश्रम निघत आहेत. हें पाप कीं पुण्य तें सनातनी धर्ममार्तंड मंडळींनीं सांगावें. उघड गोष्टी करणाराला कायदा शिक्षा देतो. परंतु गुपचुप केलें तर समाजाला चालतें–व खपतें.

अलिकडील तरुण स्त्रीपुरुषांना एखाद्या विषयाची माहिती नसतांना टीका व शब्दछल करण्याची प्रवृत्ति फार आढळून येते; परंतु ही टीका एकांगी असल्यामुळें त्याचा अळवावरच्या पाण्याप्रमाणें उपयोग होतो. शिक्षण कोणतेंही घ्यावें, तें मात्र आत्मसात करून त्याचा आपल्या देशाला, संस्कृतिला फायदा होईल, याविषयीं आजच्या व भावी पिढीनें प्रयत्न केला पाहिजे.

एकंदरींत वरील सर्व विवरण लक्षांत घेऊन स्त्रीवर्गानें स्वतःच्या, भावी पीढीच्या, समाजाच्या व राष्ट्राच्या हितासाठीं आपल्या संस्कृतीकडे नजर देऊन यांत प्रसंगोपात केलेल्या सूचना लक्षांत बाळगून आपल्या आरोग्यासाठीं योग्य तो आहार विहार रहाणी यांचा अवलंब करणें सर्वथैव उचित अथवा इष्ट आहे हें त्यांच्या ध्यानीं येणार आहे.

---

# — आमचें प्रकाशन —

लेखक:—डॉ. दामोदर वासुदेव सांडू.

(१) **जगाच्या वातावरणांत**—तरुण तरुणींनाच नव्हे तर आबाल वृद्धांना आपलें जीवन सुखमय कसें बनवितां येईल याचा मार्गदर्शक.

(२) **बाल संगोपन**—आपलीं बालकें सुदृढ-निरोगी-चपल बनावीं; त्यांच्या बाललीलांचें कौतुक पाहून खऱ्या वात्सल्य प्रेमाचा आनंद उपभोगितां यावा असें इच्छिणाऱ्या प्रत्येक मातेनें हें पुस्तक संग्रहीं ठेवून त्याचा उपयोग करावा.

(३) **रोग विज्ञान**—थोडक्यांत सर्व रोगाचें विवरण व त्या वरील चिकित्सा यांत सांगितली आहे. (प्रती संपल्या, नवीन आवृत्ति लौकरच प्रसिद्ध होईल.

(४) **आहार शास्त्र**—आहार हा जीवनाधार आहे; त्या पासून जसें निरोगी दीर्घ जीवन व आरोग्य मिळवितां येतें तसेंच भलत्याच आहारानें आयुष्याचें-जीवन वाटोळें होतें! निरोगी आयुष्यवर्धनासाठीं व आयुष्यांतील खरें सौख्य मिळण्यासाठीं कोणता आहार करावा, कोणता त्याज्य आहे वगैरे अनेकविध विषयांचें यांत सविस्तर विवेचन केलें आहे. श्रीमंत राजे बाळासाहेब पंत प्रतिनिधि औंध यांची सुंदर प्रस्तावना. किं. २ रु.

ही पुस्तकें प्रसिद्ध बुकसेलर्सकडे अगर आमचेकडे विकत मिळतील.

**द. कृ. सांडू ब्रदर्स,**

आर्यौषधि कारखाना चेंबूर मुंबई.